# सादर समर्पण



*माझ्या गत पत्नीच्या*

**स्मृतीस**

*मी माझी ही कृति*

**अर्पण करीत आहे.**

पाटस,
ता. १६ सप्टेंबर १९४५ } लेखक.

## अल्प निवेदन

'रानोमाळ' मध्यें प्रसिद्ध झालेल्या माझ्या मृगयाकथांची श्री. रा. तात्यासाहेब केळकर, प्रो दत्तोपंत पोतदार, प्रो. बापूसाहेब माटे, सह्याद्रीचे संपादक श्री. काळे आदिकरून वाङ्मयीन अधिकारी तज्ज्ञांनीं आपल्या गुणग्राही स्वभावानुसार केलेली वाखाणणी आणि बहुतेक मराठी वृत्तपत्रांनीं आणि नियतकालिकांनी प्रगट केलेले अनुकूल अभिप्राय, त्याचप्रमाणें कांहीं नामांकित मृगयातज्ज्ञानीं खास पत्रद्वारां माझें केलेलें अभिनंदन आणि या विषयासंबंधीं लेखन चालू ठेवण्याविषयीं केलेला आग्रह यामुळें आणि खास लष्करी सैनिकांसाठी प्रसिद्ध होत असलेल्या 'मिलिटरी रिव्ह्यू' मध्यें माझ्या शिकारकथा विविध भाषांतून मोठ्या अगत्यानें सचित्र प्रसिद्ध होऊं लागल्या यामुळें मला उत्साह येऊन, मी माझ्या आयुष्यांत केलेल्या अवशिष्ट शिकारीही लिहून काढण्यास उद्युक्त झालों, आणि त्यांपैकींच कांहीं कथा लिहून आज पुस्तकरूपानें रसिक आणि मर्मज्ञ महाराष्ट्रीय वाचकांपुढे ठेवीत आहे. 'शिकारीचा एक वेगळा पर्याय' आणि 'बालचोर' या दोन कथानकांशीं मात्र माझा साक्षात् संबंध नसून, एक मीं पाहिलेली आणि दुसरी माझे परममित्र कै. बॅ. रॉय् यांच्या शिकारी रोजनिशींतील टिपणांवरून तयार केलेली आहे.

'त्या दुर्दैवी घटनेची पार्श्वभूमि' या शीर्षकाखालीं दिलेली हकीगत केवळ मीं स्वतःच्या समाधानासाठीं दिलेली आहे.

   

शेतीसंरक्षणाच्या निमित्तानें हातीं घेतलेल्या माझ्या बंदुकीनें भोंवतालच्या परिसरांतल्या जंगलीं श्वापदांचा व त्याबरोबरच माझ्या अल्पवयी मुलीचा आणि शेतीच्या व्यवसायाचाही पुरा पुरा फडशा पाडला, तथापि त्या बयेचा मोहपाश मला सुटेना! संयमी मनुष्य मद्यप्राशनाचें अन् द्यूताचें जबरदस्त व्यसनही टाकू शकतो. पण मला एकवार ग्रासून राहिलेलें हें वेडलावें व्यसन सुटणें अशक्यप्राय होऊन गेलें. मला वाटतें इतकें आत्मकथन पुरे झालें.

* * * *

पुस्तक नखरेबाज बनविणें हें प्रकाशकाचें एक कर्तव्यच आहे. तें त्यांनी योग्यप्रकारें बजाविल्याबद्दल त्यांचे आभार मानावयाचे राहून गेले तरी ते मजवर रुष्ट होतील अशांतला भाग नाहीं. आणि आभार तरी कुणाकुणाचे म्हणून मानावेत? मृगयाकथांची वाखाणणी करणाऱ्या वाङ्मयविशारदांचे, अनुकूल अभिप्राय देणाऱ्या वृत्तपत्रांच्या संपादकांचे अन् संचालकांचे, पुस्तकाच्या मुद्रकांचे, प्रकाशकांचे, चित्रकाराचे, स्वतः मरून शिकारींत मला यशलाभ करून देणाऱ्या वन्य श्वापदांचे, रसिक वाचकांच्या पुस्तकावर उड्या पडतात म्हणून त्यांचे, कीं वयाच्या पंचावन्नाव्या वर्षी–केलेल्या शिकारी लिहून काढण्याची प्रेरणा करणाऱ्या त्या प्रेरक शक्तीचे! प्रकाशकांना आभारांचा तो एक संभारच व्हावयाचा; नकोच तें! शिवाय नुसते शाब्दिक आभार मानून उपकारकर्त्यांचें आपल्या शिरावरलें ऋण झुगारून देण्यापेक्षां यावज्जीव त्याबद्दल यादगिरी असण्यांतच औचित्य नाहीं काय?

प्रस्तुत पुस्तकाचे प्रकाशक श्री. देशमुख यांचे आभार न मानण्याइतपत कृतघ्नपणा अंगीं बाणलेला असूनही त्यांच्यांबद्दलचें माझें बनलेलें मत या प्रसंगीं प्रदर्शित केल्यावांचून मात्र मला रहावत नाहीं. त्यांच्या प्रकाशन व्यवसायाच्या उत्कर्षाला त्यांचें कसबी कौशल्य अन् त्याहीपेक्षां जास्त, दुर्लभ अशी त्यांची विनयशील अन् सौजन्यपूर्ण वागणूक हींच कारण झालेलीं आहेत हें निःसंशय आहे.

पाटस,<br>ता. १६ सप्टेंबर १९४५ } लेखक.

# मृगया.

अनुक्रम पृष्ठ


| | |
|---|---|
| १ त्या दुर्दैवी घटनेची पार्श्वभूमि ! | ९ |
| २ सयनी | २६ |
| ३ पिग् स्टिकिंग् न २ | ३५ |
| ४ सातपुड्याच्या एका पुडांत ! | ४७ |
| ५ असंगाशीं संग ! | ६१ |
| ६ ' तक्शी ' व्हॅलीतील काळरात्र ! | ७१ |
| ७ सोलापूर रोडच्या कडेला ! | ९२ |
| ८ बकवध ! | ९७ |
| ९ बालवीर | १०७ |
| १० हाला अन् सुलेमान ! | ११७ |
| ११ चद्रभागेच्या तीरावर | १३२ |
| १२ एकात तीन ! | १३८ |
| १३ वेळ सांगून येत नसते ! | १४७ |
| १४ विषय तोच पण प्रसंग वेगळा. | १५५ |
| १५ मानवी रक्तास लालचावलेली वाघांची दुकल | १६९ |
| १६ जादूगार ! | १९० |
| १७ शिकारी चित्ते | २०४ |
| १८ हिंदुस्थानांत पैदा होणारी वन्य श्वापदे | २११ |
| १९ होतकरू शिकाऱ्यांस काहीं सूचना | २१४ |

श्री रा वि. फडतरे

यांचें

पहिलेंच उत्कृष्ट पुस्तक

# रानोमाळ

अवश्य वाचा.

## त्या दुर्दैवी घटनेची पार्श्वभूमि ! १

*दैव अन् प्राक्तन हे शब्द त्यावेळी माझ्या कोशात नव्हतेच प्राक्तन, दैव अन् नशीब असले शब्द कुणी त्यावेळी माझ्या समोर उच्चारले तर मी त्याना खुळे समजून त्याची हुर्येवडी उडवीत असे पण...*

त्या साली पाटसमधल्या दोन्ही तलावाचा गाळपेरीचा लिलांव मीं घेतला होता चौथाई त्याचवेळीं भरली होती अन् बाकीची तीनचतुर्थांश रक्कम भरण्यास मिळालेली मुदत संपत आल्यामुळ रक्कम आणण्यासाठी मी पुण्यास गेलों होतों. लोकलफंडासुद्धां लिलांवाची रक्कम सरासरी पावणेचारशे रुपये, अन् लिंबोणीच्या मळ्यांत नव्या विहिरीच काम चालल होतं, तीवरील सुरुंगे आदिकरून कामगार लोकांचा पगार वगैरे करण्यासाठी चार सव्वाचारशें

रुपये, अशी आठशें रुपयांची रक्कम–अर्थात् नोटा–घेऊन दुपारीं सव्वा-आकराच्या गाडीनं पुण्याहून मी दौंडास जाण्यास निघालों. स्टेशनावर आल्यावर टांगेवाल्याचे पैसे चुकते केले, अन् टिकीट काढायचं असल्यामुळं कोटाच्या गुंडया न लावतां तसाच टिकीट ऑफीसकडे निघालों. दुसऱ्या वर्गानें प्रवास करीत असे मी त्यावेळीं. नोटा हातरुमालांत गुंडाळून कोटाच्या आंतल्या खिशांत ठेविल्या होत्या, अन् वरखर्चास थोडेसे पैसे–सरासरी दहाबारा रुपये–पाकिटांत ठेवले होते. तिकीट काढून गाडींत जाऊन बसलों तोंच मालेगांवचे सुप्रसिद्ध सावकार आप्पासाहेब पोफळे हेही माझ्याच डब्यांत येऊन बसले. आमच्या डब्यांत एका बाजूला दोघे तिघे ॲंग्लो-इंडिअन सोजीर बसलेले होते, आणि एका बाजूला पोफळे व मी पोफळे महाशयांच्या गझनीच्या पेशवाईथाटाच्या चंचींतल्या पानसुपारीचे बार भरीत एकीकडे गोष्टी करीत बसलों होतों. उकाडा मनस्वी होत असल्यामुळं मी माझा कोट काढून डब्याच्या मधल्या पाळ्याच्या बारीकशा पितळी हुकाला अडकवून ठेवला. थोडया वेळानं गोष्टीचा भर थोडासा कमी झाल्यावर काय पहावसं माझ्या मनांत आलं कुणाला ठाऊक! काढून ठेवलेला तो कोट मी पुन्हां अंगांत चढविला, अन् वरच्याच खिशांत असलेल्या चिठ्याचपाट्या सर्रकन् उपसून मी माझ्या हातांत घेतल्या. धांदलीधांदलींत वरच्याच खिशांत ठेवलेलं टिकीट चिठया उपसून घेतांना वाऱ्याच्या झोताबरोबर आंत न पडतां खिडकीबाहेर उडून गेलं, अन् त्याबरोबर च् च् च् असे उद्गार सहजच माझ्या तोंडून बाहेर पडले. 'कां काय झालं हो?' अस मला पोफळे यांनीं विचारलं, अन् मी त्यांना, 'काय सांगावी आमची हुशारी? खिशांतल्या चिठ्याचपाट्या काढतांना टिकीट गेलं कीं खिडकीबाहेर उडून!' असं म्हणालों. 'ठीक!' एवढंच म्हणून त्यांनीं अगदीं हलुवार हातानं तंबाकूची एक चिमूट तोंडांत सोडली,

अन् खिडकींतून ते पिचकाऱ्या मारीत अन् तोंडानं हुश्श हुश्श करीत शांत चित्तानं पानांच्या शिरा काढीत बसले.

त्या सोजिरांपैकीं एकानं आतां वरला फॅन सुरू केला, म्हणून साऱ्या चिठ्याचपाट्या गोळा करून प्रथम मीं माझ्या खिशांत कोंबल्या. आतां माझ्या मनांत अनेक विचारतरग उठूं लागले. ' विनाटिकीट दुसऱ्या वर्गातून प्रवास करणारा एक संभावीत लुच्चा ' असं निदान प्रथमदर्शनीं तरी नवखा तिकीटकलेक्टर असल्यास आपल्याला सर्टिफीकीट देणार याबद्दल मला शंकाच उरली नाहीं. दुप्पट हंशील द्यावयास पाहिजेच होतं, अन् त्यासही अर्थात् आतां मी तयारच होतों.

शेवटी एकदांचं दौंड आलं, अन् पोफळेसाहेबांना नमस्कार करून मी डब्याखालीं उतरलों जादा नेमिलेल्या टिकीटकलेक्टरांपैकीं एक टिकीट-कलेक्टर आमच्या डब्यापाशींच हजर होते. ' टिकीट प्लीज् ' म्हणून त्यांनीं माझ्यापुढं हात पसरला. कमालीची दिलगिरी दर्शवून घडलेली हकीगत मी त्याला सांगितली. त्याबरोबर, आवाज खाऊन निसटून गेलेला रानडुक्कर पुन्हा हेरीत आला म्हणजे शिकाऱ्याला जसा आनंद होतो, तसा आनंद त्या टिकीट कलेक्टराच्या चर्येवर मला दिसला ! ' पाहिजे तर आपण पुण्यास फोन करून दौंडचं एकच टिकीट या गाडीला इशू झाल्याची खात्री करून घ्या ' असंही मी त्याला म्हणालों. ते दोघेतिघे सोजीर शिकंदराबादला जाणारे होते असं त्यांच्यामध्यें चाललेल्या संभाषणावरून मला कळून आलं होतं. पोफळे बार्शीकडे निघाले होते, अन् मी एकटा एकच फक्त दौंडचा उतारू होतों. ' इतकी यातायात करण्यापेक्षां, बे अडचं पांच रुपये भरून टाका झालं, ' असं तो टिकीटकलेक्टर मला अगदीं बेडरपणानं हंसून म्हणाला; अन् मीही, जास्त वाटाघाट करीत बसण्यांत हंशील नाहीं असं समजून मुकाट्यानं त्याच्या हातावर पांच रुपयांची नोट ठेवून त्यानं दिलेला

मेमो चुरगळून खिशात टाकला, अन् दादर चढून महालकरी कचेरीकडे तडक निघालों.

कचेरीत गेल्यावर फडणीसांना भेटून 'लिलांवाची रक्कम भरावयास आलों आहे,' असं म्हणतांच त्यांनीं त्याच्या समोरच बसलेल्या कारकुनास पावती करण्यास सांगितलं. अन् रक्कम काढावयासाठी मी माझ्या खिशांत हात घातला.

रक्कम काढण्यासाठी मी माझ्या कोटाच्या खिशात हात घातला खरा पण नोटांचं पुडकं माझ्या हाताला न लागल्यामुळ माझ्या हाताला एकदम झटका बसल्याप्रमाणं झालं, अन् मी कोटाचे आंतले दोन्ही खिसे एकाद्या भ्रमिष्टाप्रमाण पुनः पुन्हा चाचपून पाहूं लागलों. थोड्याच वेळांत खिशांतल नोटांचं पुडकं गहाळ झाल्याबद्दल माझी खात्री झाली, अन् कारकुनाला 'पावती करू नका' म्हणून मी म्हटलं फडणीस, पावती करणारा तो कारकून अन् तिजोरीपाशी बसलेला सराफ तिघेही एकसमयावच्छेदेकरून डोळे विस्फारून मजकडे साश्चर्य बघू लागले मी मात्र, निष्कारण कुणी श्रीमुखांत भडकवावी त्याप्रमाण स्वतःशींच कांही तरी पुटपुटत, अन् पुण्यास टांग्यात बसल्यापासून तों दैंडच्या महालकरी कचेरींत पाऊल टाकीपर्यंतच्या प्रत्येक बारीकसारीक प्रसंगाची आठवण करकरून पाहात डोकं खाजवीत बसलों होतों. पांचचार मिनिटं मी नुसताच असा तिथं बसून राहिलों होतो, पण आतां तिथं बसून रहाण्याचा कांहींच उपयोग नव्हता. विषण्ण चित्तानं शेवटीं फडणिसाना नमस्कार करून मी उठलों, अन् शेजारीं पो. सब् इन्स्पेक्टरांची कचेरी होती तिथं जाऊन त्याना घडलेली हकीगत सागितली. मजजवळच्या नोटांत तीनचार शंभरांच्या नोटा होत्या. पण त्याचे नबरही मीं टिपून ठेवलेले नव्हते, आणि कुणावर माझा वहीमही नव्हता. रक्कम कुठं अन् कशी गहाळ झाली याचं माझं मलाच मोठं गूढ पडलं होतं, अर्थात् 'कंप्लेंट' देण्यापासूनही कांहीच

उपयोग नव्हता. उगाच सबइन्स्पेक्टरांची गांठ पडली म्हणून त्यांच्या कानावर मी घडलेली हकीगत घातली इतकंच.

पाटसला जाण्यास सायंकाळी आठ वाजल्याशिवाय गाडी नव्हती. सर्व्हिसकारही नुकतीच निघून गेली होती म्हणून मी गावांत माझे एक स्नेही रहात होते त्यांच्या घरी जाऊन संध्याकाळपर्यंत स्वस्थ पडून राहिलों. गाडीची वेळ होत आली तेव्हां उठलों. माझ्या स्नेह्यांनीं दिलेला चहा घशाखालीं उतरविला, अन् तडक स्टेशनचा रस्ता सुधारला. स्टेशनवर आल्यावर पाटसच टिकीट काढलं, अन् गाडीला थोडासा अवकाश होता म्हणून रेस्टॉरंटमध्ये जाऊन पुन्हा चहा ढोंशीन बसलों. डोक्यांत विचाराचं चक्र सारखं सुरूच होत

आठ वाजतां पुण्यास जाणारी गाडी ज्या प्लॅटफॉर्मवरून सुटते, त्याच प्लॅटफॉर्मवरून नगरची गाडी थोडी आधी म्हणजे सरासरी साडेसात–पावणे आठच्या दरम्यान सुटते. पुण्याला जाणारी गाडी मागें व नगरास जाणारी गाडी पुढे अशा एकमेकीला लागूनच त्या दोन्हीं गाड्या उभ्या असतात. नगरची गाडी निघून गेल्यावर पुण्याकडे जाणाऱ्या गाडीचं एंजीन पुढं जोडण्यांत येतं. या सर्व गोष्टी मला चांगल्या ठाऊक होत्या, अन् कितीकदां तरी मी त्या गाडीनं दौंडहून पाटसला गेलेला होतो. असं असून, नगरच्या गाडीच्या एंजिनानं व्हिसल दिल्याबरोबर, समोरच भिंतीला मोठं क्लॉक असतांही–वेंधळ्यासारखा धांदरटपणानं मी नगरच्या गाडींत घुसलों याला काय म्हणावं ?

गाडी चालतां चालतांच मी गाडींत जाऊन बसलों होतों. एका मिनिटांत वळण घेऊन गाडी भीमेच्या पुलावर आली, अन् गाडीचा बदका घों घों आवाज होऊं लागल्याबरोबर आपण चुकून नगरच्या गाडींत बसल्याचं मला

कळून आलं. लाचारीन एकवार मी आपल्या कपाळाला हात लावला अन् बेलवंडीचं स्टेशन आल्याबरोबर तिथ उतरून पडलों. अ. स्टे. मास्तरांच्या दिमतीस एक पोरगेलासा शिकाऊ सिग्नलर होता तो फाटकाशींच उभा होता, त्याला मी 'चुकून नगराच्या गाडींत बसलों, हें पहा मजपाशीं पाटसचं टिकीट आहे' असं सांगितलं. पण त्याला त्याचं काय होय? रेल्वे कंपनीचा पगार खात होता तो! प्रत्येक उतारूशी तो असा माणसासारखा वागूं लागला तर कंपनी ठार बुडेल असं त्याला वाटलं असावं. त्यान मला डबल हंशील द्यावं लागेल असं स्वच्छ सागितलं. क्षुल्लक बाब असल्यामुळं बिनतक्रार मी तें त्याच्या हातावर ठेवलं. अन् दौंडास जाण्यास पहाटेपर्यंत गाडी नाहीं असं कळल्यामुळं फलाटावरल्या [ प्लॅटफॉर्मवरल्या ] वाळूंत पहांट होईपर्यंत बसून राहिलों. गार वाऱ्यामुळं मला हुडहुडी भरली होती. स्टेशनातल्या प्रशस्त लांकडी बाकावर थोडा वेळ पडण्याची परवानगी मास्तरांना विचारावी असं एकवार माझ्या मनांत आलं, पण आधींच महागलेल्या माणुसकीचं आणखी प्रत्यंतर बघणं बरं नाही अस पुन्हां वाटल्यामुळं मी विड्यामागं विड्या ओढीत सारी रात्र तिथं उघड्यावरच बसून काढली.

काट्याजवळच टांगलेल्या रुळाच्या एका तुकड्यावर जाड बोल्टान ठोकून पोर्टरानं गाडी सुटल्याची सूचना प्रवाशांना दिली. पुन्हां आता मी पाटसचं टिकीट काढलं, अन् गाडीची वाट पहात फलाटावर येरझारा घालीत राहिलों. माझ्या डोक्यांत विचारांचं नुसतं काहूर उठून राहिलं होतं. 'यंदा लिलांव आपण घेतला खरा, पण आपण लिलांव बोललों ती वेळ कांहीं बरी नसावी' असं मनाला वाटलं. पुण्याहून निघतांक्षणींच टिकीट वाऱ्याच्या झोतानं उडून गेलं. आठशें रुपयांची रक्कम हातोहात गहाळ झाली. मतीला भ्रंश पडल्याप्रमाणं चुकून नगरच्याच गाडीत जाऊन बसलों प्रत्येक ठिकाणीं डबल हंशील भरूनही एकप्रकारें नामुष्कीच पदरांत पडली इतर प्रकारांनीं

त्रास झाला तो शिवायच. आणखी काय घडणार आहे तें तरी कुणीं सांगावं ?

गाडी येऊन प्लॅटफॉर्मला लागली अन् मी गाडींत जाऊन बसलों. तिसऱ्या वर्गाचं टिकीट काढलं होतं आतां मी. एका झोंपलेल्या इसमाच्या पायगताशीं एक टीचभर खुली जागा सांपडली तीवर बूड कसबसं टेकलं. लायनीच्या कडेचीं झाडं भराभर मागं टाकीत गाडी भराट्यानं धांवत होती. हां हां म्हणतां गाडी दौंडच्या स्टेशनांत घुसली अन् पुण्याला जाणारी गाडी तयारच होती तींत एकदांचा मी जाऊन बसलों थोड्याच वेळांत गाडी सुटली अन् पाटस स्टेशनावर गाडी खडी झाल्याबरोबर नेहमीच्या रिवाजा-प्रमाणे स्टेशनमास्तरांबरोबर इकडली तिकडली बातचीत न करतांच, टिकीट पोर्टराच्या हातांत देऊन मी माझ्या मळ्याचा रस्ता सुधारला.

पायांपेक्षां माझं डोकंच मळ्याच्या रस्त्यानं झपाट्यानं चाललं होतं. 'एकाद्या विवक्षित कृत्यालाच अथपासून इतीपर्यंत सर्वस्वीं प्रतिकूल वातावरण का निर्माण व्हावं ? मीं लिलांव घेतल्यापासून निदान या क्षणापर्यंत तरी असंच घडलं नव्हतं काय ? ' प्रत्येक बाबतींत फटका खाऊन अन् फजीती पावून आज मी पाटसला माघारा आलों होतों. असं कां व्हावं ? याचं समाधानकारक उत्तर माझं मलाच सुचत नव्हतं.

हिलाळ नांवाचा नवीनच घेतलेल्या जोडींतला एक बैल कामांत कुठंतरी अवघडून उरीं भरला होता, त्यास शिकाळावयास सांगून मी पुण्यास गेलों होतो. पण घरांत पाऊल टाकतांक्षणीच तातडीनं आधीं चवकशी करावी अशी ती बाब नसल्यामुळं घटकाभर विश्रांति घेऊन अन् स्नानभोजन वगैरे उरकून मी आडवा झालों होतों. जेवतांना माझ्या मुलांपैकी कुणी तरी, हिलाळ बैलासंबंधी कांहींतरी वेडीवांकडी वटवट केलेली माझ्या ओझरती कानांवर पडली होती, अन् त्या बडबड्या मुलाला त्याच्या आईनं डोळ्यांनीं 'चूप बसण्याचा इषारा' केलेलाही माझ्या नजरेतून सुटला नव्हता.

पण त्या सगळ्या प्रकारात कांहीं विशेष ‘ सीरिअस ’ भाग असेल असं मला वाटल नाही अन् म्हणूनच मी त्याच्याबद्दल उद्मेखून चवकशी केली नाहीं

काल साऱ्या रात्रभर जागरण घडल असल्यामुळं मी खूप वेळ आळसटल्यासारखा माजघरांतल्या झोऱ्यावर स्वस्थ पडून होतों. चहा तयार होऊन आला तेव्हां आतां उठणं प्राप्तच होतं चूळ भरून चहा घेतला तों सुभानराव [ गड्यावरचा मुकादम ] एक दोघा गड्यासह हलकेच येऊन पडवीत बसलं. प्रथम इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर माझ्या दोन तीन दिवसाच्या अनुपस्थितींतल्या कामाधामाचा ‘ रपोट ’ त्यांनी दिला, अन् एकाएकींच ॲसीड प्याल्याप्रमाणं आंबूस तोंड करून, “ शिंकाळतांना हिलाळ्या उंचावरून आपटून साफ मोडल्याची अन् बाकी समदं आलबेल असल्याची ” वर्दी त्यानीं मला दिली !

जेवतांना चाललेली माझ्या मुलाची वटवट अन् त्याला माझ्या पत्नीनं डोळ्यांनीं दटावून चापल्याचा प्रकार या दोहोंचाही मेळ आतां कुठं मला घालतां आला ! परगांवाहून येनाक्षणीच त्रासदायक हकीगतीचा पाढा माझ्यापुढं वाचावयास नको, म्हणूनच तिन बैलाच्या झालेल्या दुरवस्थेसबधीं एक अवाक्षरही जेवतांना माझ्या कानावर घातलं नाही हें आतां माझ्या चांगलं ध्यानांत आलं.

बैल आचकून मोडल्याची हकीगत ऐकतांच माझेही हातपाय लटके पडल्यासारखे झाले. तोंडावाटं एक शब्दही न काढता त्या गड्यांबरोबरच मी गोठ्यांत गेलों. गोठ्याच्या एका बाजूस, आज दोन दिवस एकाच कुशीवर पडून असलेला तो धिप्पाड बैल फुगून गेल्यासारखा दिसत होता. त्याच्या नाकातोंडावाटं एकसारखा फेंस बाहेर पडत होता, अन् जोरानं होत असलेल्या श्वासोच्छ्वा-

सामुळं त्या फेंसाचे बनलेले फुगे त्यांच्या तोंडाभोंवतीं उडून मग फुटत होते. तिथ कोंपऱ्यांत उभ्या करून ठेवलेल्या घांसाच्या पेंढींतला एक मूठभर घांस मी त्याच्या तोंडाशीं नेला, पण तो सोखून मुखांत घेण्याचीही कुवत त्याला आतां राहिली नव्हती. काजळ माखल्याप्रमाणं दिसणारे आपले टपोरे डोळे त्यानं नीट मजकडे लाविले होते. त्याच्या अगदीं जवळ मी जाऊन बसलों त्याच्या मखमलीप्रमाणं मऊसूद तोंडावरून मी हात फिरविला. त्याच्या डोळ्यांवाटें आता एकसारखं खळखळां पाणी निचरूं लागलं 'माझं दु·ख हरण करण्यासाठीं तुम्ही गडयांना जो उपाय सांगून गेलांत त्या उपायांनीं या हलगर्जी माणसांनी माझे प्राण मात्र हरण केले,' अस जणू दीनवाणीनं मला तो म्हणत होता ! त्याचे ते क्लेश मला आतां बघवेनात. ताडकन् मी बसल्या जागेवरून उठलों तोंडावाटं अवाक्षरही न काढतां खालीं मान घालून मी घरांत गेलों. केसमधली बदूक काढली अन् लेथेल्चीं दोन काडतुसं मी माझ्या बंदुकींत भरलीं. बदुकीचे दोन्हीं ट्रिगर एकदमच उघडले, अन् पुन्हा गोठ्यांत जाऊन मी माझ्या त्या आवडत्या बैलाच्या डोक्यात एक अन् काळजावर एक गोळी झाडून त्यास होणाऱ्या क्लेशांपासून त्याला मुक्त केल. अशा रीतीनं दोनशे रुपये खर्च करून घेतलेल्या बैलाच्या जीवाकरितां–नव्हे–त्याचा जीव घेण्याकरितां–मला आज आणखी दोन काडतुसं खर्चीं घालावीं लागली !

तलावांची लागण पेरणी करण्यांत मला आतां तितकासा उत्साह वाटेनासा झाला होता, पण तें केल्यावांचून तर आता गत्यंतरच नव्हतं. निरुत्साही मनानंच मी ते दोन्ही तलाव पेरून काढले, काकड्या–कलिंगडांची लागण केली, राखणदार गडीमाणसांची तरतूद केली अन् मगच स्वस्थ बसलो.

वैशाख उजाडला तो पीक छातीला लागूं लागलं, अन् त्यामुळ मलाही किंचित् हायसं वाटल. पिकाला रानडुकरांची अन् हरणांकोल्ह्यांची वर्दळ लागू

लागल्यामुळं, नव्या तलावाच्या दक्षिण बाजूच्या एका टेपावर राहुटी ठोकून रात्रींचा मी तिथंच जाऊन झोंपूं लागलों. अशा रीतीनं सर्व कांहीं आता सुरळीत चालल्याप्रमाणं वाटलं, तोंच एक दिवस पॅर्ट्रिज अन् डिमेलो ('अग्रणी' ता. २४।१२।४४ चा विशेषांक पहा) सहज फिरत फिरत तलावावर आले, अन् 'रात्रींचीं पिकांत डुकरं येतात अशी वर्दी तुमच्या गड्यांकडून आम्हांला मिळाली. आम्ही दोघं पाळीच्याकडेच्या बारीवर रात्रींचे येऊन बसलो तर तुमची कांहीं हरकत नाही ना ?' असं त्यांनीं मला विचारलं.

'बेलाशक !' त्यांना मीं म्हटलं, अन् त्याच रात्री ते दोघेही तलावाच्या पाळीच्या आडोशाला आपापल्या रायफली सज्ज करून बसून राहिले. त्या रात्रीं त्यांना कांहीच लभ्यांश झाला नाही, पण पुन्हां दुसऱ्या दिवशी ते त्याच बारीवर येऊन ठाण मांडून बसले.

मध्यरात्र उलटून गेली. पहांटेचा गार वारा वाहूं लागला, अन् रानजनावरांचा वखत टळून गेला असं वाटल्यामुळं रखवालदार गडीही आपापल्या ठिकाणी डुलक्या घेऊं लागले. मीही, बंदुकींतलीं काडतुसं काढून टाकून बंदूक केसमध्यें ठेवून दिली अन् जरा कुठ आडवा झालो तोंच, सडकेच्या बाजूच्या बारीवर खाड्खाड् दोन आवाज घुमलेले माझ्या कानांवर आले. ताडकन् मी कॉटवरून उठलों, काडतुसांचा बेल्ट गळ्यांत घातला अन् बंदूक घेऊन पळतच पॅर्ट्रिज असलेल्या बारीकडं निघालों. आवाज ऐकून गडीही घाबऱ्या घाबऱ्या त्या बारीकडेच निघाले होते. आम्हीं सारे पॅर्ट्रिज असलेल्या बारीपाशीं आलों अन् टॉर्च उजळून पाहूं लागलों, तों पॅर्ट्रिज अन् डिमेलो दोघेही पाळीवरून खालीं उतरून तें लागलेलं जखमी जनावर मक्यांत कुठंतरी धडपडत होतं त्याला धुडीत असल्याचं आमच्या नजरेला पडलं.

" नशीबवान् लेकाचे ! आल्याआल्याच त्यांना फर्मास शिकार मिळाली." मी माझ्या माणसाना उद्देशून उद्गारलों.

आम्ही सारेजण आतां त्या लागलेल्या सावजाचा तपास करू लागलों. इतक्यांत मक्याच्या एका ताटाच्या कांहीं पानांवरून बरंचसं ताजं रक्त उडालेलं माझ्या दृष्टीस पडलं. ठिकठिकाणी मकाही पार लोळून गेलेला आम्हां सर्वांच्याच दृष्टीस पडला. त्यावरून सावज जवळच कुठं तरी पडलेलं असावं असा आमचा तर्क झाला. मका वारीत वारीत आम्ही थोडेसेच पुढं सरलों. तों मक्याच्या एका डामक्यांत डुकराऐवजीं मागला फरा मोडून पडलेली एक जवान ताजी गाय आमच्या नजरेस पडली !

"नाना बामनाची गाय कीं ही ! रातचं जित्राब मोकार सोडायची आदतच पडून गेलेली हाये इथल्या बामनांना. पन त्यांची ही आदत आज त्यांच्याच आंगलट आली की !" मोत्या रामोशी आवेशानं उद्गारला.

त्यांची ही आदत त्यांच्या नव्हे, पण माझ्या अंगलट येणार असं मला आतापर्यंतच्या अनुभवांवरून वाटूं लागलं. विनाआयास-बसल्या जागेवर शिकार लाभण्याच्या आशेनं, बारीवर बसण्याबद्दल पॅट्रिज सहजासहजीं मला विचारतो काय, मी लगेच त्याला हो म्हणतों काय, अन् डुकराऐवजीं अवचुकून गाय येऊन माझ्या पिकात जखमी होऊन पडते काय ! सर्वच कांहीं अजब अन् अतर्क्य. माझ्याविरुद्ध कट केल्याप्रमाणं नाही तिथून विघ्नं येऊन अलीकडे माझ्या राशीला लागत होतीं. सांप्रत घडून आलेल्या अनिष्ट घटनेशी माझा बादरायणसंबंधसुद्धां जडवून जडण्यासारखा नव्हता, पण एकाद्या दोषी गुन्हेगाराप्रमाणं मला निष्कारणच त्या गोष्टीची हुरहूर लागून राहिली होती. पुष्कळ वेळ काथ्याकूट करीत आम्हीं त्या जखमी झालेल्या गाईच्याभोंवती बसून राहिलों होतों. अखेर, झाल्या प्रकाराबद्दल दिलगिरी दर्शवून पॅट्रिज

आपल्या दोस्तासह आपल्या मकाणाकडे चालता झाला अन् मीही दिग्मूढ होत्साता जड पावलांनीं माझ्या मळ्याकडे निघालों.

घडलेल्या अपघाताची वर्दी त्या गाईच्या धन्याला द्यावयास माझ्या माणसांना बजावूनच मी घरी आलों होतो त्याप्रमाणं उजाडल्यावर माझ्या माणसानीं गांवांत जाऊन गाईच्या मालकाला वर्दी दिलीही. आणि न चुकतां दोहीं कानशिलावर गोपीचदनाच्या धवल मुद्रा ठोकणाऱ्या आणि गळां तुळशीच्या मण्यांची माला धारण करणाऱ्या त्या गाईच्या ह भ. प. धन्यानं, माझा गडी सांगत असलेल्या वस्तुस्थितीकडे हेतुपुरस्सर डोळेझांक करून गेटावर अन् पो पाटलाकडे, ' मीं गाईला गोळी घातल्याबद्दल ' लेखी फिर्याद दाखल केली, इतकच नव्हे तर, दौंडास पो. स इन्स्पेक्टर यांच्याकडेही अर्ज घेऊन एक मनुष्य रवाना केला.

माझ्या अटकळीप्रमाणं अन् अपेक्षेप्रमाणच सारं कांहीं तंतोनत घडल त्या गाईच्या धन्यानं दिलेल्या फिर्यादअर्जीमुळं माझं कांहीच वांकडं होण्या-सारखं नव्हतं, पण विकत घेतलेल्या या श्राद्धाचं सव्यापसव्य करायची पाळी माझ्यावर फुकाफुकीच आली होती अन् त्याचा तर मला आतां कंटाळा येऊन गेला होता.

उदास मनानंच मी आपलीं नित्यकर्मं आज उरकीत होतों. माझं सारं लक्ष तळ्याकडे अन् गांवाकडे लागून राहिलं होतं.

जेवण झाल्यावर एक विडी शिलगावून मी दारांतच उभा राहिलों होतों. तों वेताळ्या रामोशी अन् माझ्या शेजारींच रहात असलेले दोघे माळी असे तिघे बरोबरच गांवाकडून आले अन् त्यांनीं मला गांवाकडील इत्थंभूत हकी-गत सांगितली. " समद्या गांवभर तुमच्याच नांवाचा बोभाटा झालाया आन् तळ्याकडे मानसांची निसपत रीघ लागून गेलीया. पो. पाटील, हवालदार

आन् पंच वगैरे गावकरी मंडळी इकूत्यांतच पचनामा करूनशान् गांवाकडे फिरलीं आन् मंगच आम्ही इकडे मळ्याकडे निघालों. अर्जामंधीं जनू गाय गोळी घालून मारली अस नाना बामनान लिव्हल व्हतं, आन् गाय तर अजूनशान् जितीच हाय की ! पो. पाटलाची अन् बामनाची पंचनाम्याच्या वरतीं लई ठांटू उल्डी. हवालदारही, 'गाय रातची कशाला मोकळी सोडीत असता, माळकरी समदे असेच लुचे,' अस बामनाला लई लावूनशान् बोलला."

बिचारा हवालदार ! त्याला काय ठाऊक की, माळकरी लुचे नसून, पुष्कळसे लुच्चे लफंगेच माळा घालीन असतात म्हणून !

पाच साडेपांचचा सुमार झाला होता. गेटावर आपल्याला आज खास बोलावण होणार, असा संभव वाटल्यामुळ बाहेर कुठ पडायचच नाही असं मनाशी मी ठरवल होतं मुलं अगणात क्रिकेट खेळन होती, अन् त्यांना मी अंडरहॅन्ड बोलिंग टाकीत कुणीकडून तरी मनाची करमणूक करून घेण्यास पहात होतों. इतक्यात समोरच इनामाच्या बाधाशी हवालदार मजकुरांची स्वारी माझ्या घराच्याच रोखानं येताना दिसली. जवळ आल्यावर हंसत हंसतच त्यांनीं मला रामराम केला, अन् 'आमचं येणं आज कशाकरता झालं असेल हें न सांगतांही तुम्हीं ताडलच असेल,' असं ते मला थोड्याशा विनोदानंच म्हणाले.

'अर्थातच ! पण आम्हांला चहा तरी घेऊ देता की नाही,' मी—

चहा घेऊन आम्ही दोघेही ताबडतोब बाहेर पडलों 'जातां जाता पॅर्ट्रिजलाही पुकारतों, म्हणजे अनायासेच तुमचा हेलपाटा वांचेल,' मी.—

पॅर्ट्रिजच्या मकाणाशीं आम्ही आलों तों, तो आपल्या लेगहॉर्न् कोंबड्यांना आणि बदकांना शिपल्यांचा चुरा मिसळलेलं धान्य चारीत बसला होता.

'चल आतां गेटावर,' असं म्हणतांच कपडे करून तो आमच्याबरोबर निघाला अन् आम्ही तिघेही गप्पागोष्टी करीत गेटावर येऊन दाखल झालों.

फौजदारांना अभिवादन करून आम्ही तिथं जमलेल्या गांवकरी मंडळींच्या मेळाव्यांतच दाटीवाटीनं बसलों. गाईच्या मालकाचा आणि इतरांचेही जाब-जबाब बहुतेक पुरे होत आले होते. ते पुरे झाल्याबरोबर प्रथम माझा जबाब घेण्यांत आला. आणि माझ्या जबाबांत, 'गोळी पॅर्ट्रिजच्या हातून लागून गाय जखमी झाल्याचं' विधान बाहेर पडल्यामुळं आतां पॅर्ट्रिजचाही जाब घेण्यास सुरुवात झाली. 'रानडुक्कर समजून मी गोळी घातली. पहांटे अपरात्रीं इथले गांवकरी लोक लोकांच्या पिकांतून गुरं सोडतात हें मला ठाऊक नसल्यामुळं सदर अपघात घडला त्याला माझा इलाज नाहीं, अन् त्यांत माझी कांही चूकही नाहीं.'' असं त्यानं आपल्या जबाबात साफसाफ सांगितलं.

एक प्रदीर्घ निश्वास टाकून फौजदार आतां त्या गाईच्या धन्याकडे वळले. ''पॅर्ट्रिजच्या हातून गाय जखमी झाल्याची वर्दी तुम्हांला फडतरे यांच्या माणसाकडून सकाळींच मिळाली होती कीं नाही; गाय जिवत असून, ती ठार झाल्याचं फिर्यादअर्जीत तुम्हीं कसं नमूद केलंत, ( फौजदार येईपर्यंत ती खलास होईल असा तुमचा कयास असावा ) रात्रींच्या वेळीं गाय तुम्ही नेहमीं मोकळी सोडीत असतां की नाहीं ?'' वगैरे वगैरे अनेक प्रश्न विचारून त्यांनीं बिचाऱ्या त्या गरीब गाईच्या अश्राप धन्याला छेडून हैराण केलं. रात्रींच्या वेळीं गाय व शिंगी मोकाट सोडण्याचा त्यांचा शिरस्ताच असल्याबद्दल त्यांनीं आणखी कांहीं मळेकऱ्यांचे जबाब घेतले. असा एकंदर रागरंग पाहून मनांत तो गाईचा धनी अगदीं विरमून गेला. शेवटीं "मी आपला अर्ज परत घेतों,'' असंही तो अर्जदार सात्त्विक ब्राह्मण फौजदारांना म्हणाला. इतका वेळ असलेलं चुरशीचं वातावरण पार लोपून जाऊन गेटांत आतां खेळीमेळीचं वातावरण निर्माण झाल होतं, अन् त्या वातावरणांत आतां

मधून मधून होणारा हास्यध्वनिही मिसळून जात होता. तास दीडतास फौजदारांनीं आम्हां सर्वांना उगाचच गेटांत बसवून ठेवलं होतं. गप्पांच्या भरांत गाईच्या त्या भोळसट यजमानानं, "मी अर्ज देणारच नव्हतों हो, पण अमक्या अमक्याच्या आग्रहाखातर मला तो देण भागच पडलं," असं प्रांजलपणानं कबूल केलं. फौजदारांनीं त्याच्या प्रांजलपणाची ओतप्रोत तारीफ केली अन् अशा रीतीनं तो अर्ज अखेर निकालांत निघाला.

दरसालपेक्षां उन्हाळ्याची कमान यंदां चढतीच असल्यासारखं वाटत होतं. संध्याकाळच्या वेळीं गांवकरी मंडळी मजेनं गांवानजीकच असलेल्या त्या हिरव्यागार तलावावर हवा खाण्यासाठीं येत. वैशाख सरत आला होता अन् दोन्ही तलावांतली पिकं आतां हातातोंडाशीं आल्यासारखींच होती. एवढी यातायात केल्याच आतां कांहींतरी चीज होईल असं वाटूं लागल्यामुळं मी अलीकडं निश्चित होतों. लिलांव घेतल्यापासून माझे दिवस स्वस्थतेनं असे गेले असतील तर ते एवढेच

ज्येष्ठ नुकताच निघाला होता. नदीनाले कोरडे ठाक पडले होते, अन् मळ्यामळ्यांनीं असलेल्या भरपूर पाण्याच्या विहिरीही 'एक पारगावर' आल्या होत्या. वारा वाहूं लागला तरी बरीच रात्र पडेपर्यंत, सारा दिवस तप्त झालेल्या जमिनी निवत नव्हत्या. तोंडं वासलेलीं हरणं पाण्याच्या आशेनं मळ्यांभोंवतीं भोंवतींच घुटमळत होतीं. अन् काय आश्चर्य! भूतदयेनं प्रेरित होऊनच कीं काय, मळेकऱ्यांचीं अर्धपोटीं कुत्रींसुद्धां आतांशा त्या तान्हेल्या हरणांवर धांवून जात नव्हतीं!

रोहिणी लागून पांच चार दिवस लोटले असतील नसतील. तळ्यांतल्या कलिंगडांवर मुलांमाणसांसह आडवा तिडवा हात मारीत मी माजघरांतच बसलों होतों. कलिंगडांचा फन्ना पाडल्यावर घरांत फार गदमरल्यासारखं वाटूं लागलं म्हणून मी विड्या व काड्यांची पेटी घेऊन अंगणांतल्या लिंबा-

च्या गारव्याला जाऊन बसलों. सकाळपासूनच वारा अगदी पडला होता. उकाडा बेहाय होऊं लागला अन् बघता बघतां आकाशात कृष्णमेघाची गर्दी दाटूं लागली. अंतराळांत घोडे ( कुणी त्यास चतुर म्हणतात ) टोळधाडीप्रमाणं तरंगत फिरू लागले अन् पावसाचा चागलाच रंग दिसूं लागला. 'पाऊस पडून तलाव भरून गेले तर?' माझ्या पोटात एकदम धस्स् झाल तलावांच्या बाबतींत आतांपर्यंत ज्या घटना घडल्या होत्या त्या मला भेडसाविण्यास खचीतच पुरेशा होत्या

संभाव्य भवितव्यतेचा विचार करीत झाडाखाली अस्वस्थ मनानं मी बराच वेळ बसलों होतों इतक्यात पाण्याचे टपोरे थेंब टपूटपां जमिनीवर ठिबकूं लागले, अन् थोड्याच वेळात एकादा उपसागर उपडा व्हावा त्याप्रमाणं अथवा अकाळविकाळ मेघाच्या टकरांनी आकाशच फुटाव त्याप्रमाण वरून धूसर वर्षाव वर्षू लागला!

तलाव भरून पिकं बुडून गेल्याची वार्ता मला कुणी देण्याची आवश्यकताच आता राहिलेली नव्हती नव्या तलावाच्या सांडीपासूनच उगम पावलेला तो नदीवजा ओढा दुथडी भरून माझ्या मळ्याच्या लगत्यानंच वहात होता अन् पुराच्या त्या पाण्याचा धो धो ध्वनि घरात बसल्या बसल्याच माझ्या दोन्हीं कानावर आघात करीत होता

   

तलावाच्या कडेकडेचा कांही माल माझ्या माणसानी जमा करून ठेविला होता तो वाहून आणण्यासाठी भाड्याच्या गाड्या बघण्यास मी आसपासच्या वसत्यांवरून गेलों होतो. तेथून परत येतांक्षणीच माझ्या लहानग्या मुलीची हत्या मजकडून कशी घडली ती, आणि नंतर इं. पि. कोडाच्या ३०२ व कलमान्वयें मनुष्यवधाच्या आरोपाखालीं मजवर भरण्यात आलेल्या खट-

ल्याची आणि अखेर मी दोषमुक्त होऊन सुटल्याची सविस्तर हकीगत 'एक दुर्दैवी घटना' या मथळ्याखालीं '**रानोमाळ**'* या माझ्या पुस्तकांत येऊन गेलीच आहे

*'रानोमाळ' मध्ये माझ्या मुलीच्या मृत्यूची ता. २५ जून ही पडलेली तारीख चुकीची असावी असें वाटते. कारण ता ७ जूनलाच मृग नक्षत्र निघते आणि त्यावेळी तर रोहिणी नक्षत्र होते.

## सयनी

## २

मावळांत बरसातीला सुरवात झाली कीं, तिथलीं खिल्लारांचीं मेंढरांचीं खांडं हललींच. जास्त पावसांत या जातीचीं जित्राबं दम काढीत नाहींत. या मेंढरांच्या जातीला चाराही अगदी आंखूड लागतो. देशावर पाऊस कमती असतो, म्हणून पावसाळ्यांत जिथं चराऊ रान अन् पाण्याची सोय चांगली असते तिकडं हीं खिल्लारं पळतात.

पाटसास चराऊ रान विपुल, अन् पाण्याची सोयही उत्कृष्ट. शिंदेशाहींत-ला मोठा जुना तलाव, अन् ब्रिटिश सरकारनं लष्करी हालचालींच्या सोयीसाठीं, गांवानजीक सोलापूर सडकेला लागूनच बांधलेला नवा तलाव, असे दोन तलाव असल्यामुळं, इथल्यासारखी सोय इतरत्र क्वचित.

असं असल्यामुळं बरसातीच्या दिवसांत, पाटसाचं सारं पडीक शिवार अन् डोंगरपठार मेंढरांच्या वर्देळीनं गजबजून गेलेला असतो.

पाटसास अगोदर लांडग्यांचा रहिवास पुष्कळ, अन् हीं खिल्लारांचीं खांडं मावळांतून इकडं आलीं की, त्या खांडांच्या वासावर असलेले हे प्राणी त्यांच्या पाठोपाठ हटकून ठेवलेलेच. यामुळं आमच्या गावाला या दिवसांत, या श्वापदांपासून बराच उपद्रव पोहोंचतो. कुणाच्या तरी शेळ्यामेंढ्यांच्या खांडांतलं करडूं कोकरू मारलं नाहीं असा दिवस काहीं मावळायचा नाहीं. केव्हां केव्हा तर, या श्वापदांना चांगला फाक्या पडलेला असला कीं, कुत्र्यांना न जुमानतां ते बेलाशक वाडग्यातून उड्या घालून मेंढरांचा फडशा पाडतात, अन् गुरांच्या गोठ्यांतून असलेलीं लहान लहान वासरंसुद्धां, त्यांच्या गळ्यांतल्या दोऱ्या करंडून पळविल्यावांचून ते रहात नाहींत.

   

बिरोबाची वाडी माझ्या मळ्यापासून दीड मैलावर दौंड रस्त्याला लागूनच, पण डोंगराच्या साधारणतः पायथ्याशींच असल्यामुळं, अन् झुडपांची दडण पुष्कळ असल्यामुळं, या दिवसांत त्या वाडीला लांडग्यांपासून फारच उपद्रव पोहोंचतो. या वाडीवर बहुतेक वस्ती धनगराचीच. तिथं स्थायिक झालेले ते धनगर शेती तर करीतच, पण प्रत्येकापाशीं शेळ्यामेंढरांचं लहानमोटं खांड हें असायचंच.

एक दिवस, वाडीचे पांचचार धनगर जमून माझ्या मळ्यावर आले, अन् 'अलीकडं आम्हां वाडकरांना या लांडग्यांनीं फारच सतावलं आहे,' म्हणून विवळूं लागले. 'चारदोन दिवस बंदूक घेऊन मी त्या रानांत कुठं तरी बसावं, अन् त्या लांडग्यांना एकवार धुडवून लावावं, किंवा सपाट्यांत आल्यास त्यांतला एकादा मारावा' अशी त्यांची आमना दिसली. मीं त्यांचं

म्हणणं तात्काल कबूल केलं. पण, 'त्याकरितां एकाद दुसरं मेढरू बळी द्यावयास तुम्ही तयार आहांत काय!' असं विचारतां, ते धड माझ्या म्हणण्याला रुकार देईनात की स्पष्टपणान नकारही देईनात! लांडग्यांनीं नित्यश केलेली नुकसानी त्यांना परवडत होती. पण त्यांच्या मागचा हा नित्याचा उपद्रव नाहीसा करण्याकरिता अवश्य असलेली थोडीफार नुकसानी सोसण्याचं मात्र त्यांच्या जीवावर आल्यासारख दिसलं उघड्या डोळ्यानीं प्राण जावयास हवाना! पदराला खार न लागतां, आपला कार्यभाग उरकावा असं त्याना वाटत होतं; अन् त्यांच तें वाटणं व्यवहाराला धरूनच होतं. पण जगांतले सगळेच व्यवहार असे बिनखर्ची होत असते तर काय पाहिजे होत?

'माझ्या आदबण्याचा कांहींतरी उपयोग झाला पाहिजे तुमच्या मनाची तशी तयारी नसेल तर मला कशाला फुकट तकलीफ देतां?' मी त्यांस म्हणालों.

आपापसात बराचसा खल केल्यावर शेवटी ते माझ्या म्हणण्यास कबूल झाले.

"मला पुण्यास जायचं आहे, तिथून आल्यावर पाच चार दिवसानी तुमच्या म्हणण्याप्रमाणं मी रोज रानांत येत जाईन तुम्हांस तशी आगाऊ सूचना देईन. तुम्हीं डोंगराच्या उतरणीला, माळावरच नेहमींप्रमाणं मेंढर चारीत रहा. एकादं मेंढरूं श्वापदांनी घेरलं तरी त्याला सोडवण्याकरतां धांवू नका, अगर गलबल करू नका. तुमच एकादं मेंढरू जाईल, पण त्याची भरपाई मी तुम्हांला, जिवाला जीव घेऊन करून देईन, हें निश्चित् समजा"

पदरांत बांधून आणलेली दोन तीन शेंदाडं त्यांनी भेट म्हणून मजपुढं ठेवलीं, अन् पुन्हां मला रामराम घालून ते सगळे धनगर वाडीकडे परतले.

   

दोन तीन दिवसांनी पुण्याहून मी माघारा आलों. एस्. जी., अन् एल्. जी., काडतुस सरलीं होती, ती येतांना बरोबर आणलीं, अन् आणखी दोन दिवस गेल्यावर, 'आज शिरवळ पडण्याच्या सुमारास मी रानांत येतों' अशी वाडकरांस सूचना पाठवून दिली.

दिवस कलण्याचा सुमार झाला. ऊन्ह उतरूं लागलं होत. चहा घेऊन मी खांद्यावर बंदूक टाकली अन् वाडीकडं निघालों सडकेवरच दोघे तिघे वाडकर माझी वाट पहात बसले होते. त्यांना पुन्हां अवश्य त्या सूचना देऊन, मी एका खोल ओघळींतून खिंडीच्या सुमारानं निघालों. माळावर मेंढरं इतस्तत. चरत होतीं. मला कुठं तरी, तिथल्या एकंदर हालचालीवर नजर राहील अशा बेतानं बसणं भाग होतं. खोल ओघळींत बसून तर भागण्यासारख नव्हतं पण, प्रसंग पडल्यास ओघळ जवळ करतां यावी अशा सोयीस्कर जागींच बसावयास हव होत. त्याप्रमाणं मीं केल, अन् एका दाट तरवडाच्या झुबक्यांत, एकाद्या जगली श्वापदाप्रमाणं छपून राहिलों. बराच वेळ मी अशा रीतीन बसून राहिलों होतों. आता गडद पडण्याचा सुमार झाला. पण कुठं कांही नाहीं ! चरणावर एकदोन ससे निघालेलं मीं पाहिले, पण आज त्यांचा लोभ धरून चालण्यासारखं नव्हतं. दरोबस्त मेंढरांचीं खांड आतां वाडीकडं परतलीं, अन् मग मीही माझ्या मळ्याकडं परतलों.

* * * *

कालच्या प्रमाण आजही मीं आपल्या कामगिरीवर रानात निघालों. कालच्या ठिकाणींच झुडपांच्या झुबक्यात जाऊन बसलों, अन् कालच्या प्रमाणंच गडद पडल्यावर मळ्याकडं परतलों. सगळं कांही कालच्याप्रमाणंच घडलं सांगण्यासारखं विशेष असं आजही कांहींच घडलं नाहीं.

* * * *

रविवार होता आज. जरा लवकरच आज मी बाहेर पडलों. सडकेवर रोजच्याप्रमाणं वाडकर कुणी आढळले नाहींत. मी तसाच पुढं निघालों. मेंढरांचीं खांडंही आज एका ठिकाणीं जमून नव्हतीं. फक्त एकच खांड खिंडीच्या अलीकडं माळावर चरत असलेलं दिसलं, अन् आश्चर्याची गोष्ट म्हणजे, कुणी-तरी एकटी आवाच त्या खांडामागं होती !

मेंढरं वळणाऱ्या त्या सडया बाईच्या धिटाईचं मला नवलच वाटलं; अन् भलाबुरा प्रसंग आल्यास ही एकटी बाई काय करील, असा मनाशी विचार करीत रोजच्यासारखा मी आपल्या ठराविक जागीं जाऊन बसलों.

अर्धा एक कलाक झाला, अन् दोनतीन माळठिसकीं ( लहान जातीची हरणं ) माझ्या अगदीं नेटांतून वाफडत वाफडत तामखडयाच्या बाजूला निघून गेलीं.

त्या धनगरणीनं मला खिंडीकडं जातांना पाहिल होतं, पण सावजासाठी मी आज दोन तीन दिवस रानांत येऊन बसत असतों, असंही तिच्या कानां-वर गेलेलं असावसं वाटतं ! एरवी, इतक्या निर्भय चित्तानं, अन् त्यांतून बाईमाणूस–शिरवळ पडण्याच्या सुमारास अशा ओशाडीला मेंढरं चारीत बसणं सुतराम अशक्य होतं.

   

ती स्त्री एकेक मेढरूं पकडून, त्यांच्या पायांना झोंबलेले गवताच्या कुसळांचे पुंजके काढीत बसली होती अन् मीहि माझ्यासमोरच चाललेली दोन सरडयांची चुरशीची लढत बघत बसलों होतों. मिनिटामिनिटाला ते दोघेही वीर स्वतःच्या कायेवरले रंग पालटीत होते, अन् मानेवरले काटे ताठ उभारीत, अन् फुगवतां येईल इतकी गर्दन फुगवीत आव्हान दे देऊन –परस्परांवर तीव्रतर हल्ले चढवीत होते कुणींच कुणाला हार जात नव्हता.

दोन दोन पवित्रे मागें सरून, एकमेकांकडे त्वेषानें बघत क्षणभर ते उसंत खात. अन् माना खालीं वर लचकवितां लचकवितां कांहीं तरी निर्णय घेतल्यासारखें करून पुनरपि ते एकमेकांवर धांवून जात. माणसांप्रमाणं शिस्तींत माघार घेण्याची कला त्यांना अवगत झालेली नव्हती. ती त्यांना त्यांच्या लष्करी शाळेंत कुणीं शिकविलेलीच नव्हती. बेशिस्तपणानं गर्दन तुटेपर्यंत लढणं एवढंच त्यांना ठाऊक होतं।

एकाग्र चित्तानं मी त्यांचं द्वंद्व पहात बसलों होतों इतक्यांत, इतका वेळ सुसमाळ चरत असलेल तें मेंढरांचं खांड एकदम उधळल्यामुळं माझं लक्ष तिकडं वेधलं. त्या खांडाच्या दोही बगलांनीं दोन लांडगे मुरत मुरत पुढं सरत होते, अन् एक लांडगा मधूनच घुसून, भेसूरपणानं दांत विचकीत त्या मेंढरं राखणाऱ्या धनगरणीला भेडसावीत होता. ती धनगराची पोर बिलकुल न डगमगतां तोंडानं शिव्या हासडीत दोहीं हातांनीं त्या लांडग्यांकडे दगड भिरकावीत होती. अन् तितक्यापुरतंच अंग चुकवीत चुकवीत, पण परत न फिरतां एकेक पवित्रा त्यांचा पुढं पुढंच पडत होता! बंदुकीचे दोन्ही ट्रिगर उघडून, मी माझ्या बाजूला असलेल्या लांडग्याच्या रोखानं आतां निघणार तोंच, ओघळीच्या पलीकडच्या डगरीवर, अगदीं मोहरा करून निघण्याच्या तयारीनं उभे असलेले आणखी दोन लांडगे माझ्या नजरेस पडले! निमिषमात्र मी थबकल्यासारखा झालों. तोंच ते दोन्हीही लांडगे झपाट्यानं ओघळ उतरून अलीकडच्या दरडीवर येऊन दाखल झाले! त्यांचा कावा तत्काल माझ्या ध्यानांत आला, अन् त्यांच्या धूर्तपणाचं मला परमावधीच आश्चर्य वाटलं. मानवी प्राण्यांमध्यें असलेली संघटनेची कल्पना त्या जंगली प्राण्यांमध्यें खासच असली पाहिजे. त्याशिवाय चारपांच लांडगे अशा रीतीनं एकजुटीनं विशिष्ट मतलबासाठीं गोळा होणं, ही यदृच्छेनं घडून आलेली घटना म्हणतां येणार नाहीं! त्या खांडाची दाणादाण उडविण्या-

करितां, अन् मेंढरं राखणाऱ्या त्या बाईस भेडसावण्याकरिता त्यानीं तिघांस पुढं रवाना केल होतं, अन् एकादा कुशल सेनापति निर्वाणीच्या प्रसंगी उपयोग व्हावा म्हणून ज्याप्रमाणं राखीव सैन्य माग ठेवतो, त्याप्रमाणं संधि सापडनांच, त्या कळपातल एकाद्दुसर मेंढरू लांबवण्यासाठी ते दोन लाडगे मागं थोपून राहिले होते!

दिवस बुडण्याचा सुमार झाला होता. मेंढराच्या खांडामागं एकटी एकच बाई असलेली त्यांच्या तीक्ष्ण दृष्टीला दिसत होती, अन् तें मेंढराच खांड खिंडीच्या बाजूला ओसाड माळावर अगदीं एकीकडे असं आज त्याना सांपडलं होतं. आणीक काय हवं? 'आज शिकार आपल्या बापाची!' समजून बेहोषपणानं, जिभळ्या चाटीत ते दोन्ही लांडगे दरडीवर त्या खांडावर नजर खिळवून उभे होते. त्यांचा काळ त्यांच्या अगदी सन्निध येऊन ठेपला होता, पण त्याची त्याना यत्किंचित्सुद्धां खबर नव्हती! लवणालवणानं–बसत बसत–मी ओघळीत शिरलों, अन् त्याच्या अगदी नेटांत येऊन अन् त्यांना चागले आडवे घेऊन त्या दोघावरही मी दोन एल् जी. शॉट्स् टाकले

अवचित बंदुकीचे बार कानीं पडताच, खाडावर प्रथम धांवून गेलेले ते तिन्ही लांडगे कमालीचे भेदरून गेले, अन् त्या खांडामधूनच पार होऊन पलीकडच्या माळावर निघून डोंगराच्या बाजूकडे दिसेनासे झाले.

'मेले एकदांचे चंडाळ' असं म्हणत म्हणत ती धट्ट पोरगी त्या मरून पडलेल्या लांडग्यांच्या जोडीपाशीं येऊन उभी राहिली, अन् विलक्षण चमत्कारिक तऱ्हेनं त्यांच्याकड बघत तिनं आपल्या दोन्ही हातांचीं बोटं–एका मागून एक–हात एकदम दाबून काडकाड मोडलीं!

   

‘ तूं कुणाची कोण ? अन् तुला एकटीलाच घरच्या माणसांनी मेंढरांमागं कशी लावली ? ’ मी—

‘ बाळा चोरांबल्याची ल्येक मी. माझ्र सासर पञ्चाल शेरीच्या वाडीला हाये. माझ्या नवऱ्याचबी मेंढराच मोठं खाड हाये अन् माझी धाकली नणद अन् मोच मेंढरामागं असते वाडीची जत्रा व्हती म्हून चार दिवस माझ्या बापान मला बोलावलं व्हत. ’

‘ तुझा बाप मोठा वस्ताद माणूस दिसतो. तुला माहेरपणाला आणून तुझ्या गळ्यात हे मेंढरं वळायच काम घातलन् होय ? ’ मी—

‘ तसं न्हव. आज लई दिस सौंदराला चार घाल घालूनशान माझा बापुस म्वाट हानीत व्हता. पुन चार घालायाबी साठ राह्यला न्हाय, त्यव्हा वाख आनाया त्यो गेलाय् बाजाराला. म्हनूनशान त्यानं मला मेंढरांमागं लावली, अन् साजचं तुम्ही रानांत येनार आहां असबी त्यो म्हंगाला. ’

‘ अस होय ’ ? मी—

इतस्तत. पागलेली मेंढर तिन अन् मी एके जागी गोळा केलीं. क्षणभर बारीक नजरेन त्या मेंढराकडे पाहून, ‘ समदी हायेत की ! ’ असं ती म्हणाली, अन् मग आम्ही वाडीच्या रोखानं निघालों.

सडकेपाशी आल्यावर, ‘ मी जातो आता मळ्याकड, तूं निर्धास्तपणान जा, ’ असं मी तिला म्हणालों. पण, ‘ वाडीपर्यंत मला घालवाया या, त्या चंडाळांचं मला भ्या लागतं, ’ असं ती पोरगी म्हणाली. म्हणून मीं थेट तिला तिच्या वाडग्यावर नेऊन घालविली. तिनं वाडग्यांत मेंढरं कोंडलीं अन् वाडग्याचा झाप लावून घेऊन ती मला म्हणाली, ‘ तात्या, वाइच उभं रहा. मी तुम्हांला खंदील आनूनशान देते. ’

'मजजवळ आहे कंदील.' असं म्हणून मी खिशांतला टॉर्च काढला, अन् तिच्या तोंडावर शिस्त धरून मी तो उजळला. त्याबरोबर, 'याऽऽ बया!' असं म्हणून ती मोठ्यानं हंसली. तिच्या तोंडावरलं तें गांवढळ हास्य मला मोठं मजेदार वाटल. निघतां निघतां मी तिला म्हणालों—'तुझं नांव विचारायचं विसरलोंच कीं'!

'माझ नांव व्हय! सयनी!'

## पिग् स्टिकिंग नं. १

## ३

फार वेगानं वरून फेकला गेला होता तो, तरी बिलकुल इजा पोहोंचली नव्हती त्याला!

विशेष असं काहींच घडलं नाहीं अशा आविर्भावानं झटकन् उठून तो उभा राहिला. तुमानीवरला अन् अंगांतल्या तोकड्या बाह्यांच्या शर्टवरला फुफाटा त्यानं झडझडून झाडला, अन् याकूबनं पुढं आणून उभ्या केलेल्या आपल्या घोड्यावरल्या सायडलचा तंग त्यानं त्याला खोलावयास सांगितला. याकूबनं सायडलचा तंग खोलतांक्षणींच ब्रूसनं घोड्याच्या पाठीवरलं सायडल अलगद उचलून घेतलं, अन् उपडं करून पाहून त्यानं तें दूर भिरकावून दिलं. घोड्याच्या पाठीला चिकटून बसलेला सायडलखालचा पातळ नमदा मग त्यानं हलूवार हातानं काढून घेतला. तोहि त्यानं उलटा करून पाहिला. त्या

पांढऱ्याशुभ्र नमद्यावर दोन तीन रक्ताचे बारीक डाग पडलेले त्याच्या दृष्टीस पडले, अन् त्याबरोबरच, त्या लाल रक्तापेक्षांहि लाल रक्तिमा त्याच्या हिरव्याचार अशा डोळ्यांतून उतरली !

तें उमदं जनावर अजून थयथय् नाचतच होत. त्याला चुचकारून चुचकारून त्यानं त्याला जरा शात केलं, अन् त्याच्या पाठीवरनं आपला हलका हात हळुवारपणान फिरवतां फिरवता, त्याच्या पुष्ट पाठीत रुतून बसलेला सराटा टचूकन् उपसून, दोन बोटांच्या चिमटींत घेऊन अन् तो याकूबच्या डोळ्यासमोर धरून, त्यानं फारच जोराची एक बुटाची ठोकर याकूबच्या कमरेत लावली !

   

किंचित् लेट आलेली 'सिक्सटीन् अप्' प्लॅटफॉर्मेला लागली. तत्काल माझ्या शिकारी पाहुण्याच्या घोड्यांची–अगदी शेवटी असलेली–व्हॅन् अलग झाली, अन् लेट झाल्यामुळं एक दीर्घ निश्वास टाकून, रागारागानं फूत्कार सोडीत मोठ्ठ्या फणकाऱ्यानं ती आली तशी निघून गेली.

आलेल्या नोकर लोकाची अन् जनावराची व्यवस्था लावता लावता दिवस निघून गेला अन् आतां त्या गोऱ्या शिकारी पाहुण्यांची वाट बघत, लिंबा-खालच्या झोंपाळ्यावर मुलाबरोबर मी माझ्या मनाची करमणूक करून घेत बसलों होतों

ओसरीवरल्या घड्याळांत नवांचे ठोके पडले, अन् त्याबरोबरच माझ्या पाहुण्यांची मोटार प्रखर प्रकाशझोत फेंकीत एक गुलजार वळण घेऊन फाटकांतून सर्रकन् आत घुसली.

या चांडाळचौकडीचे पांढरे पाय आज अडीच वर्षांनीं पुन्हां आमच्या पाटसास लागले होते. ('रानोमाळ' या माझ्या पुस्तकांतील 'घोड्यावरची डुकरांची

शिकार' पहा.) त्यांनीं 'गन्सॉल्व्हिस्' नांवाचा आपला एक शिकारीचा शौकीन दोस्त या खेपेला आणखी बरोबर आणला होता. तो घोडयावर उत्कृष्ठ बसे. त्यानं एकदोनदां बदुकीनं डुकरांची शिकार केलेली होती, पण स्टिकिंगचा त्याला बिलकुल अनुभव नव्हता आल्याबरोबर त्यांनीं आपल्या या दोस्ताची ओळख मजशी करून दिली. ग्रामीण जीवनाशीं समरस होण्याची सवय नसल्यामुळ कीं काय, तो आम्हां मडळींत प्रथम जरा बुजल्या बुजल्यासारखाच वावरत होता

रात्रौ पाहुण्यांचा खाना वगैरे उरकल्यानंतर आम्ही सगळेजण खेळाच्या कार्यक्रमाचा आराखडा तयार करीत बसलों होतो. उदईक सकाळी खेळण्याचें ठिकाण पाहून यावयाचें, अन् एक दिवस विश्रांति घेऊन दुसरे दिवशी खेळावयाचें असें ठरले, अन् आणखी थोडयाशा इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर आम्हीं झोंपण्यासाठीं उठलों

   

पच पच उषःकालीच मी आज उठलों. पाहुण्याना त्यांच्या बिछान्यांतून जवळ जवळ ओढूनच काढलं म्हणाना! चहापाणी झाल्यावर, जनावरांवर सायडले चढावेण्यास सांगितली, अन् तोंवर सिगारेटा फुंकीत विहिरीच्या थारोळ्यावर आम्ही बसून राहिलों.

घोडे तयार झाले, अन् डाव्या हातात लगामाच्या रेना घेऊन आम्हीं सगळ्यांनीं रिकीबींतून पाय अडकविले. जिथल्यातिर्थं होऊन दहापाच कदमहि आम्ही हलला नाही, इतक्यांत ब्रूसच्या घोडयानं ब्रूसला एकाद्या चेंडूप्रमाण आपल्या पाठीवरून अलगद फेंकून दिलं!

दुसरा पाय रिकीबीत पुरता अडकविला नाहीं तोच, एकाएकीं जनावर

इतकं गरम झालेलं त्यानं उभ्या आयुष्यांत अनुभविलं नव्हतं, अन् म्हणूनच यांत कांहीं तरी चूक असल्याबद्दल त्याची बालबाल खात्री होती.

गावांपासून दूर माझं घर मळ्यांत होतं. बोलून चालून ही रानची वस्ती. इथं सराटे काय अन् काटे काय ! बिचाऱ्या याकूबला कांहीं तितकं धोरण राहिलं नाहीं, अन् त्यानं हलगर्जीपणानं सराटा चिकटलेला तो नमदा न झटकतां घोड्याच्या पाठीवर तसाच चढविला. तंग आवळतांवेळीं देखील ही गोष्ट त्याच्या ध्यानांत कशी आली नाहीं अन् तें जनावर तरी त्याच वेळीं कसं बिथरल नाहीं भगवान्–चू–चू–अल्ला जाणे !

ब्रूसनं रिकीबींत पाय अडकवितांच त्याच्या वजनामुळं सराटा त्या मुक्या प्राण्याच्या पाठींत जोरानं टोंचला, अन् उसळीसरसं ब्रूसला त्यानं आपल्या पाठीवरून फेंकून दिलं.

सुन्या पाठीनच वाफडत वाफडत सरासरीं एक फर्लांगभर तो गेला, अन् कान टंवकारून अन् चवरीप्रमाणं आपली शेंपूट वर धरून, आपल्या धूळ खाऊन उठलेल्या धन्याकडं मान वळवून तो विशिष्ट अनिर्वचनीय अशा भावानं पहात उभा राहिला ! आपल्या अंतरींचं दुःख सांगण्याला वाचा नसल्यामुळं त्या मुक्या प्राण्यानं हा सरळ सीधा मार्ग अवलंबिला होता !

तत्क्षणीं याकूब त्याच्या पाठोपाठ धांवला. याकूब येईपर्यंत आपल्या ठिकाणीं तें उमदं जनावर निश्चल उभं होत. याकूबनं नेऊन त्याला आपल्या धन्यापुढ उभं केलं. त्या नेकजात प्राण्यानं आपले टपोरे पाणीदार डोळे आपल्या धन्याच्या नजरेशीं भिडविले. जणूं काय, "यांत मजकडे काय चूक ?" असंच तो आपल्या प्रेमळ धन्यास खुलास दिलानं पुसत होता !

ब्रूसनं संतापाच्या भरांत याकूबला बुटाची ठोकर लावली होती. त्या जोराच्या लाथेसरसा कळवळून याकूब मटकन् खालीं बसला. आम्हीं सगळे

जवळच होतो म्हणून ठीक. नाहींतर ब्रूसनं बिचाऱ्या याकूबचा पार 'पीरपिद्दा' पाडला असता !

याकूबनं त्याचा घोडा ठाणावर नेऊन बांधला. ब्रूसहि लगोलग परत फिरला, अन् तिथल्या झाडाखालीं असलेल्या एका आरामखुर्चीत त्यानं आपलं अंग बेफिकीरपणं टाकून दिलं.

   

निरुपायास्तव ब्रूसशिवाय आम्हीं सगळेजण 'भोंवऱ्या' कडे (खेळाचें मैदान) निघालो. गेल्या खेपेला आम्ही 'भट्टीच्या आळ्यावर' खेळलों होतों. यंदां कमालीच्या प्रखर उन्हाळ्यामुळं, निवडुंगाच्या धगधगलेल्या धगींत रानडुकरांना दम निघेनासा झाल्यामुळं त्यांनीं स्थलांतर केलं होतं. भीमेच्या दक्षिण किनाऱ्यावर असलेल्या 'भोवरा' नांवानं सुप्रसिद्ध असलेल्या कुरणांत दलदलीच्या गारव्याला ती श्वापदं अलीकडे बिनघोर पडून असत. भट्टीच्या आळ्याभोंवतालच्या काळ्या कुळकुळीत जमिनीप्रमाणं जमीन भोंवऱ्याच्या आसमंतांत विशेषेंकरून नव्हती. जमीन हलकी–माळरानवजा–असल्यामुळं अर्थातच जमिनीला भळीहि फाटलेल्या नव्हत्या. उद्ईक आख्खा दिवस या मैदानांतच खेळायचं असल्यामुळं घटकाभर त्या मैदानांत घोडे कुदवून मग आम्ही मळ्याकडे परत फिरलों.

फाटकांतून आम्हीं आंत शिरलों तों, ब्रूससाहेबांची स्वारी, जातीनं बादलींतल्या गरम पाण्यात टुवाल बुचकळून अन् तो पिळून, आपल्या लाडक्या घोड्याची पाठ शेकत असलेली दिसली. त्यांच्या रागाचा पारा आतां बराच खालीं उतरलेला दिसला. बिचारा याकूब मात्र अजूनहि आपलंच अंग चोरीत एखाद्या नवथर चोरासारखा तिथं जवळच उभा होता !

   

हांके वगैरे आमची माणसें अन् शिकारीचा सर्व सरंजाम पहांटेच पुढें रवाना झाला होता. चांगलं फटफटल्यावर माग वगैरे सोडवून अन् इतर सर्व तयारी सज्जड करून ते लोक आमचीच वाट पहात बसले होते सैसलोकहि आमच्या पाठोपाठ तिथं येऊन दाखल झाले. त्याच्या स्वाधीन आम्ही घोडे केले, अन् घटकाभर आमच्या माणसांशी खेळासंबंधी वाटाघाट करीत आम्ही बसलों

नदीवर जाऊन सगळेजण नेहेऱ्या करून आले हातांतील तावडी हिरवीं निशाणें फडफडावीत बाहुटेवाले झाडांझाडांनी चढून बसले. वॉचमेन दोघे दोहींकडे निघून गेले, अन् हाकेहि नदीची कड धरून पश्चिम बाजूच्या एका बोळीवाटे हरमळीनें कुरणांत घुसले

हांक्यांच्या हांका सुरू झाल्या, अन् सायडलच्या तंगाचा एकेक काटा आणीक वर चढवून आम्हींहि आपापल्या वाहनावर आरूढ झालों.

गन्सॉल्व्हिस, बाउले अन् मी पश्चिमेस नाल्याच्या मुखापाशी उभे राहिलों. अन् जोन्स, ब्रूस अन् वेअर्स् असे तिघे पूर्व बाजूच्या एका कडेच्या बारीवर जाऊन उभे राहिले गन्सॉल्व्हिसला मी अवश्य त्या सूचना पुन्हा सुनवीत होतों. इतक्यात त्याच नवट घोडं उगाचच खूब मोठ्यानं खिंकाळलं !

"तुझं घोडं ऐनवेळी खेळाचा सत्यानाश करणारस दिसतं !" मी म्हणालों.

मी असं म्हणतांच, त्यानं झटकन् उजव्या हातातली स्टिक् डाव्या हातांत घेतली, अन् आपल्या घोड्याच्या कानशिलात एक सणसणीत चपराक ठेवून दिली !

घोडा हे जनावर खरं ! पण भारी शहाणं ! एकच चपराक खाल्ल्याबरोबर

त्यानं आपल्या अंगची खराब आदत तत्काळ टाकून दिली! खेळ खलास होईपर्यंत तें पुन्हां चुकूनसुद्धां खिकाळलं नाहीं कीं हिसलं नाहीं!'

   

दोन कासरे दिवस वर चढून आला होता. ऊन्हहि चांगलं चटकूं लागल होतं, अन् घामान चिंब झालेले आमच्या अगांतले सदरे अन् तुमानी, गरम वाऱ्याच्या लहरी पुनः पुन्हा सुकवून टाकीत होत्या नीर घालीत घालीत आंतले गडी जवळ जवळ आमच्या समांतर रेषेंत आले, अन् "दोनतीन टपकळ रानजनावरं [ रानडुकरं ] आपल्या खोपांतून उठून पुढे सरलीं आहेत, तुम्हीहि वाइच म्होरं आपली जागा चाळवून घ्या," असा, कडेवर येऊन त्यांच्यांतल्या एकदोघांनीं आम्हांला इषारा दिला.

तत्काल आम्हीं थोडे पुढे सरलों. आमच्या मांडीखालची जनावरेहि इषाऱ्यासाठी अधीर होऊन गेलीं होती इतक्यांत पुढें सरलेली तीं तिन्हीं रानजनावरं मधूनच एका अरुद बोळीवाटे बाहेर भडाडलीं, अन् आम्हींहि वेगानं त्यांच्या पाठोपाठ आपले घोडे फेकले

आम्हीं त्याना गाठतो न गाठतों तोंच, पूर्व बाजूच्या बारीवर असलेलं तें त्रिकूटहि येऊन तिथ भिडलं. "बगलेबगलेनं रहा, समोरून टोचूं नको" असा गन्‌सॉल्व्हिसला मीं पुन्हां एकवार इषारा दिला. जोन्सनं त्यांतल सर्वांत भारी जनावर प्रथम टोचल. तोंच त्याच्या पुष्ट शरीरांत आणखी दोन तीन भाले एकदम घुसले, अन् त्याबरोबर तें फारच भेसूर ओरडलं. त्यामुळ गन्‌सॉल्व्हिसचं नवशिकं घोडं एकाएकी बुजलं अन् त्यानं आपल्या धन्याला खेळाच्या ऐन दंगलीपासून दूरवर काढून नेलं. बाकीचीं दोन्हींहि रानजनावरे (डुकरे) कांहीं विशेष भारींतलीं नव्हतीं. फारसे सायास न पडतां मौजेनें खेळत खेळतच आम्हीं त्यांना जाम केलीं.

दुसरी उठावणी सुरू झाली. प्रखर ऊन अक्षरश· आगीच्या ज्वाळांप्रमाण चटकत होतं, अन् तप्त झळया यच्चयावत् प्राणिमात्रांना समधातपणानं होरपळून काढीत होत्या. आमचीं घोडी अंगाचा दाह होऊन राहिल्यामुळं एकेजागीं अशीं ठरेनातच. मागंपुढं सरत, वरचेवर ती जनावरे आपल्या शेपट्यांचे फटकारे आपल्या दोन्हीं अंगास सपासप फटकारीत आम्हासहि मधून मधून त्या फटक्याचा चमचमीत आस्वाद चाखावयास मिळे हौसेला मोल नाही म्हणतात तें खरं ! श्वापद लवकरच बाहेर पडतील अशी आशा आम्हाला होती, अन् त्या आशेमुळच, चहूंकडून पेटलेली पृथ्वी आम्हांला या ऐन मध्यान्हीच्या वेळीहि सर्दशीतळ भासत होती !

आम्ही आपल्या ठिकाणी बारीकड नजर लावून अगदीं तयारीन होतो इतक्यात गारमाळाच्या बाजून हरणाचा एक मोठा खाडवा उधळत उधळत कुरणाच्या रोखानंच येत असलेला आमच्या दृष्टीस पडला तात्काल आम्ही हाक्यांना मोठ्यान इषारा केला, अन् त्या खांडाच्या पाठलागावर वेगान निघालो.

जरा पुढे जातों तोंच ब्रूस आदिकरून मंडळीहि त्या खांडव्याच्या पिछाडीस येऊन थडकली· पाण्यावर निघालेला हरणाचा तो खांडवा त्या तिघा घोडेस्वारांना पाहून कुरणाच्या रोखानं निघाला होता. आपले वैरी या बाजूसहि आपली वाट अडवून बसले असतील अशी त्या तृषार्त जीवांना सुतराम् कल्पना नव्हती. पण, त्याच दुर्दैव आमच्या रूपानं 'दत्त' म्हणून साक्षात् त्याच्यापुढं येऊन उभ राहिलं ! उत्तरेच्या बाजूनं कुरणाची अडचण अन् पलीकडे रुंदच रुंद नदीचं पात्र, उगवत बाजूनं पाठीवर जोन्सचं त्रिकूट, अन् समोर मावळत बाजून आम्ही ! तें खांड पुरं पुरं चिमट्यांत सांपडलं. साधारणपण खुल्या असलेल्या दक्षिण बाजूनं तो खांडवा आतां निसटावयास बघत होता. अत्यंत सावधपणानं त्यांतल्या दोन्ही तिन्ही

काळ्यांना घेरावयासाठीं आमची धडपड चालली होती. ते हराम काळवीट वांकडीं तिकडी किरणं घेत घेत इकडून तिकडे आम्हांला निव्वळ हुलकावण्या देऊं लागले. त्यामुळं, पूर आलेल्या नदींतील तुफानात होडी झोके खाते त्याप्रमाणं जमिनीवरच आमची घोडी अन् आम्ही हेलकावे खाऊं लागलों! शेवटी मोठ्या प्रयासानं आम्हीं सगळ्यांनी मिळून त्या खाडातले दोन काळे जमिनीवर लोळविले अन् तेवढ्यांत संधी साधून तो बाकीचा खांडवा शेरीच्या वाडीच्या रोखानं लांबवर निघून गेला. आतां त्या हरणाचा पाठलाग करणं, म्हणजे केवळ मृगजलामाग धांवण्यासारखं होतं, म्हणून त्या भानगडींत न पडता आम्ही विश्रांतीसाठी आमच्या तळाकडे मोर्चा फिरविला.

भोंवऱ्यासभोवतालच्या विस्तीर्ण मैदानांत भर उन्हात आज "डुकरांच्या शिकारीचा" नाट्यप्रयोग चालला होता, अन् त्यातल्याच एका प्रवेशांत, मुंबईच्या पारशी नाटककंपन्या पूर्वी दाखवीत असत, त्याप्रमाणं 'हरणांच्या शिकारीच्या' चलचित्रपटाचा अंतर्भाव अभावितपणं होऊन गेला होता!!

   

घटकाभर सावलीला जाऊन विश्रांति घेतल्यामुळं आम्ही ताजेतवाने झालों, अन् पुनश्च आपापल्या ठिकाणी बारीवर जाऊन उभे राहिलो. बाहेर निघालेले गडी वाढत्या उत्साहान पुन्हा कुरणात घुसले अन् नेटानं रान उठवीत पुढं पुढं सरूं लागले. दहा मिनिटंहि पुरतीं हांके आंत शिरल्याला झालीं नसतील. अर्थात् इतक्या लवकर सावजं हलतील अशी आमची कल्पना नव्हती. परंतु कडेवरच दबा धरून बसलेलीं दोन तीन रानजनावरं हाक्यांच्या हांका कानीं पडतांच झटक्यास बाहेर भडाडली अन् आमची किंचित् चाहूल लागतांच पुन्हा माघारी परतून कुरणांत घुसली. जनावरं पुन्हा कुरणांत घुसलेलीं पाहून त्यांना बाहेर काढण्याकरितां हाके लोकांनीं एकच घेगट

उठवून दिली. पण आम्हांला त्यांनीं पक्कं हेरलेलं असल्यामुळं कांहीं केल्या तीं श्वापदं बाहेर तोंडच काढीनात. तीं रानजनावरं आंतूनच पुढं पुढं सरत. पण शेवटीं निरुपाय झाल्यामुळ बरींचशी पुढं जाऊन तीं जोन्स वगैरे उभे होते त्या बारीवाटे बाहेर पडलीं.

जोन्स एकटाच एका थोराड जुनाट जनावरामागं धांवला. ब्रूस अन् वेअर्सहि त्या दोन्ही जनावरांमागं गेले. तेवढ्यांत आम्हीहि तिथ येऊन दाखल झालों, अन् जोन्सच्या मदतीला जावं असं मनांत येऊन आम्ही तिकडे वळलों. जोन्सन अधोहस्तानं [ अंडरहॅन्ड ] त्या रगेल जनावराच्या कुशींत दोन तीन स्टिका दिल्या, त्यासरशीं तें चवताळून परत फिरल; आपल्या शत्रूचा चक्काचूर उडविण्याच्या इरायानं किंचित् मागं सरून त्यानं एक जोराची धडक आपल्याकडून त्याला दिली. पण जोन्सनं एक उंच उड्डाण घेऊन त्याचा तो प्रयत्न अन् त्याची ती आशा दोन्हीहि फोल करून सोडली. त्या जोराच्या मुसंडीसरस तें आडमुठं जनावर चांगल दोन वाव पुढं गेलं होत !

आम्हांला जवळ आलेले पाहून, ' आपल्या यशाच श्रेय आतां हे लेकाचे फुकाफुकींच उपटणार, ' असं त्याच्या मनांत आलं की काय कोण जाणे !

आम्हांला किंचितहि श्रेय मिळूं नये म्हणून त्या मिस्किल जोन्सनं आपल्या उजव्या हातांतली स्टिक् डाव्या हातात घेतली, अन् झट्कन् खिशांतला रिव्हॉल्व्हर काढून, अन् वेगानं पुढं घुसून अन् अगदीं जमिनीपर्यंत वाकून त्यानं त्या मस्त डुकराच्या मस्तकाच्या चिंधड्या चिंधड्या उडविल्या !

त्याचा हा अतिप्रसंग अन् अगोचरपणा पाहून आमच्या हंसतां हंसतां मुरकुंड्या वळल्या.

' तुला शिकारी न म्हणतां, घोड्यावरून मेंढरं वळणारा धनगरच म्हटलं पाहिजे ! ' मी त्याला म्हणालों.

'खुशाल खुशाल! त्याला माझी बिलकुल हरकत नाहीं. हा खेळ आहे, नीति अन् नियमांच्या गप्पा प्रसंग आला नाहीं तोंवरच मारतां येतात!' जोन्स.

त्या दोन्ही जनावरांना खतम करून ब्रूस अन् वेअर्सहि आमच्यांत येऊन मिसळले. त्यानींहि जोन्सची खूपच हजेरी घेतली. पण तो कसला निगरगट्ट! एक शब्दही तोंडावाटे न काढतां तो सरळ तळाकडे चालता झाला.

तहानेनं आमचेहि घसे कोरडे ठाक पडले होते, अन् पायहि अगदी आखडून गेले होते. तळावर गेल्याबरोबर आम्हीं घोड्यांवरून उड्या घेतल्या, अन् गार सोड्याच्या दोन दोन तीन तीन बाटल्या आम्हीं आपल्या पोटांत रिचवून दिल्या!

   

बराच वेळ तिथं आम्ही विश्रांति घेतली. ऊन्हही आता बरंच उतरल होतं, अन गरम वारा आतां सौम्य स्वरूपांत भराऱ्या मारीत होता. रान बहुतेक सोडवून झालं होतं. ईशान्य बाजूचा कोंपरा तेवढाच सोडवावयाचा शिल्लक राहिला होता. शिरवळ पडण्याचा सुमार झाल्यामुळं सगळ्यांनाच आतां नवा हुरूप आल्यासारखा झाला होता. "तेवढाच कशाला शिल्लक ठेवायचा?" असं सगळ्यांचंच म्हणणं पडलं. म्हणून आम्ही उठलों, अन् रानकाढेहि आपल्या कामगिरीवर निघून गेले.

आम्ही सगळेजण आतां पूर्वेच्या बाजूच्या एका बारीच्या तोंडाशीं जमून उभे होतों. हांके संथपणानं हाका टाकीत होते. बराच वेळ झाला तरी सावजं बाहेर पडेनात; तेव्हां सावजंच आंत शिल्लक नसावींत असं आम्हांला वाटलं. आम्हीं आंतल्या गड्यांना बाहेर पडण्याबद्दल इषारा दिला. तोंच एक डाडर अन् तिचीं दहा बारा लहान लहान बांडगीं हरमळीनं त्या बारीवाटं

बाहेर पडलीं. आमचीं घोडी एकाएकीं चमकली अन् त्यांच्यामागंच निघालीं. पण, दहा बारा बच्च्यांच्या त्या माऊलीला मारून त्याना पोरकं करून टाकाव असं आमच्यांपैकी कुणालाच वाटेना वेगान निघालेले आमचे घोडे आम्हीं तत्काल खेचले, अन् ती सार [ डाडर अन तिची पिले ] सुखेनैव भट्टीच्या आळ्याकडे निघून गेली !

लाल रविबिंब सारा दिवस प्राणिमात्रांना हैराण करून आता क्षितिजा-आड आपल तोंड दडविण्यास जात होतं दिवसभर आरापल्या खोपातून मुरून वसलेले ससे नुक्तेच चरणावर निघाले होते कावळ्याचे अन् बगळ्याचे थवेच्या थवे भीमातटाकावर असलेल्या आपापल्या निवासस्थानाकडे लोटत होते मळ्यामळ्यानीं कामाधद्यास गेलेल्या शेतकऱ्याच्या बायका घराच्या ओढीनं, वाघ पाठीस लागल्याप्रमाणं लगालगा घराची वाट चालत होत्या. त्यांची कच्चीबच्ची, त्यांच्या आयामायांनींच त्याच्या हातात दिलेले वाळलेल्या भाकरीचे तुकडे अन् मळ्यातली गाजरं खात खात मौजेनं त्याच्या मागंपुढ वाफडत होती. अन् दिवसभर तादून गेलेली अन् भुकेनं वखवखलेली आमचीं घोडीं तोडांतले लगाम कडकडा चावीत झपाट्यानं मळ्याचं अनर तोडीत होती.

   

साऱ्या रात्रभर तंबूत आज 'फ्लश' चा धिंगाणा चालला होता एरव्ही मित्रत्वानं वागणारे ते पाढरे द्विपाद प्राणी आज केवळ पागल बनून गेले होते, अन् एखाद्या अट्टल भामट्याप्रमाणं एकमेकांच्या डोळ्यात धूळ फेंकीत निःशंकपणानं परस्पराना बुचाडीत होते ! !

## सातपुड्याच्या एका पुडांत ! ४

त्याला खेडं म्हटल तरी तो वस्तुस्थितीचा धादात विपर्यास होईल ! सातपुड्याच्या पायथ्याजवळच्या त्या रखरखीत अन् ओसाड प्रदेशांतली जंगली लोकांची ती एक अस्ताव्यस्त अशी वसाहत होती. मुख्यत्वेंकरून भिल्ल अन् संताळ लोकांचा भरणाच त्या वसाहतींत विशेष होता. एक-दोन दरवेशीही तिथं येऊन स्थायिक झाले होते, अन् अस्वलांचे छोटे छोटे बच्चे, फिरस्त्या दरवेशी लोकांस विकण्याचा धंदा ते करीत असत. कांही संताळ लोक शेतीही करीत असत, पण त्या शेतीमुळं त्यांचीं पाठीस मिळालेलीं रितीं पोटं वरतीं आल्याचं कदाकाळीही कुणी पाहिलं नाहीं. जंगलतोडीचं काम हाच त्याचा मुख्य निर्वाहाचा धंदा होता. जंगलातील एका जातीच्या फुलांची दारू गाळून हे लोक यथेच्छ पीत. त्यांनीं चोरून दारू गाळूं नये म्हणून

अबकारी खात्यानं कृपाळूपणानं त्यांच्याकरितां ठिकठिकाणीं गुत्त्यांची सोय केली होती. तरीही असल्याप्रकारचे गुन्हे त्या टापूंत हमेषा घडतच असत !

कांही वस्तू अथवा सामानसुमान लागल्यास तिथनं दहा-पंधरा मैलांवर असलेल्या कसब्याच्या एका गांवाकडं धाव घ्यावी लागे. कुणीही मारवाडी त्या जंगली वसाहतींत राहून दुकान घालण्याला धजत नव्हता, अन् कुणी पांढरपेशा तिथ आसपास औषधालाही मिळण्यासारखा नव्हता. जिकडं तिकडं गोमाशांनीं भरलेली मरतुकडीं कुत्रीं सांडपाण्याच्या गारव्याला पडलेलीं असत. असल्या या उदासवाण्या स्थळीं आज आम्हीं हेतुपुरस्सर आलेलों होतों. या वसाहतीपासून अर्ध्या मैलावर स्वच्छ वहात्या पाण्याचा एक ओहोळ होता. अन् इथूनच ते गांवकरी पाणी नेत असत. त्या ओहोळाच्या दोन्ही तीरांवर किर्र्र झाडी होती, तरी जरूरीपुरता प्रकाश अन् हवा तिथं असल्यामुळं, तिथच आम्हीं मुक्काम ठेवण्याच ठरविल.

मी ग्वाल्हेरला असता, कहानसिंग नांवाच्या एका खत्री गृहस्थांची व माझी कांहीं योगायोगानं दोस्ती जुळून आली. मध्यहिंदुस्थानांतील ( मध्य-प्रांतांतील नव्हे ) ‘ गोविंदगड ’ जहागिरीचं त्याच नांवाचं, मुख्य ( राजधानीचं ) एक छोटसं नगर आहे. तिथले हे गृहस्थ रहिवासी असून घरचे चांगले संपन्न आहेत. त्यांस शिकारीचा मनस्वी शोक आहे, अन् तो शोक पुरा होण्यासारखी तिथली परिस्थितिही पण आहे. गोविंदगडच्या हद्दींत विपुल जंगल असून वाघ वगैरे हिंस्र श्वापदांचं तें जणूं माहेरघरच आहे. त्यांचा मला आज पुष्कळ दिवस शिकारीकरितां येण्याचा आग्रह होता, म्हणून मी मला सवड होतांच गोविंदगडास गेलों. पण योगायोग कसा विचित्र पहा ! आम्ही मोठ्या उमेदीनं शिकारीच्या तजविजीस लागलों, तों तिथल्या छोट्याशा संस्थानिकाकडे (!) ( इकडील कित्येक सरदार–जहागिरदारांस अलीकडं ज्या-प्रमाणं ‘ राजे ’ म्हणवून घेण्याची चटक लागली आहे, त्याप्रमाणंच तिकडील

छोट्या-बड्या जमीनदार-जहागीरदारांस 'संस्थानिक' म्हणवून घेण्याचा जबरदस्त शौक जडला आहे !) एक बडे युरोपीय पाहुणे आले, अन् त्यांचा वाघाच्या शिकारीचा बेत ठरल्यामुळं, इतरेजनांस अर्थातच शिकारीची सक्त मनाई झाली. आमचा अगदीं हिरमोड होऊन गेला. अखेर बरंचसं डोकं खाजवून कहानसिंगांनीं अस्वलांच्या शिकारीची एक वेगळीच टूम काढली पूर्वी सातपुड्याच्या जगलांत त्यांनीं एकदां अस्वलांची शिकार केलेली होती. करमणूक या दृष्टीनं अन् इथं रिकाम माशा मारीत बसावयाचं, त्यापेक्षां 'अस्वलांच्या शिकारीचा बेत तुम्हांस कसा काय वाटतो ?' म्हणून त्यांनीं मला विचारलं. मी थोडासा विचारांतच पडलों कुठ गोविंदगड अन् कुठं सातपुडा ! कशास कांहीं ठिकाण ! पण इतक्या दूरवर येऊन केवळ हात हालवीतच पाटसास परत फिरण्यापेक्षां 'कोल्हा काकडीला राजी' या न्यायानं मी तत्काल त्या बेताला मान्यता दिली

त्या बड्या गौरकाय पाहुण्यांच्या अप्रत्यक्ष सक्तीमुळं आम्हांला दुधाची तहान ताकावर भागविणं प्राप्त झालं, अन् अशा रीतीनं धक्के खात खात आम्हीं इथं–इतक्या दूरवर–अस्वलांच्या शिकारीसाठीं येऊन दाखल झालों.

आमच्याबरोबर आम्हीं एक स्वयंपाक्या, दोन चांगले वाकबगार 'शिकारी', दोन राहुट्या अन् भरपूर शिधासामान घेतलं होतं. मुक्कामाच्या ठिकाणीं आल्यावर त्या जागेवरलं गवत तासून काढून अन् ती जागा साफसूफ करून आम्हीं तिथं राहुट्या ठोकल्या. आमच्या कँपाच्या रखवालीकरितां रात्रीं तिथले दोन जवान भिल्ल बोलावून घेतले.

सकाळीं उठल्यावर चहा घेऊन आम्ही पुढील तजविजीस लागलों मला त्या रानाची माहिती नव्हती म्हणून एकवार त्या रानांतून फेरफटका करून यावं असं वाटलं अन् दुसरे दिवशीं आम्हीं सर्व दिवसभर तोच उद्योग केला. इतरही अवश्य ती माहिती गोळा केली. या पूर्व तयारींतच आमचे

पुरे दोन दिवस गेले जगलात अस्वल, डुकर, तरस अन् क्वचित् बिबटे वाघही आहेत असं कळलं त्या जगलांत माकड अन् मोरही विपुल होते. एकंदरीत इथ आल्यासारख, चारदोन दिवस मनःपूत खेळायला सापडेल इतकीनरी आमची खातरजमा झाली. रानकाढे लोक त्याच्या मेहनतान्या-शिवाय, सायंकाळीं खेळ आटोपल्यावर 'आम्हाला दारू दिली पाहिजे' अस म्हणूं लागले ! त्यामुळ आम्ही विचारांतच पडलो ते सारे मिळून पचवीस–तीस गडी होते एवढ्याना आम्ही दारू किती पुरविणार ? होय–नाहीं करतां करता आम्ही त्याना बक्षिसीदाखल–दारूकरिता–रोज सहा रुपये जादा देण्याचं कबूल केल !

तो मार्च महिना होता तरी पहांटे पहांटे थडी चागलीच पडे आम्ही चहा घेऊन, 'काला मू' नांवाच्या वर निबिड जगल असलेल्या एका सुळक्याच्या रोखानं चालूं लागलों साडेदहाच्या सुमारास आम्ही आमच्या खेळावयाच्या जागी येऊन दाखल झालो.

सायबेरियांतल्या पांढऱ्या अस्वलाप्रमाण आपल्याइकडील काळी अस्वलं मासाहारी नाहींत कंदमुळ, रानटी फळ, एक प्रकारच्या गवताच बीं व मध यांवर ती आपली उपजीविका करतात. क्वचित् प्रसंगी हे प्राणी आसपासच्या पिकाचीही नासाडी करितात अगदीं काहींच न मिळाल्यास ती शेंवाळ व झाडाचा कोवळा पाला खाऊनही दिवस काढतात. झाडावर चढण्यात तीं फारच तरबेज असतात.

   

रानकाढे पश्चिम बाजून रान उठवीत चालले. त्या प्रत्येकाजवळ एक लहानशी फरशी व तीरकमठा होता. आमच्याबरोबरचे दोघेही शिकारी-मदतनीस आम्हांबरोबर होते. आम्ही दोघेही दोन ठिकाणीं आपापल्या

सहकाऱ्यांसमवेत सावजांच्या पाळतीवर बसून राहिलों सरासरी एक घटा होऊन गेला. दरम्यान दोनतीन कोल्ही तेवढी आमच्यासमोरून निघून गेलीं, बाकी सर्वत्र सामसूम होत

आणखी थोडा वेळ गेला. आता रानकाड्याच्या आरोळ्या वाऱ्याबरोबर आमच्या कानावर येऊन आदळू लागल्या. माकडंही किचकिच करीत घाईघाईनं जगलाबाहेर पडूं लागलीं, अन् मोराचा एक मोठा थव्याच्या थवा विशिष्ट शब्द करीत गर्दीगर्दीन गर्द झाडांतून अन् झुडपांच्या अडचणींत घुसावयास पाहूं लागला

माकडं अशा तऱ्हेन गर्भगळित होऊन रान सोडवयास लागलीं, अन् मोर, तो एक प्रकारचा घबराट शब्द काढूं लागलं म्हणजे जवळपास कुठं तरी वाघाच अस्तित्व आहे असं हमखास समजावं ! वाघाचा वास लागल्यावाचून अथवा तें जनावर नजरेस पडल्यावाचून या दोन्ही प्राण्यांची इतकी चलबिचल कधीच उडत नाही.

मी माझ्याबरोबरच्या शिकाऱ्यास "वाघ अथवा चित्ता उठण्याचा फार सभव आहे, करिता अस्वलं वगैरे नजरेत आल्यास त्यांवर आवाज टाकू नका" असा इषारा देण्याकरिता कहानसिंगाकडं पाठविलं, अन् त्याल तिथंच थाबून रहाण्याला सागितलं

आणीक थोडा वेळ गेला. रानकाढे, कहानसिंग बसलेल्या बारीच्या बरेच जवळ जवळ येऊन भिडले होते. इतक्यात कहानसिंगांच्या बदुकीचा खाडकन् आवाज माझ्या कानांवर आला कहानसिंगानी एका बिबळ्या वाघावर तो आवाज टाकलेला होता, अन् खुब्यात लागून तो कुठं तरी दाट झुडपांत अथवा उंच गवतांत जाऊन दबा धरून बसला होता !

बराच वेळ मी मध्यें जाऊ दिला अन् नतर आस्ते आस्ते, बंदुकीचे दोन्ही घोडे उघडून सावधपणानं मी त्या मंडळीकडे जाऊं लागलों. पोळलेल

तें जखमी श्वापद जरी अदृश्य झाल होतं तरी, निघून जात असतां सगळ्या वाटेनं त्याचं रक्त सांडत सांडत गेलं होतं. त्या रक्ताच्या मागानं आम्ही सगळे त्यास धुंडीत निघालों. आमची चाहूल लागल्यामुळं तोही आपली जागा सोडून पुढं पुढंच सरत होता. कहानसिंग कांहीं माणसं बरोबर घेऊन व लांबून वळसा घेऊन पुढं निघाले म्हणून आम्ही थोडा वेळ थांबून राहिलों. एका नाल्यापलीकडे गेल्यावर त्यांनीं आम्हांला एका उंच झाडावरून पालवून इशारा केला, अन् आम्ही पुन्हा तोच रक्ताचा माग धरून निघालो तो वाघ पुढं पुढंच चालला होता कहानसिंग पुढं आडवे आल्याची खबर त्याला नव्हती, अन् पाठीवर आलेल्या माणसांकडंच त्याच सार लक्ष अन् अवधान एकवटलं होतं नाल्याच्या कडेला उघडयावर तो येतांच कहानसिंगांनीं सावकाशपणें शिस्त धरून नेमकी त्याच्या छातींत गोळी घातली. अस्वलां-ऐवजीं वाघाची 'भवानी' तर पहिल्या फटक्याला होऊन गेली !

दिवस अद्याप पुष्कळ होता, तरीही जास्ती हव्यास न धरतां खेळ तहकूब ठेवला अन् आम्ही आमच्या कॅम्पाकडे निघालों. कॅम्पावर आल्यावर आम्ही थोडासा विसांवा घेतला अन् ओहोळावर जाऊन स्नान करून आलों. जेवण तयार होतांच जेवणं उरकून घेतलीं, अन् बाहेर दोन आरामखुर्च्या टाकून आम्ही गप्पा छाटीत बसलों. रात्र बरीच झाली होती आणि निश्चल शांतता जिकडे तिकडे पसरली होती. मध्येंच एखाद्या वन्य श्वापदाचा शब्द तिथल्या भयाण शांततेचा भंग करी. मधून मधून वाऱ्याच्या मंद मंद लहरी येत होत्या, अन् चम्‌चम् करीत काजवे साऱ्या जंगलभर तरंगत विहरत होते !

   

मोठ्या पहांटेस उठून आम्ही चहा घेत बसलों होतों तोंच रानकाढे

कॅम्पावर येऊन हजर झाले. अशीरगडच्या बाजूला नितांत ओसाडी असून, मोठमोठया दऱ्याखोऱ्यांतील कपारी खडप्यांतून अन् कांटेरी जाळ्याझुडपांतून अस्वलाचा रहिवास फार आहे असं कळल्यावरून आम्ही तिकडंच मोर्चा फिरविला. 'काला मू' मागं टाकून दोहों बाजूस मोठमोठाल्या डगरी अन् खबदाडं असलेली एक खोल ओघळ ओलांडून आम्ही आमच्या नियोजित स्थळी येऊन दाखल झालों. रानकाढे डोंगरमाथा चढूं लागले अन् आम्ही दोघे त्याच डोंगराच्या उतरणीवर दोन ठिकाणीं आपापल्या सहकाऱ्यांसह जाऊन बसलो.

दोन अडीच घटे झाले श्वापदाचा पत्ता नाही अन् रानकाढ्याच्या हांकाही नाहींत ! मला याचा अर्थच समजेना ! माझ्याबरोबरच्या सहकाऱ्यासह मी ती वरली उंच चढण चढून गेलों तों, ते बेवकूब, रान उठविण्याची कामगिरी तशीच टाकून, मधमाशांचीं पोंवळी काढीत व शोधीत अन् कुणी शिंदीची पिकलेलीं फळं खात बेफिकीरपणें इकडं तिकडं भटकत होते ! मीं त्यांची बरीचशी हजेरी घेतली, अन् माझ्याबरोबरच्या शिकाऱ्यास त्यांच्याबरोबर ठेवून पुन्हा मी आपल्या जागी येऊन बसलों.

हांका सुरू झाल्या अन् थोडयाच वेळांत दोन अस्वल आम्ही बसलेल्या ठिकाणच्या विरुद्ध दिशेनं निघून गेलीं म्हणून, आम्हांस जागा पालटून बसण्याची सूचना देण्याकरितां, हांके लोकांनीं माझा माणूस मजकडे रवाना करून दिला होता. मी आतां तरी श्वापदं दृष्टीला पडतील या आशेनं वर माथ्याकडं नजर लावून बसलों होतों. इतक्यांत, तिथल्या उंच उंच गवतांतून मोठ्या मुष्किलीनं वाट काढीत येत असलेला माझा सहकारी माझ्या दृष्टीस पडला. त्याचे कपडे ठिकठिकाणीं फाटून त्यांच्या चिंध्या झाल्या होत्या; अन् त्यांवर रक्ताचे मोठमोठे डाग पडलेले दिसत होते.

घाबरून गेल्यामुळं, काय झालं तें त्यास धडपणें कांहीं सांगतांही येईना. त्याच्या हातांतली फरशीही कुठं तरी पडून गेली होती अन् तो अद्यापि लटलटां कापत होता. मी त्यास धीर देऊन त्याच सर्वांग स्वच्छ पुसून काढलं; अन् त्याला माझ्या पाणेऱ्यांतलं थोडसं पाणी प्यावयास दिल. त्याच्या अंगावर जिकडे तिकडे ओरखडे ओरखडलेले दिसत होते दुसरी काहीं गंभीर स्वरूपाची जखम त्यास झालेली नव्हती. मी त्याला तिथच बसवून कहानसिंगांच्या बारीवर गेलों अन् थोडक्यांत, झालेली हकीगत त्याच्या कानावर घातली. नंतर आम्ही तिघही त्याच्यापाशीं आलों तों, तो थोडासा भानावर आला होता रानकाढ्यांनीं उठविलेल्या त्या दोन अस्वलानीं त्याला घेरून खूप घुसमळून त्याची अशी दुर्धर अवस्था करून टाकली होती. ती अस्वलं दूरू निघन गेलीं असा त्याचा समज झाला होता, अन् तो गहाळपणान माझ्याकड येण्यास निघाला असता, तिथल्या दाट उंच गवतांतच मुरून बसलेल्या त्या आततायी प्राण्यांनीं अचानकपणं त्याला घेरून त्याची अशी विटंबना केली कहानसिंगापासल्या शिकाऱ्याबरोबर आम्हीं त्यास कॅम्पावर रवाना करून दिला अन् आता आम्ही दोघेही आमची पहिली जागा पालटून एकाच बारीवर बसलों. या सगळ्या गोंधळांत कितीक श्वापदं उठून निघूनही गेलीं असतील!

आमच्या मनाचा अगदीं विरस होऊन गेला बंदुका खाली ठेवून धूम्रपान करण्याच्या इरादानं मी माझ्या खिशांतली सिगरेट्-केस बाहेर काढली; इतक्यांत आम्हांपासून पंचवीस तीस कदमावर असलेल्या एका घळीच्या कडेकडेनं सात-आठ अस्वलांचा घोळका झुलत झुलत चाललेला मला दिसला. मीं कहानसिंगांच लक्ष तिकडं वेधलं, अन् बंदुका उचलून घेऊन आम्हीं दोघानींही शिस्त न धरताच त्या घोळक्यावर दोन फैरी झाडल्या. त्यांतलीं चार अस्वलं जागच्या जागींच पडली अन् बाकीचीं सैरावैरा पळत जंगलांत

निघून गेली मेजरटेप काढून तीं चारीं अस्वलं आम्हीं मोजून पाहिलीं. पावणेसातपासून सात फुटापर्यंत त्यांची लांबी भरली.

हरणंच नव्हे तर ससे, सायाळ यांसारखे क्षुद्र प्राणीही आपला जीव बचावण्याकरितां जितकी तत्परता दाखवितात, तितकीही तत्परता त्या सुस्त अन् अजागळ प्राण्यामध्यें मला दिसून आली नाहीं. या अजागळ प्राण्यांच्या शिकारींत विशेषस स्वारस्य मला वाटलं नाहीं, अन् माझं बनलेलं हें मत कहानसिंगाना मीं उच्चारूनही दाखविलं

आवाज ऐकून हांके लोकही तिथ गोळा झाले अन नंतर आम्ही सगळे-जण कॅम्पाकडे जाण्यास निघालों. जेवणं उरकल्यानंतर रोजच्याप्रमाणं आम्ही गप्पा छाटीत बसलो होतों. उद्याच्या शिकारीचा बेन तहकूब करावा असं मीं कहानसिंगांस म्हटलं. 'अस्वल न मारतां दुसरी काहीं श्वापद उठ-ल्यास पाहू, इथं कॅंपावर कंटाळवाणा वेळ घालविण्यापेक्षां रानांत गेलेलं काय वाईट ?' असं कहानसिंग म्हणाले, अन् माझं बारगळलेलं मन उद्ईक रानात जाण्यास पुन्हा तयार झालं

समोर दूरवर, कुठ तरी डोंगरास लागलेला वणवा झपाट्यान पसरत चालला होता, अन् रातभारद्वाज एकसारखा शब्द करीत, आतां बरीच रात्र झाल्याचं आम्हांस सूचित करीत होता.

   

आम्हांला उठावयाला आज थोडासा उशीरच झाला होता. रानकाढे रोजच्याप्रमाण येऊन हजर झाले होते. "अस्वलं आम्हांस मारावयाचीं नाहींत, डुकर वगैरे इतर श्वापद मिळण्यासारखीं असतील तिकडं आज

चला" असं आम्हीं म्हटल्यावरून रानकाढे लोक जरा विचारांतच पडले. रानांत चित्ते, अस्वलं, तरसं, डुकर अशा सर्वच श्वापदांची सरमिसळ आहे, वेळेला जीं उठतील तीं खरी, अस त्याचं म्हणणं पडलं, अन् तें खरच होतं. आम्हांला हवं असलेलं जनावरच तेवढं नेमक आणून आमच्यापुढं उभं करावयाचं ही गोष्ट त्यांच्या हातची खचितच नव्हती !

डोंगराच्या शिखरावर अस्वलांचा रहिवास जास्त असल्यामुळं, पायथ्यापासून रान उठवीत जावं अस ठरल. जंगलाचा पसारा कांहीं थोडा नव्हता. कांही मर्यादित भागांतच खेळावयाच असं त्या लोकांच्या विचारानं आम्ही ठरविलं, अन् त्यांनीं दाखवून दिलेल्या बाऱ्यावरच आम्ही दोघेही दोन ठिकाणीं जाऊन बसलों. आमचे शिकारीसहकारी आज आमच्याबरोबर नव्हते. जंगलांत जिकड तिकडं शुकशुकाट होता. दूरवरून रानकाढ्यांच्या आरोळ्या तेवढया अस्पष्ट ऐकावयाला येत होत्या.

माथ्यावरला सूर्य आता थोडासा कलला होता. माझ्या पायास आलेल्या मुग्या घालविण्याकरिता मी उठून उभा राहिलों, तों माझ्यापासून अगदी थोडया अंतरावरून अस्वलाची एक मादी आपल्या दोन पिलांसह जात असलेली मला दिसली ती दृष्टीस पडताच नेहमींच्या संवयीप्रमाण मीं बंदुक उचलून माझ्या खवाळ्यास जोडली, पण लगेच ट्रिग्गरवरलं बोट काढून घेऊन, जशीच्या तशीच मीं ती पुन्हां जमिनीवर ठेवून दिली. मला पाहून ती मादी भीतीन एकवार मोठ्यान बुरकली, अन् आपल्या बालबच्चांस आपल्या पोटाखालीं घालून ती आपल्या वाटेन निघून गेली.

निष्क्रियवृत्तीनं आळशासारखा मी बराच वेळ तिथ गवतावर पडून राहिलों होतों. इतक्यात बंदुकीचे दोन आवाज माझ्या कानांवर आले अन् मी कहानसिंगांच्या बारीकडं झपाटयानं निघालों. कहानसिंगांनीं एका लहान लहान सुळे असलेल्या, मध्यमसर पण विलक्षण पुष्ट अशा रानजनावरास

( डुकरास ) ठार केलं होतं, अन् त्याजपाशीं नुकतेच येऊन ते उभे राहिले होते.

शिरवळ पडण्याचा सुमार झाला होता. तासन् तास एकेकट्यान बारीवर बसून रहाणं फार कंटाळवाणं वाटूं लागल्यामुळं आम्ही दोघेही आतां एकाच बारीवर बसून राहिलों हांक्याच्या आरोळ्या आता जवळ ऐकू येऊं लागल्या होत्या. ते लोक रान उठवीत येत होते त्याच बाजूला तोंड वळवून आम्ही बसलों होतों. थोड्याच वेळानं दोन काळे भुरके लहानसर प्राणी वरल्या दाट गचपणातून निघालेले आमच्या दोघाच्याही दृष्टीस पडले. तीं अस्वलं तर नव्हतींच नव्हती पण ते कोणत्या जातीचे प्राणी होते तें आम्हास नीटसं हेरतां येईना. दोन-एक मिनिटात ते आमच्यापासून बरेच जवळ आले; अन् त्यांच्या कुलपत कुलपत चालण्याच्या ढबीवरून ते प्राणी म्हणजे तरस असल्याचं आम्हांला कळून आलं. तत्काल आम्हीं आपल्या बंदुकींतलीं गोळीचीं काडतुसं काढून घेतलीं; अन् एस्. जी. काडतुस बंदुकीत भरून, दोघानींही त्या जोडीपैकीं एकेकावर पृथक् पृथक् आवाज टाकला. फारच हिडीस अशीं तीं ओरडलीं, अन् चार-पांच वेळां स्वतःभोंवतींच गिरक्या खाऊन जागच्या जागींच उलथून पडलीं. आवाज ऐकून अन् वखतही होऊन गेला होता म्हणून हांकेही तिथं येऊन गोळा झाले. पहिल्या फसलीत मिळालेला डुक्कर नजरेनं पाहून ते अगदीं खूष होऊन गेले.

कॅम्पावर जाण्याकरिता आम्ही परतलों. जंगलाबाहेर आम्ही पडलों, तों अर्धवट हरणासारखा अन् अर्धवट घोड्यासारखा दिसणारा एक प्राणी आमच्या नजरेस पडला. रानकाढ्यांनीं त्यावर आवाज टाकण्यास आम्हांस सुचविलं. तत्काळ मीं त्यावर आवाज टाकला अन् त्याला ठार केलं. ( नीलगाय म्हणतात तो हाच प्राणी असं त्या लोकांनीं आम्हांस सांगितलं. याचं मांस ते लोक फार आवडीनं खातात. )

आतां ते हर्षातिशयानं नुसते नाचूं लागले. उद्याचा दिवस खेळ तहकूब ठेवावा अशी त्यांनीं आम्हास विनंति केली. आम्हांसही ती गोष्ट इष्टच असल्यामुळं आम्ही ती ताबडतोब मान्य केली, अन् त्यांनी उद्याच्या मेजवानीकरितां अन् दारूपाण्याकरितां आगाऊ मागितलेले पैसे त्यास देऊन आम्ही दोघेच पुढं कॅम्पावर निघून आलो

आमच्या ठरलेल्या कार्यक्रमांतला आजचा अखेरचा दिवस होता ताबड फुटतांच रानकाढ्यासह आम्ही जंगलाची वाट चालूं लागलों थोड्या वेळानं आम्ही एका उंच सुळक्यापाशीं आलो त्या सुळक्याच्या कापून काढल्या-प्रमाणं दिसणाऱ्या उभ्या कपारीला सरासरी गळ्याइतकं उंच असं एक मध-माशांचं मोहोळ लागलेलं होत. मी आजपर्यंत एवढं प्रचंड पोंवळ कधी पाहि-लेल नव्हत. त्या क्षुद्र जीवाचा तो अचाट उद्योग पाहून मला मोठं नवल वाटलं. थोडसं पुढं गेल्यावर रानकाढ्यांनी दाखवून दिलेल्या दोन निरनिराळ्या बाऱ्यांवर आमच्या शिकारीमदतनिसांसह आम्ही जाऊन बसलों, अन ते लोकही झपाट्यानं जंगलांत घुसले.

अर्धाएक कलाक होऊन गेला. हाक्यांच्या हाका कानांवर येऊन आदळूं लागल्या. पण सावजांचा काहीं एक सुगावा लागेना. बसूनबसून कंटाळा येऊन गेला मी बसलों होतों तिथून जवळच एक नादुरकीचा प्रचंड जुनाट वृक्ष होता, अन् त्या वृक्षाच्या विस्तीर्ण शाखा लांबवर पसरलेल्या होत्या हजारों-हजार वाघळं त्या वृक्षाच्या शाखाशाखांनी झुंबरांप्रमाणं लटकून राहिलीं होतीं. त्या झाडाकडं बघत मी कसातरी वेळ घालवीत होतों. इतक्यांत 'मारो, मारो' म्हणून माझा सहकारी घाबरटपणानं ओरडला. घाईघाईनं बंदुकीचा हॅमर उघडून मी उठून उभा राहिलों तों काय ! दहाबारा अस्वलांचा एक तांडाच्या तांडा सावकाशपणं झुलत झुलत समोरून आमच्याच रोखानं

येत असलेला दिसला. मला त्या गब्दार प्राण्यांना मारण्याची लेशमात्र इच्छा नव्हती. त्यांनी लाबूनच निघून जावं म्हणून बंदुकीचं तोंड वर करून मी अंतराळातच दोन आवाज काढले त्याबरोबर ती जनावरं इतस्ततः उधळलीं अन् जंगलात दिसेनाशी झाली.

पांचचार मिनिटंही मधे गेली नसतील, तों कहानसिंगांच्या बारीच्या बाजून बंदुकीचे दोन आवाज निघाले. आम्ही दोघेही झपाट्यानं तिकडं निघालों मघा निघून गेलेल्या अस्वलांपैकीच एकावर कहानसिंगांनीं आवाज टाकला की काय, अशी शंका मला आल्यावांचून राहिली नाहीं आम्ही त्याच्या बारीजवळ गेलों तों, कहानसिंग जाग्यावर नव्हते थोडासा इकडे-तिकडे तपास करतां, एका कांटेरी झुडपांच्या पुजक्याआड कहानसिंग उभे असलेले दिसले त्याच्यापुढं दोन अस्वलं मरून पडलेली होतीं. "त्या बिचाऱ्यावर एवढा घुस्सा का ?" मी त्याना थट्टेन म्हणालों "साधल्याम शिकार, ही म्हण तुम्हास माहीत आहे ना ? आपणास इष्ट असलेली शिकार खात्रीन मिळेल अशी काय शाश्वती ? म्हणून मी आपली 'भवानी' करून ठेवली !" कहानसिंग म्हणाले

'तेंही खरच !' मी म्हटलं तहानेनं माझा घसा कोरडा पडून गेला होता म्हणून गळ्यांत अडकविलेलं पाणेर काढून मी तोंडास लावलं अन् आम्ही सगळे आतां एकाच बारीवर बसून राहिलों पाणी पितां पितां एकीकडे कहानसिंग सांगत असलेल्या अशीरगड किल्ल्याच्या जुन्या दंतकथा मी ऐकत होतो, इतक्यांत हांके लोकांपैकी दोघे-तिघे गडी आमच्याकडेच येतांना दिसले. ते आमचेपाशी येतांच, "तीन म्होटीं म्होटीं भारी अन् कमरंइकताली उंच दांतवालीं रानजनावर एका दाट आळ्यामंदी शिरल्याती, अन् आपल गडी त्या आळ्याला येढा यूनशान् बसल्याती; महांकाळ्यानं ( रानकाढ्यांचा

म्होरक्या ) तुमाल्ही बिगिबिगी तकड बुलावलया." * असं ते म्हणाले. एक मिनिटही न घालविता आम्ही त्यांच्याबरोबर चालूं लागलों. आम्ही तिथं जातों तों, गडी तो दाट आळ्याचा टापू वेढून बसलेले दिसले त्यांनीं आम्हांस, "न्योमकी जनावर तुमच्या अंगावर घालवितों" असं सागून, तिथं उताराला दोन मोठे काळे टोळे होते त्यांच्या आडोशाला आम्हांला बसायला सांगितलं. त्यांच्या सांगण्याप्रमाण आम्ही अगदी सावधपणान त्या टोळ्याच्या आडोशाला बसून राहिलों.

हांकेलोकांनीं तिन्ही बाजूंनीं हांका टाकावयाला सुरवात केली. आतलीं जनावरं सावधच होतीं. हाकेलोकांनीं खुल्या ठेवलेल्या बाजूनंच तत्काळ तीं भडाडली, अन् आमच्या बदुकींतून सुटलेल्या काळस्वरूपी 'लेथेल' गोळ्यांना बळी पडलीं!

---

* संताळांची बोली मराठीहून अगदी भिन्न आहे. भिल्ल लोकही आपापसांत वेगळीच भाषा बोलतात, पण मराठी बोलीही एकाद्या खानदेशी मराठ्याप्रमाणं ते उत्कृष्ट अस्खलित बोलतात!

## असंगाशीं संग !

५

जुन्या तळ्यावरल्या डाक बंगल्यांतून मी परत फिरलों, अन् थेट रामोसवाडयांत गेलों. रामोसवाडयाच्या मध्यभागीच असलेल्या पिंपळाच्या चिरेबंदी पारावर तिघे चौघे मध्यम वयाचे गडी ( अर्थात् त्या ज्ञातीचे कारभारी ) नेहमींप्रमाणं एकाद्या स्वायत्त देशाच्या बेडर सर्वाधिकाऱ्याच्या तोऱ्यांत गांवच्या उचापती अन् बातचीत करीत बसलेले होते. शिसवीच्या लाकडाप्रमाणं वर्ण असलेल्या पापा रामोशानं आपल्या दोन्ही हातांच्या पवित्र्यांत धरलेल्या मंगलोरी कौलाप्रमाणं लाल दिसणाऱ्या कोऱ्या चिलमीचा अखेरचा एक प्रदीर्घ सटका मारून चिलीम ओठ्याखाली पालथी करून झाडली. अंगठ्यानं दोन तीन वेळां तिला चांगली टपकली, साफी अन् खडा

चिलमींत चांगला दाबून बसवून अन् हातानं पारावर जरा झटकल्यासारख करून त्यानं मला बसावयासाठीं तिथं ऐसपैस जागा करून दिली.

" तात्या, आज इकडं कुणीकडं ? " म्हणून सगळ्यानीच एकसमयावच्छेदेकरून मला प्रश्न केला म्हणाना !

" तें सांगायलाच नर मी तुमच्या आळीला एवढ्या तातडीनं आलोय् ना ? "

" आज उजाडल्याबरोबर आपले पो पाटील अन् हवालदार मळ्याकड आले, अन् 'सायबांनीं तुम्हांला आत्ताच्या आत्ता बंगल्यावर बोलावलय्' म्हणून म्हणाले. त्यांच्याबरोबरच डाकबगल्यावर गेलों मी. साहेब बंगल्याच्या व्हरांडयात माझीच वाट पहात बसले होते. नमस्कार चमत्कार झाल्यावर साहेब मला म्हणाले–'आम्हाला एकवार डुकरांची शिकार करायची आहे पाटलाच्या काटवणात अन् भट्टीच्या आळ्यात रगड डुकर आहेत, असं पाटील म्हणत होते तुमच्याजवळ माहितगार माणस आहेतच, तेव्हां एक दोन दिवसांतच शिकारीचा बेत ठरवा अन् आम्हाला तशी सूचना द्या. रानडुक्कर कसा असतो तो मी अद्याप नजरेनही पाहिला नाहीं, पण आज पुष्कळ दिवस मनात येतंय् अन् या खेपेला सवडही आहे, म्हणून तुम्हांला निरोप केला..."

माझं बोलणं अजून कांहीं पुरं झालं नव्हतं. पण मला पुढ बोलूं न देतां मधेच पापा म्हणतो–" ठावं हाय् कीं आम्हांली त्यो सायेब. ढवळा हाय् म्हून सायेब म्हनायचा. पुन आक्षी गदाळ ! योकदां आमच पांच सहा गडी घ्यूनशान् हिंगणीबेरडीच्या रानात हरनांवर ग्येला व्हता. आमीं मारं हरनं वळवून आनून त्याच्या अंगावर घालाई पुन सायेब न्योम मारनार पडला व्हानका ! न्हाई म्हनायला, लई चतराइनं, दिस पार बुडायचा वखत झाला

त्यव्हा योक बोडकी हानली बा त्या भाद्दरानं! बंगल्यावर यायला आक्षी गडाद काळुख झाला. सायेब लई शिणल व्हत, आल तसच शिरल बंगल्यांत, अन् घटकाभरशानं त्याच्या चपरागानं आमच्या गड्यांच्या हातावर योक योक पावली आनूनशान् ठिवली! आमा रामुशांच्या बायकाबी खडीच्या कामावर रोज आठ आन धा आन कमावत्यात. अन आख्वा दिस उन्हातान्हात पायपिटी करूनशान् सायबान लई खूस हून आम्हाला दिलं काय, तर बंदं चार आन! आमच्या गड्यानीं त्ये पैस फेकल माघारं त्या चपराशाच्या अंगावर पुन सायेब रागाला येत्याल या पायी आमार्स्नी त्ये घेन शेवटाला पराप्त झालं! असला तर त्यो सायेब फुकाट खालींपिर्ली आद्बायच आलं इकन मातर खरं तात्या, उल्लास नाय चलत असल्या ह्योळामधी!"

"तुम्ही म्हणतां तें एका अर्थी खर आहे, पण आपण शिकाऱ्यांनीं असला तुरुस मनांत कायमचा ठेवू नये," मी—

"तुरुस बिरुस आमच्या मनामंदीं काय बी नाय्. पन या म्होट्या म्होट्या अमलदारांना आमा गरिबांची किमत आक्षी बिलकुल वाटत न्हाय, अन् आमीं मातर त्येंच्यांकरिता जिवाचा इनाकारन आटापिटा करावा तात्या, न्हाई म्हनून भागनार कसं? ग्येलं हे पायजेच. पन तुमी आमाकरतां इकतच करा. जनावर तुमच्याम्होरं नेटांत निघालं तरीबी त्यावर आवाज टाकूं नका, अन् टाकलातच तर ढळ्ता टाका हान म्हनाव तूच! पधू तरी सायबाची चतराई!"

"पापा, हिरा, तुमच काळीज निखालस शिकाऱ्याचच आहे. त्यव्हा तुम्हींच सांगा कीं, सावज नेटांत आल्यावर खऱ्या शिकाऱ्याला हात जोडून स्वस्थ बसवेल का? सावज नजरेनं पाहिलं कीं, तुम्हांला तें धांवून धरावं, अन् न सोलतां कच्चंच तोंडांत टाकावं असं होत ना? तीच गत माझी.

मी ब्राम्हण असल्यामुळं मला तें तोंडांत टाकावस वाटत नाहीं इतकंच काय तें ! " मी—

माझं बोलणं ऐकून, माझे ते सगळे भाबडे दोस्त खूब मोठयान—अगदी मनापासून—हंसले, अन् त्या खुलास हंसण्याबरोबरच त्यांच्या अतःकरणांतलं तें फारा दिवसांपूर्वीच जुनं किल्मिष पार धुवून निघाल अस मला वाटल. त्यांच्या अंत.करणाला जणूं गुदगुल्या झाल्यासारख्या झाल्या, अन् ते मोठ्या खुषीनं उद्ईक रानांत निघण्यास सिद्ध झाले !

या अधिकारी मंडळीबरोबर रानांत फिरण्यात मोठस स्वारस्य होत अशांतला कांहीं भाग नाही. मलासुद्धां तें एकप्रकारच संकटच वाटत होत. पण प्राप्त प्रसंगाला तोंड द्यायला पाहिजेच होत खेरीज, वाढून आलेलं ताट तसंच्या तसंच बाजूला सारण—मला ब्राम्हणाला तरी—बरं दिसलं नसतं !

अखेर मी त्यांना, " तांबड फुटतांच दोघं तिघं गडी पाटलाच्या काटवणाकडे लावा. भट्टीच्या आळ्याचा पसारा मोठा असल्यामुळं, एकट्या दुकट्या बंदुक्याचा तिथं कांही सळ बसणार नाही, काटवणातच एक अर्धा माग आढळल्यास तें सोयीचं होईल, अन् झालीच तर थोडक्यांत मौजही होऊन जाईल. हवालदाराला साहेबांना तशी सूचना द्यावयास सांगतों. तुम्हीं मात्र सकाळीं लवकर बंगल्यावर जाऊन साहेबाला पुढं घालून रानांत चला. मी मळ्यांतून परस्परच तिकडे येतों. " इतकं बोलून गेटावर जाण्याकरितां मीं उठलों. मी नको म्हणत असतां ते चौघेही माझ्याबरोबर गेटापर्यंत आले. हवालदारास, साहेबांना उद्यांच्या बेताची वर्दी द्यावयास सांगितली, अन् माझ्या दोस्तांचा पुन्हा एकदां निरोप घेऊन मी मळ्याकडे जावयासाठीं निघालों

   

जेवायला रोजच्यापेक्षां आज थोडासा उशीरच झाला होता. सुपारी चघळीत चघळीत जरासा मी आडवा झालों होतो डोक्यांत अनेक प्रकारच्या परस्परविरोधी विचारांनीं–किंबहुना विकारांनीं–काहूर उठवून दिलं होतं. साहेबांशीं सकाळी झालेल्या संवादांत, मला अधिकाराच्या गुर्मीची झांक मारल्यासारखी वाटत होती, अन् त्यामुळं माझं चित्त कमालीचं विषण्ण होऊन गेलेलं होतं. सकाळी रामोशांना मी उपदेशामृताचे नुसते डोसच नव्हेत, तर पेगावर पेग्, बळ बळं पाजले होते, पण त्या चोघांना पाजलेले ते सगळे डोस अन् पेग एकट्यानं झोंकूनही माझा डोळासुद्धां लागण्याचं यत्किंचित् चिन्ह दिसेना! परदु:ख शीतळ वाटतं एवढं खरं! तसं नसतं तर सकाळी बिचाऱ्या रामोशांना त्यांच्या मर्जीविरुद्ध बळं बळं घोड्यावर मीं बसवलंच नसतं!

या कुशीवरून त्या कुशीवर होता होतां माझ्या डोक्यांत थयमान घालून राहिलेले भलभलते विचार तिथनं हुसकून लावण्याचा मी प्रयत्न करीत होतों, अन् त्याची प्रतिक्रिया म्हणूनच कीं काय नवनवे अयाचित विचार दुप्पट आवेगानं उसळून माझ्या डोक्यांत नाहीं तिथून येऊन घुसत होते

"आमचा हेलपाटा व्यर्थ न झाला पाहिजे, अशी कोशीस करा," सकाळीं बोलण्याच्या ओघांत साहेब मला सहजगत्त्या बोलून गेले होते! त्यांच्या त्या बोलण्याची मला थोडीशी चिरडच आली होती वास्तविक मी कांही त्यांचा ताबेदार नव्हतों; माझ्याशीं अशी भाषा त्यांनीं करावयास नको होती.

अखेर मोठ्या प्रयासानं मी माझ्या मनाची कशीबशी समजूत घातली. "माझ्यासारख्या परतंत्र देशाच्या नागरिकान स्वाभिमानाची इतकी सूक्ष्म भावना उराशीं बाळगून बसणंच वेडेपणाचं नव्हे कां...?"

विचारमग्न अतःकरणानंच पडल्या जागेवरून मी उठलों. खांद्यावर बंदूक

टाकली, अन् मला ओलांडून ओढ्याची कड धरून निघालों घटकाभरानं चरणावर निघालेले दोन गुटगुटीत ससे फटकावले तेव्हा माझ्या मनाचा क्षोभ कमी झाला, डोक्यातले अनिष्ट विचार चटसारे निघून गेले, अन् माझं उद्वेगलेलं मन बरचस मोकळ झाल्यासारखं झालं

   

सकाळीं लवकर उठून डाकबंगल्यावर जाण्यास मी गड्याना सांगितलं होतं खर, पण साहेबबहादुराचा बेतबात होता होतां बराच वक्त होणार याबद्दलही मला आंदेशा नव्हता स्नान करून पुढं आलेल्या दहींपोह्यांवर मीं चांगलाच आडवा तिडवा हात मारला, अन् खांद्यावर बदूक टाकून जंगला-कडे जाण्यास निघालों. खरतुड्याच्या मळ्यापाशी आलों तो, साहेबांची स्वारी वरल्या अंगान आस्ते आस्ते काटवणाच्या रोखान येत असलेली दिसली. बंगल्यावर गेलेले सारे गडी त्यानीं पुढं रवाना करून दिले होते, अन् मोटारीनं शेळक्याच्या वसतीपर्यंन येऊन मधल्या पाऊल वाटेनंच ते पुढं निघाले होते.

पुढं आलेल्या गड्यानी माग सोडवून ठेविले होते, अन् आमचीच वाट पहात काटवणाच्या तोंडाशीं ते सगळेजण बसून राहिले होते दोन तीन टपरूळ रानजनावराचे (डुकरांचे) ताजे माग उत्तरेच्या अंगाला पक्के ठरल्यासारखे आढळून आले होते इतकेंच नव्हे तर त्या रानजनावरांनीं उजाडल्यानंतरही ओढ्यालगतच्या त्या दलदलीच्या भागांत खूपच धिंगाणा घातलेला असावा, अथवा त्यांची लढत तरी लागलेली असावी असं तिथल्या खंदाळलेल्या चिखलावरून उघड उघड दिसत होत. दक्षिणेच्या अंगानं नीर घालीत गेल्यास, जनावरं नेमकीं पुलाजवळच्या उत्तर बाजूच्या बारीवर बाहेर पडून भट्टीचं आळं जवळ करण्यास बघतात. म्हणून त्या खात्रीच्या

बारीवर साहेबाना बसवलं, अन् अवचुकून जनावर डोंगरबारीकडं भडाडलीं, तर तिकडंही कुणी असावं म्हणून दक्षिण बाजूच्या बारीवर मी स्वत: जाऊन बसलो. तबाकूच्या फक्या मारीत मारीत रामोशी गडी काटवणात शिरले, अन् खेळाचा 'श्रीगणेशा' तर झाला.

मोठ्या आवेशानं आंतले गडी हाका टाकूं लागले क्षणभर रान जणूं दुमदुमल्यासारखं झालं, अन् नंतर जिकडं तिकडं शुकशुकाट होऊन गेला.

घंटा झाला, दोन घंटे होऊन गेले, पण आंतल्या गड्यांचं अस्तित्वसुद्धां आता आम्हां बाहेर बारीवर बसून राहिलेल्याना भासमान होईना! अतर्क्य अन् अगम्य असं कांहींतरी घडत होतं काय घडत होतं तें कळावं म्हणून मी बसल्या जागचा उठलों, अन् उजवीकडून वळसा घालून पश्चिम बाजूच्या ओघळीच्या कडेकडेनं बराच वर गेलों. हाक्यांचा ठावठिकाणा अथवा चाहूल कांहींच लागेना आणखी थोडा मी पुढं गेलो, अन् पहातों तों काय! सारे गडी काटवणाच्या बाहेर पडून एका झाडाच्या सांवलीला खुशाल गप्पा ठोकीत अन् विड्या फुकीत बसले आहेत!

दुरूनच मला त्यानी पाहिलं, त्यामुळ त्यांची गडबड उडून गेली अन् मोठ्या लगबगीनं ते सारे पुन्हां कुरणांत घुसले. त्यांचा कावा तत्काल माझ्या ध्यानांत आला. "सायतानशी सांपडलेल्या सायबाला चांगला ताणायची" त्यांची आमना मला उघड दिसली, पण त्याची परिस्फुटता करण्याचा तो समय नव्हता

हांके लोकांच्या मंद मंद हांका वातावरणांत पुनरपि निनादूं लागल्या, अन् मीही पुनश्च आपल्या जागीं बारीवर जाऊन बसलों "आपण समजतों त्याप्रमाणं रामोशांच्या अंतर्यामींचा कुसूर निर्मूल झालेला नसून अद्यापि तिथं मूळ धरून आहेच तर!" मी आपल्या मनाशींच म्हणालों. इतक्यात

साहेबांच्या बारीवरून आलेला हवालदार माझ्याजवळ येऊन उभा राहिला, अन् "साबने आपकू उनका बागीपर बुलाया" असं मला म्हणाला. "या वेळीं मला माझ्या बारीवरून हलता येणार नाहीं," अस मी त्यास म्हणालों.

साब बोला, "दो अडीच घंटे हो गये फिर जानवर कैसा नही निकलता ?"

"साहेबांना जरासं सबूर करण्यास साग. या जगली श्वापदांच्या ढोपराना घड्याळं बांधलेली नसतात, त्यामुळं अस होत असावं. वक्तशीरपणापेक्षां आपलं शीर सलामत ठेवण्याकडंच त्या बेट्यांच सारं लक्ष असतं."

माझं बोलणं ऐकून, टमाट्याचा शिरका भुरकल्याप्रमाणं त्यान अगदी आंबुस तोंड केलं, अन् खाली मान घालून मुकाट्यान साहेबाच्या बारीकडं तो चालता झाला.

   

तिसरा प्रहर उलटून गेला होता. आतापर्यंत अगाखालींच घोंटाळत राहिलेल्या सांवल्या उगवत बाजूकडं झपाट्यान झुकूं लागल्या होत्या, अन् रविराजाचं रौद्ररूपही आतां बरंच सौम्य भासूं लागलं होतं. कालपासून ते चालू घटकेपर्यंत घडत गेलेल्या घटना अन् प्रसंग एकामागून एक चलच्चित्रा-प्रमाणं माझ्या डोळ्यांसमोरून निघून जात होते, अन् त्या परस्परविरोधी विचित्र देखाव्यांच्या दर्शनामुळं माझं मन सारख खालींवर हेलकावे खात होतं.

हांके लोकांच्या हाकांचा सूर क्षणाक्षणाला चढता होत चालला होता. अशा वेळेला मन अस्थिर असणं इष्ट नाहीं असं वाटल्यामुळं मी आपल्या-कडून शिकस्तीचा प्रयत्न करीत होतों, अन् साहेबांच्या बारीवरून एखादं

जनावर माघार फिरल्यास त्याचा समाचार घेण्यासाठीं बंदुकीचा ट्रिगरही उघडून सावधपणानं मी एकंदर हालचालीवर लक्ष ठेवून होतों. थोड्याच वेळानं, जनावरं हलल्याचा इषारा आंतल्या गड्यांकडून आम्हांस मिळाला तोच, उत्तर बाजूच्या साहेब असलेल्या बारीवर एकामागं एक, तीनचार आवाज झाले, अन् त्या आवाजांच्या पाठोपाठ आळ्यांन भयंकर गलबला झाला! आवाज काड्काड् करीत दीर्घकाल वातावरणांत घुमले, यावरून सावज हुकल हें मी मनांत समजून चुकलोच. [ सावज लागल्यास आवाज बद्का येतो. ] मग आतले गडी एकाएकीं इतके हलबलले कां याबद्दल माझा कांहींच तर्क चालेना. तो गलबला ऐकून माझं सर्वांग आपादमस्तक शहारल्या-सारखं झालं. मीं धावत धांवतच तिकडं निघालों तों मधूनच सगळे गडी आळ्याच्या बाहेर पडलेले माझ्या दृष्टीस पडले एकाद्या सुप्त ज्वालामुखीचा एकाएकींच उद्रेक व्हावा त्याप्रमाणं, एरवी गरीब दिसणारे ते रामोशी गडी संतापून गेले होते लालबुंद होऊन गेले होते त्या सगळ्यांचे डोळे! अन् हींव भरल्याप्रमाण रागानं ते थड्थड् उडत होते. इतके बिथरलेले मीं त्यांना पूर्वी कधीं पाहिले नव्हते. त्यांच्या अगदीं जवळ जाऊन मी उभा राहिलों "तात्या नागेसर साक्ष! वाइच चुकल, नायतर आमचं दोघं तिघं गडी म्येल व्हत आज ठार! शिकार केली व्हती कंधी याच्या बानी!!" त्यांच्यांतला कुणीतरी गडी कमालीच्या बेपर्वाईनें उद्गारला.

त्यांना शांत करण्याची मी आपल्याकडून पराकाष्ठा करीत होतों, तों तों ते अधिकच भडकल्यासारखे झाले अन् साहेबाला उद्देशून अद्वातद्वा भाषा करूं लागले. अघटित अन् अनिष्ट अशी घटना कुवेळ साधून आली होती. दोष कुणाचाच नव्हता, पण उपेक्षणीय असा हलगर्जीपणा मात्र खचितच झालेला होता. साहेबाच्या रायफलींतून सुटलेल्या गोळ्या फडाफड आवाज करीत त्यांना चाटून गेल्यासारख्या निघून गेल्या, अन् त्यांचा एक गडी तर

झीट आल्यामुळ धाड्कन् जमिनीवर आदळला. जनावरानं बारीच्या बाहेर तोंड काढतांच साहेबांनीं उतावळेपणानं त्यावर आवाज टाकले होते हाके नीर घालीत घालीत सावजाच्या पाठीवर आलेले असतात, ही वस्तुस्थिति अनभ्यस्तपणामुळं त्याच्या लक्षांतच आली नव्हती. सावज पटांगणात निघाल्यावर त्यास आडवं घेऊन हाणावयाचं तें न हाणता, त्यांनी सरळ उभ्या रेषेंत अन् घाईघाईनं आवाज टाकले, त्यामुळ जनावर तत्काल उलट फिरल अन् अडचण धरून भलतीकडूनच निघून गेल. "आपण टाकलेल्या तीन चार बारांपैकी एकादातरी लागू झाला असेल, अन् जनावर जायबदी होऊन काटवणात जाऊन कुठतरी पडल असेल," अस साहेबाना वाटल्या-मुळ ते मोठया टेसांत आपल्या परिवारासह तिथ येऊन दाखल झाले. पण लवकरच त्यांना एकदर प्रकार कळून चुकला, अन् घडल्या प्रकाराबद्दल त्यांनी शोचनीय दिलगिरी प्रदर्शित केली.

"तात्या, आमी चलतों आतां गांवाकड" इनकच बोलून रामोशी मडळी मोठ्या सणकीनं गांवाकड चालती झाली!

साहेबाचा नूर आतां पार उतरून गेला होता. आपल्या परिवारासह ते आस्तेकदम बंगल्याची वाट चालूं लागले अन् मग मीही माझ्या मळ्याकडं मोर्च्या फिरविला

चालतांना माझी पावल जड पडत होती अतःकरण भारावलं होतं, अन् डोकही सुन्न होऊन गेल होतं. "असंगाशी सग अन् प्राणाशी गांठ म्हणतात ती याला!" अस मी माझ्या मनाशीच पण कितीकदां तरी उद्गारलों.

## ' तक्झी ' व्हॅलीतील काळरात्र ! ६

हिंदुस्थानला जाण्याकरितां प्रस्थान ठेवण्याच्या तयारीला लागणार होतों आता मी

मार्टिन् हंटिंग्टन् अन् डब्ल्यू आर्मस्ट्रॉंग हे माझे जुने दोस्त § तिकडे कीनियांतच अजूनपावेतों रमले होते. आर्मस्ट्रॉंग साहेबांची रजा संपल्यामुळं नुकतेच ते स्वस्थानीं प्रयाण करते झाले, अन् खुशालचेंडू हंटिंग्टन् मात्र अद्याप आफ्रिकेच्या जगलांत, शहामृगांसारख्या न उडत्या पांखरांमाग अन् भासक्याभुसक्या सावजांमागं पायपिटी करीत वणावणा भटकत होता. त्याची शिकारीची शिरशिरी अजून कांही चांगलीशी शमली नव्हती. अशांतच

§ ' रानोमाळ ' मधील माझ आफ्रिकेतील दुसरी शिकार पहा.

मुंबासाच्या ' नॅचरल हिस्ट्री सोसायटी ' ची, पूर्ण वाढ झालेल्या अशा चार सिंहांच्या शवाच्या मागणीची टोलेजंग जाहिरात ' झूऑलॉजिकल् जर्नल् ' मध्यें फडकलेली एक दिवस सहजगत्त्या त्याच्या नजरेस पडली. त्या सोसायटीला सिंहांचीं तीं शवें पेंढा भरून अमेरिकेतल्या ' चिकागो झोओग्राफिक् ॲकॅडमी ' या संस्थेकडे पाठवावयाचीं होती, अन् त्याकरिता त्या सोसायटीनं चांगला भरभक्कम मोबदलाही पण देऊं केलेला होता.

हंटिंग्टन्चा जानीदोस्त आर्मस्ट्रॅांग स्वदेशी निघून गेला होता, अन् हंटिंग्टनसाहेब केवळ शौकाखातर तेथल्या जंगली तद्देशीयांसमवेत एकाकीं दिवस कंठीत असता, अचानकपणं सिंहाच्या शिकारीची ही पर्वणी आपल्या पायानं चालून आलेली होती; अशा वेळीं त्याना माझी आठवण झाली यात नवल कसलं ? मी हिंदुस्थानला अद्याप परतलो नसल्यास, खात्रीनं या शिकारीच्या कार्यक्रमांत सहभागी होईन अशी त्यांची कल्पना होती, म्हणून माझ्या पूर्वीच्याच पत्त्यावर पत्र पाठवून त्यांनी माझी चौकशी केली ' माझा आतां स्वदेशी परतावयाचा मानस आहे, ' अशा आशयाचा जबाब त्यास मीं तत्काल रवाना केला अन् हळूं हळूं मी त्याच तजविजीस लागलों.

पुरता एक आठवडाही मी त्यांना जबाब पाठविल्याला लोटला नव्हता तोंच, एक दिवस खाकी यूनिफॉर्म पेहेरलेला एक शीख इसम माझी चौकशी करीत आमच्या निवासस्थानीं येऊन दाखल झाला. त्यास पाहिजे असलेला मनुष्य मीच, अशी त्याची खात्री झाल्याबरोबर एकदम दोन्हीं पाय जुळवून त्यानं मला लष्करी पद्धतीचा सलाम केला, अन् हंटिंग्टन्नं दिलेलं पत्र त्यानं माझ्या हातीं दिलं. पत्र म्हणण्यापेक्षां, हंटिंग्टन्नं मजवर तें पकड-वॉरंटच काढलं होतं म्हणाना !

   

हिंदुस्थानाला परतण्याचे विचार माझ्या डोक्यात आताशा घोळत होते, तरी अद्याप ते प्रत्यक्षात उतरलेले नव्हते, अन् त्या बाबतींत निश्चित अशी कोणतीच तरतूद मीं अजून केलेली नव्हती. त्याच रात्रीं हंटिंग्टनच्या त्या दाढीवाल्या जासूदाबरोबर मी मुंबासास जाण्याकरितां निघालों, अन् दुसऱ्या दिवशीं सायंकाळी तिथ जाऊन पोहोंचलों. मोठ्या आस्थेवाईक अगत्यानं हंटिंग्टननं हंसत हसत माझं स्वागत केलं, अन् माझ्या रहाण्यासंवरण्याची सोयही चांगल्या प्रकारं लावून दिली.

दुसऱ्या दिवशी हंटिंग्टनन आपल्या मुद्याच्या विषयाचं 'सूतोवाच' मजपाशी केलं. त्याचं सविस्तर म्हणणं मी ऐकून घेतल त्यानं खेळासंबंधीं ठरविलेली योजना मला अगदी तपशीलवार समजावून दिली सोसायटी-कडून जेवढी मदत मिळण्यासारखी होती तेवढी देण्याचं तिनं कबूल केलं होतं, त्यामुळं आम्हांला साधनांची मोठीशी चिंता अर्थातच नव्हती. जंगल उठविण्यासाठीं वाकबगार माणसं अन् त्यांच्या सरक्षणाकरिता दोघे निष्णात बदुके त्यानं कायम केलेले होते; मजव्यतिरिक्त आणीकही एकादा सहकारी मिळाल्यास पहावा म्हणून त्यानं जंग जंग पछाडले, पण 'तक्झी व्हॅलीच' नाव काढलं की जो तो पाऊल मागं मागव घेई! तक्झी व्हॅलीच्या त्या घनघोर जंगलाच्या भागांत शिकारीला जाण्याची प्रेरणा होणं, म्हणजे 'स्वतःच्या हातानींच आपलं थडगं खोदून ठेवण,' असंच मानण्याचा प्रघात तिकडं पडून गेलेला होता. गेल्या खेपेला आही 'प्लाउडन् व्हॅली' मध्यें सिंहांची शिकार केलेली होती पण 'तक्झी व्हॅली' व्यतिरिक्त शिकारीचे परवाने हल्लीं मना करण्यात आलेले असल्यामुळं यावेळीं त्या बाबतींत त्याचा निरुपाय झालेला होता. शेवटी चाचरल्या वृत्तीनच हंटिंग्टननं ही अवघड जोखीम आपल्या शिरावर घेतली होती, चालढाळपणानंच तो पुढल्या हरएक तजविजी करीत होता, अन् चाबरत चाबरतच चक्षुरेंद्रियांच्याद्वारं जणूं माझं

मनोगत चापसून पहात होता—माझ्या मनाचा ठाव घेत होता तो ! त्याच्या अंतर्यामीं कोणत्या सवेदना थयमान घालून राहिल्या आहेत त्याचं आकलन मला यथार्थत्वानं–बरोबर झालं, अन् त्यामुळं मनांतल्या मनात मीही पण दराऱून गेलों नक्की असं काहीच आश्वासन मजकडून त्याला आजच्या बैठकीला मिळूं शकल नाही

   

शिकारी कितीही सराईत असो. सिंहाची शिकार म्हटली कीं, घटकाभर तो विचारांतच पडतो. कितीतरी वेळ मी बिछान्यावर झोंपेची आराधना करीत पडलो होतो, पण झोप येण्याचं बिलकुल लक्षण दिसेना. मनांत अनेक भलेबुरे, भयोत्पादक विचार येत. प्रद्योतबाबूंच्या हृदयद्रावक मृत्यूचा (' शौकीन शिकाऱ्याचा शोकपर्यवसायी शेवट ! ') प्रसंग सारखा डोळ्यांपुढं उभा राही. काय असेल तें असो, यावेळी माझ मन जरासं कच खात होतं इतकं मात्र खरं. भविष्यत्काली घडून आलेल्या भीषण घटनेची कृष्णछाया जणूं आगाऊच मला ग्रासून राहिली होती !

   

सिंहाच्या शिकारीची माझी हौस यापूर्वीच भागलेली होती. हंटिंग्टनन्नं व्यक्तिशः सोसायटीबरोबर सिंहांची शवं देण्याचा करार केलेला होता. शिकारीत यश आल्यास प्रत्यक्ष फायदा अन् नाव त्याचंच होणार होतं. मग मीं तरी आपला जीव फुकाफुकीं धोक्यांत काय म्हणून घालावा ? भीतीच्या पोटी व्यवहार मला आतां आठवला होता हिंदुस्थानाच्या परतप्रवासाची तरतूद परस्पर झाल्यास पहावी, असं माझ्या चित्तात आलं, अन् दुपारीं हंटिंग्टनशी याच विषयावर चर्चा करीत असतां, कसलाही आडपडदा न ठेवतां

मी तसं त्याला बोलूनही गेलों अर्धा मिनिटसुद्धा विचारांत न घालविता त्यानं माझी जरा जरब अशी भासणारी मागणी मान्य केलेली पाहून मी मनातल्या मनात चाट होऊन गेलों कोणत्याही मर्जीवर नकार देण्याला त्यानं आतां मला सवडच ठेवली नाही

आता माझ्या मनातल्या विचारांचा वारा वेगळ्याच दिशेन वाहूं लागला. भीतिदायक विचार चट सारे लोपून गेले. तत्काल हटिंग्टनूला मी माझ्या सहकार्याचं ठाम आश्वासन देऊन टाकलं, अन् जगलांत निघायच्या अगोदर 'एक आठवडा तरी मला आगाऊ सूचना मिळाली पाहिजे,' असं बजावून गोमेनीस जाण्यासाठी मी त्याचा निरोप घेतला.

जवळ जवळ महिना होत आला होता मुंबासाहून मला परतल्याला. 'अति सर्वत्र वर्जयेत्' असं म्हणून प्रत्येकजण इथं मला माझ्या स्वीकृत कार्यापासून परावृत्त करण्यास पहात होता. काय वाटेल तें झालं तरी हंटिंग्ट-नूशीं आतां प्रतारणा करावयाची नाही, शिकारीस जाण्याचा बेत फिरवायचा नाहीं असं मनाशीं मीं निश्चित ठरवल होतं, अन् हंटिंग्टनूच्या पत्राचीच वाट पहात प्रत्यही उगवणारे अन् मावळणारे कटाळवाणे दिवस ढकलीत होतों. अखेर एक दिवस, मी ज्या पत्राच्या वाटेकडं उत्सुकतेनं डोळे लावून बसलों होतों, तें पत्र टपालवाल्यानं आणून माझ्या हातीं दिलं. 'एम् हंटिंग्टनूचं' नांव एम्बॉस् केलेला तो लांबट निळा लखोटा मीं लगेच फोडला. पत्रांतला मजकूर वाचून मला विलक्षण हुरूप चढला अन् ताबडतोब मुंबासाला कूच करायचं मी ठरविलं

आमचे गोपाळराव ('गोमेनी'च्या जंगलांतील शिकार पहा.) सालो-साल नवं हिंदु पंचांग हिंदुस्थानाहून आवर्जून मागवून घेत असत. पंचांग पाहून प्रयाणासाठीं मी एक 'अमृतसिद्धि योग' मुक्रर करून ठेविला, अन्

त्या शुभ मुहूर्तावरच घराबाहेर मीं पाऊल ठेवलं पुढ, ‘ अमृतसिद्धियोग ’ साधून निघालेल्या मला तक्ष्मी व्हॅलीच्या खिंडीत ‘ मृत्युयोगानं ’ गाठलं हा प्रश्न अलाहिदा ! सुयोगाच्या राशीला कुयोगही केव्हा केव्हा हात धुवून लागतात, त्याला नवस्माल पचागकर्त्यांनीं काय कराव ?

   

रायफल, थोडेसे कपडे, बिस्तारा, अन् किरकोळ सामानाची पडशी घेऊन मी मुंबासाच्या वाटेला लागलों सोयिस्कर रेल्वे स्टेशनपर्यंत जाण्यासाठीं काही थोड्याशा मैलाचा प्रवास मोटारीनं करावा लागत होता मड्गार्ड अजी नसलेली आमची भुडी मोटार रोंरावत रोंरावत वेगान मार्ग आक्रमीत होती. रस्त्याच्या कडेकडेनं एक बुड्ढा कारवान खजुरानं लादलेली आपलीं दोन तीन खेंचर साधारगत' दामटीतच चालला होता हॉर्न् न देता पुढं निघून जाण्यास पुष्कळच अवसर असता—रस्ता खुल्लमूखुल्ला असता—आमच्या हुषार मोटारहाक्यानं, फाजील सावधगिरी म्हणून म्हणा अथवा हातांना चाळाच पडून गेल्यामुळ म्हणा, दोन तीन वेळा उगाचच जोरजोरानं हॉर्न् दिला गरीब बिचारा कारवान ! आपण अगदी कडेकडेनं रस्ता कटत असता मोटारवाला एकसारखा हॉर्न् देत आहे, त्याअर्थी त्याला इष्ट असलेली साइड ( ? ) आपण दिली पाहिजे असं त्याला वाटलं, अन् रस्त्याच्या डाव्या कडेनं जात असलेल्या आपल्या खेचरांच्या पार्श्वभागी सपासप त्यानं दोन दोन फोंकाट्या ओढल्या. आपल्या प्रेमळ धन्याच्या हातांतल्या ओल्या फोकाचे फटकारे चौकावर बसल्याबरोबर त्या मुक्या प्राण्यांनीं एकदम ‘ राइट अबाउट् टर्न् ’ केलं अन् रस्याच्या मध्यभागींच आमच्या मोटारीची अन् खेचरांच्या त्या रिसाल्याची सोळा आणे भरतभेट झाली ! ‘अमृतसिद्धि योगाचा’ तडकाफडकीं साक्षात्कार, घर सोडून पुरता एक घंटाही झाला नाहीं, तोंच

माझ्या पुरापुर प्रत्ययास आला ! प्रस्तुत अपघातात मी 'मृत' झालों नाहीं, अ-मृत राहिलों, ही काय साधीसुधी सिद्धी म्हणावयाची !

आमचा मोटारवाला खरोखरच मोठा चतुर अन् चलाख होता. मोटारीचं वांकडं (आऊट्) झालेलं चाक काढून शिलकी असलेल दुसर चाक त्यानं बोल बोल म्हणता मोटारीच्या आखात बसतं केलं, अन् त्या बेवकूफ कारवानाला चागला गरगरीत दम भरून, अन् पुन्हां एकदा 'जयसूचक' हॉर्न देऊन त्यान आपला बाष्परथ पुनरपि बेदरकार वेगानं सोडला !

साऱ्या वाटेनं तो त्या कारवानाला अचकट विचकट पण साजुक साजुक (अभिनव) शिव्या हासडीत होता त्याच्या मोटारीचं एक चाक वाकडं होऊन त्याची हकनाहक नुकसानी झाल्यामुळं त्याला भिरड येण सहाजिकच होत. त्या कारवानाचं काय ! फकस्त खुब्यांत मोडलेलं त्याच खेचर, मोटारीच्या धडकीसरसं, सार्वजनिक रस्ता बिलकुल न अडवतां, पार रस्त्याच्या कडेला जाऊन पाय पाखडीत पडलं होतं, अन् त्याच्यावर लादलेल्या गोणींतल्या खजुराच निम्मंनिम् वांटप करून लादायला त्या कारवानापाशी दोन खेंचरं अजून शिल्लक होतींच की !

   

प्रवासांत आणखी कांहीं विघ्न न येतां मुंबासाला मी सलामत येऊन पोहोंचलों हंटिंग्टन् शिकारीची पूर्व तयारी करण्यांत चूर होऊन राहिला होता. दोन तीन दिवसांतच खेळाची सर्व सिद्धता झाली, अन् शिकारीचा सरंजाम, स्वारीचे हत्ती अन् माणसं आम्हीं पुढं रवाना करून दिलीं. ग्लाउडन् व्हॅलीच्या नैॠत्येस आठ साडेआठ मैलांवर असलेल्या 'रॉब् रॉय' लायनी-पासूनच तव्झी व्हॅलीच्या जंगलभागास सुरवात होते. त्या लायनीच्या अलीकडल्या उतरणीला चांगली सोईस्कर अन् सुरक्षित अशी जागा अन्

पाण्याची सोय पाहून तिथ आम्ही आमच्या मुक्कामाची तरतूद केलेली होती, अन् एक उंचच उंच लाल निशाण खुणेकरतां आमच्या कॅम्पावर आम्ही फडकत ठेविल होतं आमच्या कॅम्पाची सुरळीत लागालाग लागल्याची वर्दी मिळाल्याबरोबर हंटिंग्टन् अन् मी आमच्या मागं राहिलेल्या सहकाऱ्यांसह कॅम्पाकडे जाण्यास निघालो.

आमचे पहिले दोन दिवस खेळाची रंगी तालीम घेण्यातच गेले. रंगी तालीम घेत असताच आमचा निम्मा शिम्मा हुरूप मावळला होता, अन् खऱ्या रंगभूमीवर खराखुरा रणरंग प्रयोग अजून रंगावयाचाच होता. तव्झी व्हॅलीसारखं भयाणभीषण अन् गुंतागुंतीच घनघोर जगल उभ्या आयुष्यांत आम्ही दोघांनीही पाहिलेलं नव्हतं. त्याच्या ओझरत्या दर्शनानंच आमचा होष उडून गेल्यासारखा झाला!

   

अफाट पसाऱ्याच्या त्या जंगलाच्या थोड्या मर्यादित टापूंतच खेळायचं आम्हीं ठरवल होतं. तांबडं फुटायच्या आंतच चहासमवेत आम्ही 'छोटी हजिरी' उरकून घेतली, अन् सहपरिवार ताबडतोब जंगलाकडे निघालों.

आम्ही जगलानजीक येऊन दाखल झालों तों सूर्य उदयाचलावर बराच चढून आलेला होता. पहांटेपासून पडलेल धूसर धुक पार विरून गेलं होत, अन् दिशा स्वच्छ उजळल्या होत्या खेळाची सिद्धता होतांच हक्के, पलितेवाले बंदुक्यांसह जंगलांत घुसले बिगुलवाले टेहळे अन् बाहुटेवाले उंच उच वृक्षांवरून चढून बसले, अन् सशस्त्र 'शिकारी निरीक्षक' (वॉचमेन) आपापल्या नेमलेल्या जागी निघून गेले. पहिला हक्का सुरू झाला, अन् आम्ही दोघेही आमच्या मदतनिसांसह आपापल्या वाहनावर आरूढ होऊन सावधगिरीनं श्वापदांची चाहूल घेत राहिलों.

हक्के हांका टाकू लागले. हाका खोलांतून आल्याप्रमाण अन् गहनगभीर अशा निनादत. उखळ्यांचे आवाज अन् बदुकांचे वायबार धडकू लागले, तसतशी आमच्या अत करणाची धडधडही वाढू लागली; या बारीपासून त्या बारीपर्यंत येरझारा घालीत सारखे आम्ही फिरत राहिलो होतो

अकरा साडेअकराच्या सुमारास डुकरांचा एक छोटासा खांडवा तेवढा उठला, अन् दुडकत दुडकत पठाराकडं उतरत जाणाऱ्या एका वरगळीला लागून उंच गवतात अदृश्य झाला.

विशेष अस कांहीही न घडता आणखी एक तास निघून गेला सूर्य आतां बराब्बर माथ्यावर आला होता. अतरिक्षात शेंकडोशें बुभुक्षित गिधाड घिरट्या घालीत होती. कावळे काव् काव करीत जंगलाभोवती भोवतींच घोटाळत होते, अन् सारसपक्षीही ( पिंगळे ) बसल्या ठिकाणीच पण अशुभ-सूचक शब्द किलबिलत होते. मदावतां मदावतां हांका शेवटी साफ बंद पडल्या तोंच विश्रातीचा बिगुल झाला, अन् त्याबरोबरच निस्तब्ध शांतता चहूंकड पसरली.

   

दुसरा हक्का सुरू झाला. हक्के लोक संथपणान हांका टाकूं लागले. उखळीचे आवाज वातावरणांत यथापूर्व घुमूं लागले, अन् क्षणभर सगळं कांहीं सुरळीत चालल्यासारख दिसल. डोळ्यांवर दुर्बिण धरून मी जंगलाची कड टेहळीत हौद्यात उभा होतो. एवढ्यांत बदुकीतून निघालेले दोन जित्या काडतुसाचे बार ( उखळीचा आवाज किंचित्काल घुमतो. वाझ काडतुसाचा आवाज खाडकन् होऊन नंतर थोडासा घुमतो. जित्या काडतुसाचा आवाज खालीं गेल्यास अथवा अंतराळांत–दीर्घकाल कडाडतो, अन् गोळी श्वापदास लागू झाली, तर सामान्यतः आवाज बदका येतो. हे सूक्ष्म भेदाभेद अनुभवी

शिकाऱ्याच्या तेव्हांच ध्यानांत येतात.) आमच्या कानीं आले, अन् आम्ही डोळ्यांत तेल घालून आमच्या ठिकाणीं हुषारीनं राहिलों. सावज उठून त्यानं हक्के लोकांवर मोहोरा केला असावा, किंवा हेरीला आलेल्या सावजाला बुजवून अन् भेडसावून बाहेर काढण्याकरितां त्यावर बंदुक्यांनी आवाज टाकले असावेत असं मला वाटलं, अन् उजव्या डोळ्याची पापणीसुद्धां न लववितां रायफल खवाट्याला जोडून व हौद्यांत अर्धा बसून व जईवर अर्धा पालथा पडून मी तक्षकासारखा श्वापदाची वाट पहात राहिलों

पुरा एक घंटा होऊन गेला. घटाभराचा तो काळ मीं फारच अस्वस्थ चित्तानं घालविला. हांका केव्हांच बंद पडल्या होत्या, अन् उदासवाणी स्तब्धता जंगलावर चहूंकडं पसरली होती. शेवटीं हॅमरवरचं बोट मी काढून घेतलं, अन् हर्टिंग्टनकड जाण्यासाठीं वळलों. तो, तोच इकडं येत असलेला मला दिसला. आल्याबरोबर त्यान, 'काय प्रकार आहे बुवा?' म्हणून मला सवाल टाकला. मीही त्याला नेमक तेंच विचारणार होतों! आम्ही दोघेही आतां जंगलाच्या कडेकडेनं वरती निघालों. थोडेसे पुढे जातो तोंच; हक्के अन् इतर शिकारी लोकांचा ताफाच्या ताफा गर्दीगर्दीनं जंगलांतून बाहेर पडलेला दिसला. हक्के लोकांपैकीं एका इसमास सर्पदंश झाल्यामुळं तो बेशुद्ध झाला होता. त्याच्या पोटरीवर दोन जागीं सर्पानें डांस मारलेला होता, अन् दंश करून तो पसार होत असतां, बंदुक्यानं छऱ्यांचीं काडतुसं घालून त्या सर्पाला ठार केलं होतं. त्या लोकांनीं बरोबर आणलेले त्या सर्पाचे तीन चार तुकडे आमच्या पुढ्यांत टाकले, अन् ते पहातांच, दंश झालेल्या त्या इसमा-चं भवितव्य मनांतल्या मनांत आम्ही समजून चुकलों. तो इसम उलगडेल अशी आशा करणं केवळ व्यर्थ होतं. खेळ अर्थातच तहकूब झाला, अन् त्या मरणोन्मुख इसमाला डोलींत घालून आम्ही सारे कॅम्पाकडं परतलों. त्याच रात्रीं सर्पदंश झालेला तो दुर्दैवी इसम मरण पावला. अन् खेळाच्या

सुरुवातीलाच–पहिल्या दिवशीच–' प्रथम ग्रासे मक्षिकापात· ' अशी आमची अवस्था झाली !

   

त्या मयत इसमाच्या दफनाकरितां दुसऱ्या दिवशीही खेळ तहकूब ठेवण आम्हाला प्राप्त झालं कालच्या दुश्चिन्हाच्या जाणीवेमुळ आम्हां दोघाचीं मनही उद्विग्न होऊन गेली होती विमनस्क मनानंच आम्ही सारे व्यवहार कसेतरी आटपीत होतों. तो कंटाळवाणा दिवस नेहमीप्रमाणंच मावळला. रात्रही सरली, थोडयाच वेळात दिशा फाकू लागल्या, अन् नंतर आम्ही जगलाकडे निघालो.

साऱ्या जगलावर आज उदासवाणी छटा पसरल्यासारखी झाली होती. आमच्या उदास झालेल्या मनाला उत्साह येण्याकरिता आम्हीं किंचित्शी ' शाभवी ' ( नियमाला अपवाद हा असतोच ) प्राशन केली, अन् देवाचं नांव घेऊन आपापल्या वाहनावर आरूढ झालों.

खेळास यथापूर्व सुरुवात झाली. हक्के हाका टाकूं लागले, अन् आम्ही दोघेही हौद्याच्या पितळी बारावर रायफली टेकून या बारीपासून त्या बारी-पर्यंत जागरूकपणानं गस्त घालीत राहिलों.

बारावर एक वाजायला आला. सुटीचा वक्त होत आला तरी श्वापदांची कांहींएक हलचाहूल लागेना नाहीं म्हणायला, हक्के लोकांना आंत एका विशिष्ट जागीं, एकादं मेलेलं जनावर सडल्यासारखी घाण दरपल्यासारखी वाटली, अन् त्यावरून, जवळपास श्वापद कुठं तरी जाळींत दबा धरून असावं, असा त्यांचा तर्क झाल्याचं टेहेळ्यांकडून आम्हांला कळलं. " घटका-भर सुटीचा बिगुल देऊं नका," म्हणून हंटिंग्टनूनं वॉचमनूकरवीं बिगुल-

वाल्याला निरोप केला, अन् बारीवर दुर्बिणी रोखून आम्ही दोघे दोहीकडं अगदी तयारीनं राहिलों

माथ्यावरला सूर्य आता चागला अर्ध कासरा मावळनीकड सरला होता, तथापि श्वापदाचा मागमुद्दा बिलकुल लागेना अखेर बिगुल झाला, अन् जिकडं तिकडं शांततेच साम्राज्य पसरलं.

विश्रांतीनतर पुन्हा दुसऱ्या हक्क्यास सुरवात झाली. चढत्या सुरांत हक्के हाका टाकू लागले, बदुकातून वायबार धडकू लागले. ताच, सावज हलल्याचा पुकारा झाला बारीकड मी आशापूर्ण नजर लावून बसलो हॅमरवर बोट ठेवून मी श्वासयुद्धां रोधून धरला, पण छे ! कुठ्ठ काही नाही. हाक्याना सावज ओझरतं दिसलं, अन् पुन्हा तें दाट अडचणीत अदृश्य झालं

कलाक दीड कलाक होत आला होता. तेंच सावज पुन्हां दुसऱ्यांदा हाक्यांना उठलं. त्याला बाहेर हुदडण्याकरता हाक्यानी यावेळीं आपल्याकडून अगदी शर्थ केली, पण तें इब्लिस श्वापद पुन्हा दाट वेलतुरांनी आणि टणटण्यांनीं वेष्टिलेल्या कांटेरी झुडपाच्या जाळीत शिरलं अन् नजरेआड झाल !

शिरवळ पडण्याचा सुमार झाला, अन् आमच्या माणसाची जमाजम झाल्यावर आम्हीं सर्वांनी कॅम्पाकड कुच केलं.

   

तव्झीच्या जंगलात पदार्पण केल्याला आम्हाला जवळ जवळ एक आठवडा होत आला होता. खेळाच्या बाबतीत आमची म्हणण्यासारखी प्रगति झाली नव्हतीच, पण अपयशाचं भरमाप मात्र आमच्या पदरात पडल होत. यशः-प्राप्तीसाठीं आम्ही आपल्याकडून प्रयत्नांची शिकस्त करीत होतों, तों तों दैव आम्हांला सोडून आम्हांपासून दूर दूरच पळत होतं आशेचा लहानसा कवडसाही आम्हांला यावेळीं सर्च लाईट्प्रमाण भासला असता, पण तोही

आमच्या दृष्टिपथांत येईना वारा सर्वतोपरी प्रतिकूल वहात असल्याची जाणीव थोड्या उशीरानं कां होईना, पण आम्हाला झाली होती पण आरभलेला उद्योग अर्धवट सोडून अन् सकटाना पाठ दाखवून यःपलाय करणं आम्हाला नामुष्कीच वाटत होतं आमचे पहिले दोन दिवस खेळाची तालीम घेण्यात खर्च झाले तिसऱ्या दिवशी जगलात सर्पदशानं आमचा एक माणूस दगावला त्या मयत इसमाच्या दफनासाठी आम्हाला आणखी एक दिवस खेळ तहकूब ठेवावा लागला, अन् पांचव्या दिवशीही सावज बाहेर न पडल्यामुळे खेळाचा निव्वळ खेळखंडोबा झाला. एक दिवस विश्रांति घेऊन आम्ही पुन्हा आज जंगलात येऊन हजर झालो होतों. आमच्या नशिबाची पुरती कसोटी पहाण्याच आज आम्हीं ठरविल होतं. शिकार मनाजोगी झाल्यास, रानकाढ्यांना आम्ही चागली बक्षिसी देऊं अशी लालूच लाविली होती, त्या आशेन तेही आज मोठ्या हिरीरीनं रान उठवीत निघाले

हाका टाकतां टाकतां हक्के लोकाचे घसे पिंजून निघाले. पण श्वापदाचा तलास काही केल्या लागेना बारा साडेबाराच्या सुमारास एक मोठा सुळेवाला पुष्ट डुक्कर उठून एका बारीवाटं झुकाडी देऊन निघाला. प्रचड वाहनांवर रायफलीचे घोडे उघडून तय्यार होऊन राहिलेल्या आम्हा दोघांना कस्पटासमान लेखून, तो आम्हां दोघांच्याहीमधून बेदरकारपणान रुकत रुकत चालला होता. त्याला गोळी घालण्यासाठी हात शिवशिवत असताही, मनाची बिलकुल चलबिचल होऊं न देतां मी नुसताच त्या मस्त वराहाकडे बघत बसलों होतों. इतक्यांत हटिंग्टननं एकामाग एक गोळ्या त्याच्या बरगडीवर झाडून त्याला जागच्या जागी ठार केलं ! एकदर परिस्थितीवर तो मनांत कमालीचा चिडून गेला होता, अन् त्यामुळच त्याला यावेळीं आपल्या मनाला आकळतां आलं नाही.

विश्रांतीच्या सुटीनतर पुनश्च खेळास सुरवात झाली. घंटा झाला. दोन घंटे झाले, तिसरा घंटाही अर्धा अधिक होऊन गेला. दिवस कलू लागला.

शिरवळ पडावयाला आतां थोडासाच अवधि राहिला होता. आम्हीं दोघेही आतां थोडेसे खालीं सरून एकाच बारीवर उभे होतों. हक्के जंगलाच्या ऐन अंतर्भागांत घुसले होते हांकाही हलक्या सुरांत अन् खंडित अशा उठन होत्या. आम्हांला आतां खेळाविषयीं विशेषशी आशा अन् आस्था वाटत नव्हती. त्यामुळं आम्हीं थोडेसे गहाळच पडलों होतों. हटिंग्टन्नं मनगट मुडपून पाहिलं तों साडेपांच वाजून गेले होते. हक्के बाहेर पडावयाचाच काय तो अवकाश होता, की खेळ खलास ! आम्हीं दोघांनींही हातांतल्या रायफली खाली ठेवल्या अन् आतां सिगारेटा शिलगावण्याच्या बेतांत होतों तोंच आंतल्या अंगास हक्के लोकांत एकदम मोठा गलका झाला, अन् उखळयाच्या अन् बंदुकांच्या फैरीवर फैरी झडूं लागल्या. घाईघाईनं आम्हीं पुन्हां रायफली उचलून घेतल्या, तोंच वनराजाचीं गगनभेदी गर्जना आमच्या कानांवर आली. तत्काल आम्ही रायफली गुडघ्यावर घेनल्या अन् त्यांचे घोडे उघडून सामना देण्यासाठीं तयार होऊन राहिलों सावज अद्याप आमच्या दृष्टीच्या टप्प्यांत आलं नव्हत, पण आणखी एक मेघगर्जनेपेक्षांही गद्‌रोळ गरजणारी गर्जना मात्र वातावरणांत निनादली. ती ऐकून आमच्या डोळ्यांपुढें क्षणमात्र काजवे चमकल्याप्रमाणें झालें, अन् आमच्या पायांखालची जमीन जणूं दुभगते आहे असं आम्हांला वाटलं. खवाड्याला रायफली जोडून आम्हीं बारीकडं त्या रोखल्या, तोंच आपल्या सणसर बच्चांना पोटाखालीं घालून एक सिंहाची मादी प्रथम बाहेर डोकावली अन् तिच्या पाठोपाठ सिंहांची दोन प्रचड धुडं कडेवर येऊन पवित्र्यांत उभीं राहिलीं. कडेवरच्या खुरट्या पण दाट झुडपांतूनच त्यांनीं आम्हांवर आपली करडी नजर रोंखली, अन् पुन्हां एकदा जमिनीला तोंड लावून गर्जून, 'आमच्या वाटेस न जाण्या-बद्दल' त्यांनीं आम्हांला जणूं निर्वाणीचा इषाराच दिला ! त्या इषाऱ्याला भिऊन कर्तव्यविन्मुख होण्याइतके कच्च्या दिलाचे आम्हीं नव्हतों, पण

खुल्या मैदानात निघाल्याशिवाय आम्हाला त्या श्वापदांवर आवाज टाकतांच येईनात. त्यांच्या पाठीवर आमचीं माणस होती अन् स्पष्टपणं सावज नजरेंत आल्याशिवाय अनमान धपक्यानं आवाज टाकणं केवळ जोखमीचं होतं. अडचणीत आवाज टाकून त्यांना खालींपिलीं डिंवचण्यांत धोकाच होता. हरणं अथवा गयाळ अस्वलं नव्हती ती ! 'तक्क्षी व्हॅली' च्या घनघोर अरण्याचे स्वतंत्र व बलाढ्य असे सर्वाधिकारी होते ते ! निष्कारण कुणी आगळीक केल्यावर पड खायला ते कांहीं परतंत्र नव्हते, अन् सुधारलेल्या मानवाप्रमाण शत्रूला पाठ दाखवून पळण्याची, छे–चुकलों–' यशस्वी माघार ' घेण्याची–विद्या त्याना अवगत झालेली नव्हती

सरळ सरळ निघून जाण्याच्या हेतूनं क्षणभर दबा धरून बसलेले ते जंगलचे राजे आतां किंचित् पुढं सरसावले, पण पटांगणांत न येता, झुडपांच्या अन् उंच गवताच्या आडोशान मुरत मुरत आम्हाला बगल देऊन निघाले. आज आठवडाभर चातकाप्रमाणं आम्ही ज्याची वाट पहात होतों, त्यांची गांठ पडूनही त्यांना डोळ्यांदेखत साकसूरत निसटून जाण्याची संधी देणं आमच्या जीवावर आल, अन् संथपणानं जात असलेल्या सिंहांच्या त्या जथ्यावर फारसा विचार न करतां आम्हीं दोन दोन फैरी झाडल्या. जो अविचार–जो प्रमाद–आपल्या हातून घडू नये असं आम्हांला वाटत होतं, नेमका तोच अविचार शेवटी आम्ही विचारानं केला !

त्या जथ्यांतलं एकादं तरी श्वापद पोळल असावं. आम्ही आवाज टाकल्याबरोबर एक पवित्राही पुढ न टाकतां खवळलेलीं तीं सारी श्वापदं एकदम उलटली, अन् विद्युद्वेगानं किरण फेंकीत आम्हांवर त्वेषानं तुटून पडलीं. आम्हीं दोन दोन तीन तीन आवाज त्या बेहोष होऊन गेलेल्या श्वापदांवर टाकले, पण आमच्या वाहनांची अन् त्या रणझुंजारांची निकराची झुंज लागल्यामुळं त्या घालमेलींत आम्हांला स्वस्थपणानं आवाज टाकतां

आले नाहींत. आम्ही टाकलेले बहुतेक आवाज खाली गेले नाहीं म्हणावयास कुणाच्या तरी गोळीला पुढं सरसावलेली ती मादी तेवढी बळी पडली पण त्यामुळें ते गजांतक अधिकच चिडीस गेल्यासारखे झाले, अन् एकान माझ्या हत्तीची सोंड त्वेषानं कडकडा फोडली मोठ्या आवेशानं झेंपा टाकीत ते वर चढून याव-यास बघत. आमच्या रायफलींतून भरलेली काडतुसं खलास झाली, अन् नवी काडतुसं भरणही आम्हांला मुष्किलीच झाल अखेर मोठ्या सायासानं आम्हीं एकदाचीं काडतुसं भरली पण आमचीं वाहन भांबावून सैराटासारखी पळत सुटल्यामुळं शिस्त धरून, आमचा पाठलाग करीत आलेल्या आमच्या शत्रूवर गोळ्या झाडणं आम्हांला केवळ अशक्य झालं. आम्ही शिस्त न धरतांच त्या पिसाळलेल्या श्वापदावर लागोपाठ पाच सहा फैरी झाडल्या. जिवाची आशा नसते कुणाला ? आमची दाणादाण उडवून देऊन अन् आम्हाला दशदिशा पळावयास लावून मगच त्यांनी आमचा पिच्छा सोडला, अन् विजयोत्साहान गर्जत गर्जत आमच्या शत्रूंचा तो जथाच्या जथा तिथल्या उंच गवतात घुसून अदृश्य झाला.

एका भयंकर सकटांतून सहीसलामत आम्ही सुटलो, अन् स्वर्गद्वारी जाऊन दाखल झालेले आमचे पंचप्राण पुन्हां आमच्या कुडीत परतून आले.

   

'हळू हळू अंधार पडूं लागला, अन् आकाशांत एक एक चांदणी उगवूं लागली.' किती मोहक दृश्य ! बंगल्याच्या गच्चीत गुलगुलीत माणसाशीं गुलगुल गोष्टी करीत बसल असतां हें दृश्य मनोहर वाटत असेल नव्हे ? पण तेंच हृदयंगम दृश्य पाहून यावेळी आमच्या उरांत धडकी भरली ! आमचीं अतःकरण कभिन्न काळोखानं आधीच व्याप्त झालेलीं होती, अन् आज दिवसाउजेडींच आमच्या डोळ्यांपुढं चांदण्या चमकूं लागल्या होत्या !

आमच्या वाहनाचा होष अगदी सुटल्यासारखा झाला होता, अन् वाट फुटेल तिकड ती वाफडत सुटली होती आर ( अकुश ) हातीं घेऊन बसलेला माहुतही आपल्या जाग्यावर ठरेना. माहुताच्या इषाऱ्यास ते प्राणी जुमानीनातसे झाले, इतकच नव्हे तर अधिक प्रसंग केल्यास माहुताला खालीं ओढावयासुद्धां त्यांनीं कमी केलं नसतं. पांचसहा मैल याप्रमाण ते सारखे वाफडत होते. शत्रूनी आपला पिच्छा सोडल्याच आत्ता कुठं त्यांना जाणवलं होत अन् त्यामुळं ते किंचित् थंड झाल्यासारखे झाले. शत्रूशीं झुंझत असतां ते चागलेच जरबून गेले होते त्याच्या अगाची फाफरच्या फाफरं लोंबली होती, अन् त्यांतून एकसारखा रक्तस्राव होत होता. झालेल्या जखमा बाधायला त्याच्यापाशीं मलमपट्टया होत्याच कुठं ? पण त्यांना कांहींतरी तोडगा सुचला असावा वाट कटतां कटतां किंचित्काल ते थबकल्यासारखे झाले. आपल्या शुडा उच उभारून त्यांनी त्या इकडून तिकडे अन् तिकडून इकडे किनीकदां तरी फिरविल्या, अन् कसल्यातरी इराद्यानं पुन्हा ते कुठं तरी निघाले

नशीबावर हवाला ठेवून हवालदिलपणान हौद्यांत आम्ही बसलो होतों. भयाण काळोख चहूंकड पसरला होता. सोसाट्याचा वारा रो रों करीत वेगानं घोंगावत होता. रातकिड्यांचा किर्र् शब्द एकसारखा कर्कशत होता, अन् वनसंचारार्थ बाहेर पडलेल्या कोल्ह्याची कुई राहून राहून आमच्या कानांवर येत होती आमची वाहनं आम्हांला कुठं घेऊन चाललीं होती हें आम्हांला कुणालाच ठाऊक नव्हतं. आमचे सहकारी कुठं पांगले होते याचा आम्हांला पत्ता नव्हता, अन् आमचं मुक्कामाचं ठिकाण कोणत्या दिशेला अन् किती दूर होतं तेंही आम्हांला अवगत नव्हतं. थोडा वेळ गजराजांची ती जोडी उंच गवतांतून धीमे धीमे वाट काढीत चालली होती. ते प्राणी गवत चारीत चारीत चालले असतां गवताचा सळसळ असा आवाज होत होता. अशा

रीतीनं सुसमाळपणानं क्षणभर वाट चालत असतां एकाएकींच ते चमकल्या-
सारखे झाले, अन् तोंडानं भयप्रद चीत्कार करीत पुन्हा ते सैरावैरा धांवत
सुटले त्या गडद काळोखांत त्यांच्या नजरेला काय पडलं, अन् ते इतके
बुजले कशाला तें त्यानं किंवा त्या परमेश्वरालाच ठाऊक ! आता मात्र
आमची जीवाची आशा पार सुटल्यासारखी झाली. माझ्या सहकाऱ्यानं तर
घाबरून हौद्यातून उडी घेतली ! आमच्या रायफली तरी धड रहातात की
नाही याची आम्हांस वानवाच वाटली. निराश मनान रायफली पायाखाली
दाबून धरून अन् दोही हातानी हौद्याचे बार घट्ट पकडून आम्हीं बसून
राहिलों आमचे महातही हातच्या आरा फेकून देऊन अन् तोंड फिरवून
बारांना धरून बसले होते "सैतानाची मजलिस ' अस या जंगलाच्या टापूला
आमच्या मुलखात म्हणतात! इथ शिकारीला आलेला शिकारी धडया**नं
परत गेला अस आजवर कधीच घडलं नाही भरभक्कम मेहनताना अन्
बक्षिशीच्या लालचीनं आम्ही या मसणखाईत आलों " अस म्हणून माझ्या
हत्तीचा महात एका हातान आपल कपाळ बडवून घेऊ लागला. वरचेवर तो
दचकल्यासारखा होई, अन् कुठंतरीच पाहू लागे. बराच वेळ वाफडल्यानंतर
ते दोन्हीं हत्ती आतां जरासे थड आले होते, म्हणून आपल्या बैठकीवर
जाऊन बसण्यासाठीं माझ्या माहुतान आपलं तोंड वळवलं, तोंच 'अरे
बापरे' अस भयाकात होऊन तो ओरडला, अन् पुन्हा पाठीमागं सरून त्यान
हौद्याचा बार घट्ट पकडला हटिंग्टन्न अन् मी डोळे फाडफाडून समोर
बघितलं. तो तसल्या काळोखांतही, पुढ पसरलेल्या अफाट जलाशयाचा
धूसर पृष्ठभाग स्पष्टपणं आम्हांला दिसला. आतां तीं संत्रस्त जनावर त्या
जलाशयात शिरून डुबी घेणार याबद्दल कुणालाच शंका राहिली नव्हती.
विद्युद्वेगानं हंटिंग्टननं खिशांतला टॉर्च काढून उजळला, अन् तो माझ्या
तोंडावर रोखून डोळ्याची पापणीही न लववितां तो माझ्याकडं पहात निमिष-

मात्र उभा राहिला 'आतां धैर्यानं मरणाला सिद्ध हो ' इतकच बोलून अन् 'गुड् नाइट्' करून त्यान टॉर्च मालविला माझी दृष्टीही त्याच्या दृष्टीशी खिळून राहिली होती अन् त्याचे हिरवेनिळे डोळे पाण्यान डबडबले होते !

भित्यापाठी ब्रह्मराक्षस ! जखमी झालेलीं आमची वाहनं आतां त्या जलाशयांत जाऊन बुडया घेणार अन् त्याबरोबरच आमच्या जीवनाचंही विसर्जन होणार असं आमच्या मनानी घेतल पण पशुकोटीत जन्माला येऊनही त्या चतुरस्त्र प्राण्याना आपल्यावरच्या जबाबदारीची जाणीव निःसंदेह होती जलाशयाच्या कडेवर येताच ते दोन्हीही ऐरावत संथपणानें एकेक पाऊल टाकोत त्या चिखलांत शिरले. आपण शतपावली करतों त्याप्रमाण बराच वेळ त्यानी तो चिखल खदाळला. सोंडांनी, जिथं जिथं जखमा झाल्या होत्या तिथ तिथं त्यानी तिथला तो दाट चिखल लिपला, अन् मग आस्ते आस्ते पावल टाकीत तीरावरल्या सुक्या जमिनीवर येऊन प्रशात चित्तानं झुलत ते उभे राहिले दिवस रात्र आम्हांला पाठीवरून वाहून नेणाऱ्या त्या इमानी प्राण्यांच्या जखमा बांधावयाला आम्ही माणस यावेळीं असमर्थ होतो स्वतःचे जीव कसे बचावतील या विवचनेपुढं त्यांच्या जखमांची आम्हांला बिलकूल फिकीर या घटकेला वाटत नव्हती ! त्या वाचाहीन परतु नोकदार प्राण्यांनी स्वतः जातीनंच आपल्या जखमांना मलमपट्टया बाधल्या ! !

पाण्यांत न शिरता ते भले प्राणी परतून पुनरपि तीरावर येऊन उभे राहिले किती विस्मयकारक घटना ही ! तीरावर आल्याबरोबर हंटिंग्टननं एकदां मोठ्यानं टाळी वाजविली अन् 'आता आपण खास मरत नाहीं, निर्वाणीचा तो क्षण केव्हांच निघून गेला,' असं म्हणून खिशांतला टॉर्च काढून त्यानं तो पुन्हां उजळला. त्याचे डोळे जीवनाशेच्या अननुभूत आनंदानं चमकूं लागले. त्याच क्षणी, हौद्यांतून उडी घेतलेल्या माझ्या सहकाऱ्याची स्मृति त्याला झाली,

अन् 'त्या बिचाऱ्याची आतां काय गत होईल ? ' असे दु:खोद्गार त्याच्या मुखावाटं बाहेर पडले !

'आपली तीच त्याची ! त्याच नखसुद्धा दृष्टीस पडण्याची आतां बात काढूं नका !' त्याचा सहकारी बोलता झाला. इतक्यांत दिवसभर श्रांत झालेलीं आमचीं वाहनं एका पाठोपाठ गुडघ्यावर बसली, अन् त्यामुळं आमच्या मनासही आतां जरा निश्चितपणा वाटू लागला हलकेच मी आपल्या हौद्यातून उतरून हंटिंग्टनच्या हौद्यांत चढून जाऊन बसलों. माझा हात धरून अन् हाताला एक फारच जोराचा झटका देऊन त्यान मजबरोबर शेकहॅन्ड केला डाव्या हातानं उजवा हात चोळीत चोळीत, ' किती वाजले तें तरी एकदां पहा, ' असं म्हणतांच काहींएक न बोलतां तो मोठमोठ्यानं हंसूं लागला, अन् टॉर्चच्या उजेडात त्यानं आपल मनगट मजपुढं उपडं धरलं. त्याच्या घड्याळाची कांच तर जाग्यावर नव्हतीच, पण घड्याळाची पार चिपोटी होऊन गेली होती. त्यानं हलकेच तें सोन्याचं घड्याळ मनगटातून उतरलं अन् तुमानीच्या खिशांत दडपल 'थोडीशी व्हिस्की बिस्की या वेळी आपल्याजवळ असती तर बहार झाली असती नाही ?' मला उद्देशून तो म्हणाला ' नव्हती तेंच बरं झालं. व्हिस्कीचा मजा दूरच राहिला, पण बाटलीच्या कांचा अंगांत घुसून आपल्या वाहनाप्रमाण आपलीं अंगं मात्र रक्तबंबाळ झाली असती ! ' मी असं म्हणताच, माझ्याकडं पहात तो दिलखुलासपणानं हंसला, अन् माझ्या समाधानवृत्तीची त्यानं मनःपूर्वक तारीफ केली.

   

चंद्राची कोर क्षितिजाच्या बरीच वर निघालेली दिसूं लागली यावरून मध्यरात्र उलटून गेली असावी असा आमचा तर्क झाला. आजची काळरात्र उजाडलेली आपण पाहूं अशी बरीचशी आशा आम्हां दोघानाही आतां

वाटू लागली होती. पण आमचे सारथी अन् हर्टिंग्टनचा जोडीदार एकाद्या जडमूढाप्रमाणं खाली माना घालून निराश मनानं उसासे टाकीत बसले होते. त्याना हुरूप आणण्यासाठी आम्ही अनुभविलेले कित्येक प्रसग तिखट-मीठ लावून त्यांना सुनवीत होतों तोंच एकाद्या गिरणीचा भोंगा सुरू व्हावा त्याप्रमाणं हुबेहुब आवाज जवळच कुठंतरी गुंगू लागला! 'अजगर झील टाकीत आहे,' माझा महात उद्गमेखून म्हणाला 'जीते रहो पट्ठे,' जोरानं आपल्या जोडीदाराच्या पाठीवर थाप टाकून हर्टिंग्टन ओरडला संकटांनीं खचून जाण्याऐवजी संकटांशी झगडण्यासाठी जणूं तो आता दंड थोपटून उभा होता. मिनिटानी मिनिटं अन् तासामागं तास उलटत होते. वन्य श्वापदाचे आम्ही कधीही न ऐकलेले चमत्कृतिजनक अन् भेसूर असे शब्द मधून मधून कानावर पडत होते. हंर्टिंग्टन्‌न आपली रायफल उचलून हातीं घेतली, अन् तिचं तोंड वर आकाशाकडं करून तो एकमारख्या फैरीवर फैरी झाडीत सुटला!

रात्र सपून आभाळ आतां फटफटीत व्हायला लागलं होत. बरीचशी विश्रांति मिळाल्यामुळ ताजीं झालेली आमचीं वाहनं उठून उभी राहिलीं होतीं, अन् आमच्या सारथ्याच्या जीवात आता नव्यानं जीव आल्यासारखा झाला होता. थोडयाच वेळानं चांगलं फटफटल अन् सूर्याचे सोनेरी किरण क्षितिजावर दिसू लागले सर्व भेदाभेद विसरून आम्ही परस्परांना एकवार घट्ट कवटाळल, अन् उदयाचलावर चढून आलेल्या तेजोरश्मि सूर्यनारायणाला मनोभावानं प्रणिपात केला

अडीच तीनशे चाक सतत फिरतं आहे तिथं.

मळ्याचा बागायती गांव असल्यामुळ भुईमूग, मका, राताळी वगैरे हर-जिनसीं पिकं पाटसचे मळेकरी काढीत असत, पण रानडुकर ती पिकं तयार होण्याच्या ऐन रंगांत आलीं की, रात्री बेरात्री पिकांतून शिरून ती त्या पिकाचा पार खुर्दळा करून टाकीत. उखळीबारांला त्यांचे कान चांगले सरावले होते, अन् शेतकऱ्यांचीं कुत्री तर त्यांच्या खिसगणतींतच नव्हतीं. तिथल्या स्थायिक झालेल्या रानजनावरांशिवाय त्या हंगामाच्या दिवसांत आसपासचीं बुभुक्षित रानडुकरंहि भरीत भर म्हणून त्या शेतकऱ्यांच्या राशीस लागत.

त्या साली पावसानं साफ डोळे वटारल्यामुळं भोंवतालच्या परिसरांत त्या जंगली श्वापदांची जोगवण होण्यासारखं हिरवं पारवं असं कांहीसुद्धां

राहिलं नव्हतं. पाटसाला डोंगराची अन् काटवणा निवडुंगाची दडण पुष्कळ, अन् पाण्याची सोयही मनपसंत. जुन्या नव्या दोन्ही तलावांत पाण्याचा टिपूसही नव्हता, तरी मळ्यांमळ्यांनी शेतकऱ्यांनी आपल्या शेतीच्या जित्राबासाठी विहिरीच्या धावेपुढं तुडुब भरून ठेवलेल्या डोबा जणूं आपल्या 'बापाची मत्ता' अस समजून तीं रगेल रानडुकर खुशाल त्यांत येऊन पडत, अन् रात्रभर पिकाचा फडशा पाडून यथेच्छ जोगावल्यावर फटफटायच्या आत आपापल्या खोपांतून अथवा डोंगराच्या अडसरांतल्या कपारी खबदाडांतून जाऊन वामकुक्षी घेत बिचाऱ्या त्या मळेकऱ्यापाशी ना हत्यार ना पात्यार अहोरात्र त्यांनी हाडाची काडं करावीत, अन् पीक हातातोंडाशीं येत न येतं तोच रानजनावरांनी त्याचा सत्यानाश करावा, अशा स्थितींत त्यांना 'त्राहि भगवान' होऊन जात असल्यास नवल कसलं ?

माझ्यापाशी बंदूक असल्यामुळे अर्थातच मी हमेशा बंदुकीनं खेळत असे. पण वैचित्र्य अन् गंमत म्हणून कधी कधी मी जुन्या गांवठी पद्धतीन वाघरा देऊनही डुकरांवर खेळत असे माझ्या रामोशी दोस्तानाहि बंदुकीन खेळण्यापेक्षा वाघराचाच खेळ अधिक पसत पडे. कित्येक हळव्या मनाचे पांढरपेशे अन् गळ्यांत तुळशीच्या मण्याच्या माळा लटकविलेले गांवातले काही माळकरी अन् टाळकरी त्या खेळाला 'अघोरी कृत्य' म्हणून नाकं मुरडीत. पण 'विधवेला कुंकवाची उठाठेव कशाला' असं म्हणून मी तिकडे नेहमी दुर्लक्षच करीत असे. आज तेच मळेकरी-माळकरीहि अर्थात् त्यांत होतेच, माझ्या मळ्यात जमून आले होते. अन् त्यांना आजवर सतावून सोडलेल्या त्या रानजनावराचा कांटा काढून टाकण्याबद्दल माझी विनवणी करीत होते. पाहुण्याकडून परस्पर साप मारविण्यात कुठ हिंसा होत असते! वाघरांच्या खेळातला अमानुषपणा आता पार लोपून गेला होता, अन् मानव जातीला उपद्रव देणाऱ्या जंगली पशूंची हत्त्या करणे हें पापकर्म नसून कर्तव्यकर्मच

आहे अस मानण्यापर्यंत सगळ्या कृषीवलाच मतपरिवर्तन घडून आलं होतं. घोड्यावरून डुकरांची शिकार करण्यांत जी मौज आहे, तशीच थोडीशी मौज याही शिकारींत आहे. आपणांस 'सुधारलेले' म्हणविणारे लोक असल्या प्रकारच्या खेळाला वाटेल ती नांवं ठेवोत ! चालू युद्धांत हजारोंनींच नव्हे तर लाखांनीं मुंग्यांप्रमाणं माणस पटापट मरत असल्याच्या बातम्या वाचून कुणी झीट येऊन पडल्याचं माझ्या कांही कानांवर नाही शिकार म्हणजे बोलून चालून दुसऱ्याचे प्राण घेण्याचा खेळ, असं गृहीत धरून चालल्यावर 'तें निर्घृणपणाचं कृत्य' म्हणण्यात काय अर्थ उरतो ? चालू वहिवाटीचा कायदा मोडून थोड्याशा वेगळ्या प्रकारानं जंगली श्वापदांचे प्राण घेतले म्हणून बिघडलं कुठं ? वाघरीत पकडलेली सावज भोंसकून मारणं जरासं रानवटपणाचं भासतं खर, पण तें निव्वळ नजरेचं पाप आहे. एकदां नजर मेली कीं, आवळे चोंचावणं अन् डुकराना टोंचण यांत काहीच तफावत वाटत नाही.

पाटस गावापासून केडगावाकडं जातांना दोन मैलांवरच मोलापूर सडकेला 'भावसार' चा ओढा आडवा जातो. त्या ओढयावर त्यावेळी काहीं पूल झालेला नव्हता; तो अलीकडंच झालेला आहे. ओढयाच्या कडेच्या दरडी दाट निवडुंगानं अन् काटवणानं व्याप्त होत्या त्या वेळेला. वाघरीचा खेळ असल्यामुळं अन् खेळाची जागा गांवानजीकच असल्यामुळं शेतकऱ्यांची अन् गांवकऱ्यांची गर्दी लोटली होती गंमत पहावयासाठीं. दौंडच्या बाजाराचा दिवस होता आजचा पुण्याहून बाजारासाठीं निघालेले घेवारी अन् उदमी 'सर्व्हिसवाल्याना' जादा हंशील देण्याचें कबूल करून शिकारीची मौज पहाण्यासाठीं जरासे वाटेतच थाबून राहिले होते. मोटारीच्या टपावरून चढून बसले होते ते सगळे.

रामोशी गड्यांनीं फांसाट्या तोडून आणल्यावर लगेच ओढयाच्या अगानं

वाघरा दिल्या. टेहळे झाडाझाडांनीं चढून बसले प्रत्येक बारीवर हातांत भाले घेऊन रामोशी गडी बसले, अन् उत्तर बाजूच्या अगदीं कडेच्या बारीवर, तितक्यातूनही श्वापदे गुगारा देऊन निघून गेल्यास त्यांचा समाचार घेण्यासाठीं मी बंदुक घेऊन बसून राहिलों पूर्वेच्या बाजूनें हके काटवणांत शिरले अन् हांका सुरू झाल्या. रानाचा पसारा आटपशीर असल्यामुळ पहिल्या उठावणीलाच दातवालीं मोठालीं दोन तीन डुकरं अन् सात आठ मध्यमसर बाडगी बाहेर भडाडलीं, पण वाळसराच्या अंगाला न निघतां तीं पूर्व बाजूनं डोंगरबारीकडं निघालीं गड्यानी मोठ्या शर्थीनं त्याना मोडून वाघरीवर घालविल. एवढ्यांत काटवणाच्या कोंपऱ्याच्या तोंडाशीच असलेली चार पांच भेदरलेलीं कोल्हीं त्याच्यात मिसळलीं अन् तें सारं लटाबरच्या लटांबर वाघरींतून गुरफटून पडल ! लडनवर जर्मन विमानं घिरट्या घालूं लागलीं की, आसरा घेण्यासाठीं जशी पळापळ होई म्हणतात, हुबेहुब तशीच धांदल त्या वेळीं तिथं उडून गेली. ती अपूर्व गंमत पाहून बघ्या मंडळीत मोठाच हंशा पिकून राहिला. वाघरींत गुरफटलेला डुकराचा तो खाडवा टोंचून मारावयाचा कसा हाच आम्हाला आता प्रश्न पडला. तसं करणं म्हणजे खरोखरच त्या खेळाला कत्तलखान्याचं स्वरूप आलं असत. बंदुकीनं कानांत गोष्ट सागितल्याप्रमाण जीव गुपचूप निघून जातात, तस कांहीं भोंसकून बिनबोभाट काम झालं नसतं त्याना गोळ्या घालण्याशिवाय दुसरा उपायच राहिला नव्हता. मी तिथून जवळच असलेल्या ढमाच्या विहिरीवर निघून गेलों, अन् मग भवान्यानं त्या रानजनावरांना बदुकीच्या सहाय्यान वाघरींतून जीवन्मुक्त करून, नि नंतर वाघरा उलगडून त्या बिचाऱ्या कोल्ह्यांनाही त्यांची वाट मोकळी करून दिली.

दुसऱ्या दिवशीं जवळपासच्या कुणाही मळेकऱ्याचा मका लोळला नाही. भुईमूग, राताळीं उकरली गेलीं नाहींत, अन् पाण्याच्या डोबाही शाबूत

राहिलेल्या पाहून मळेकऱ्याना अन् माळकऱ्यांनाही हिंमेचं महत्त्व चांगलंच पटलंस दिसल.

## बक-वध ! ८

पनवेलीजवळच पळस्प

पचवीस वर्षांनीं आलों होतो आज पुन्हा मी इथं.

या आगोठीच्या दिवसात मजेन म्हणून इकड येऊन राह्यला माणसाला काही मोठासा उल्हास वाटत नाही पण त्याचा भारीच आग्रह पडला. अगदी खनपटीलाच बसले ते माझ्या म्हटल, आता फार ओढून धरण्यात काही स्वारस्य नाहीं. बरोबर घ्यायच्या सामानासुमानाची अन् कपडयालत्त्याची बांधाबाध करण्याच्या गडबडीत होतों मी इतक्यात आमची ती !–ती मला कसची विसंबते. मी कुठंही जायला निघालों तरी तिचं आपल माझ्या पुढंच पाऊल. आम्हीच प्रथम तिला खांद्यावर चढवून ठेवली, आता मागाहून

कुरकुरण्यात काय अर्थ! अखेर मारली तिला काखोटीला अन् बसलों त्यांच्याबरोबर जाऊन मी टांग्यांत.

   

अगोदरच श्रावणाचा महिना अन् त्यातून त्यांच्याकड मंगळागौरी, सत्यनारायण, कुलधर्म अन् सकल्पित शिलकी राहिलेल्या हव्यकव्यांची मारे एकच गर्दी उडून राहिली होती. दोहीं साज घृतकुल्या मधुकुल्या झोडीत सबंध आठवडा मी निखालस घरात बसून काढला जाणार कुठं ? बाहेर कुठं भटकून यावं म्हटलं तरी चिखलामुळं तेंही जमण्याजोग नव्हतं

नुकत्याच 'आशाळका' निघाल्या होत्या, अन् पावसाच्या चळकावर चळका अंतरिक्षांतून एकसारख्या खाली धुव्वाधार फटकारत होत्या. शेजारच्या बेड्यांतून मोठ्या अटकळीनं गळ्यातलं बिर्ड पाडून निसटून आलेला एक चिमकुला पाडा आपली चिमकुली शेपटी वर धरून पलीकड परसांत मोकार वाफडत सुटला होता, अन् घरांतले सगळे बाळगोपाळ त्याच्याभोंवती जमून त्याला पकडण्यासाठीं आरडत–ओरडत त्याच्यामागं धावत सुटले होते. ती गमत बघत, अन् एकीकडे ताज्या आपट्याच्या पानांची एक फर्मास विडी वळून तिचे झुरके मारीत पडवीतल्या बांकड्यावर मी बसलों होतों. इतक्यांत डोक्यावर इरलं घेतलेला, विशीच्या उमरीचा एक काळाकळकट्ट पण चुणचुणीत पोरगा पडवीचा उंबरठा ओलांडून आंत आला, अन् डोक्यावरलं इरलं बाहेर पाघोळीला निथळत ठेवून, 'कितीक होव्याती माला?' म्हणून कुणाला तरी विचारू लागला. त्या लगीनघाईत त्या बिचाऱ्याकडं लक्ष जाणार कुणाच ? बराच वेळ तो तिथ घुटमळत होता तितक्यांत पलीकडच्या खुंट्यांवर थोड्या वेळापूर्वीच मी तेलपाणी देऊन ठेविलेल्या बंदुकीकडं सहजा-सहजीं त्याची नजर गेली. अन् आशावल्या नजरेनं तिच्याकडं पहात तो

उभा राहिला होता. त्याच्या मनांत कांहीं तरी विचार घोळत असावेत. अन् त्याला कुणाला तरी–नव्हे मलाच–कांहीं तरी जिव्हाळ्याचं मनोगत सांगायचं आहे अथवा कांहीं तरी विचारायच आहे, असं दिसत होतं. पण निर्भीड-पणान तसं विचारायला त्याचा धडा होत नव्हता. आपल्या प्रश्नाचं उत्तर द्यायला कुणालाच बनत नाहीं असं पाहून त्यानं पाचचार आपट्याच्या पानांच्या माळा दारापासल्या खुंटीला ठेवल्या अन् इरलं उचलून घेऊन तो जायला निघाला. एवढ्यात पुन्हा जोराची चळक आल्यामुळं तो माघारा फिरला अन् वळचणीखाली अंग अगदी आकसून घेऊन पुन्हा थबकल्या-सारखा झाला. त्याच्या मुद्रेवर क्षणाक्षणाला वेगवेगळे भाव उमटत असलेले मला दिसले त्याची ती गोंधळलेली मुद्रा पाहून मला आता रहावेना मी त्याला आत हाक मारली. माझ्याकड चौकस नजरेनं एकवार त्यानं पाहिलं, अन् दाराची एक झडप जरा ढकलल्यासारखी करून तिथच दाराच्या आडकुशीला तो मुडी मारून बसला.

मीं त्याला त्याच नांव विचारलं.

'मल्ी सुडक्या म्हनतात ' तो—

'तूं इथ काय धदा करतोस ' ? मी पुन्हा त्याला प्रश्न केला.

'आपट्याच्या पानांच्या माला अन् फाटी इकून गुजरान करतुया. '

'तुला घरचं आणखी कोण कोण आहे ? '

'आइशी आन् भईन हाय योक धाकलो ' तो—

'राहतोस कुठ ?'

'कातवडी हाय मी, आन् शिरढोणवाटला म्हालसाई नाय का, तथन हाकेवरच घर हाय माझ.'

'तुला तीरकमठयानं निशाणबिशाण मारण्याचा सराव आहे वाटतं ?

खुंटीवरल्या बदुकीकडं मघा तूं लई ध्यान देऊन बघत होतास म्हणून विचारल.'

'नाय बा ! एक आवंडा गिळून तो म्हणाला. पन आज लया दिसापासन माझ्या नऱ्हडयामंधी मामलीचा सल बसलाया रुतून. खातुया, पितुया, कामधंदा करतुया, पन चित नाय लगत कशामंधी बी ! खुटाल्यावरली बदूक पघून मनामंधी चितीत व्हतो की आपनाम्नी योकादा बगला मिलाला तर कस ब्येस व्हईल. मालकांचा अब्या म्हनत व्हता, पुन्याकडल पाव्हन आल्याती त्येच्यापाशी हाय वंदुक, व्हय जी !'

'बगळा ! तो कशाला हवा तुला ?'

'या आगोठीच्या दिसात घाटावरली वैदं दरवरसा डुकरं माराया येताती हथ औंदा बी आली हायती ती वैदं त्येंच्यामधी योक मुरबान् म्हतारा वैद हाय लई चक्षू ! तो म्हगाला, योकादा बगला पैदा कर, अन् त्येची सागुती खा शिजवूनशान्, पार पानी पानी हून जाईल त्या सलाच, आन् नऱ्हड आक्षी डरनेजावानी म्वाकळ व्हईल

'या श्रावणाच्या महिन्यानमुद्धा तुम्ही लोक सागुती खाता तर ! ठीक, पण तुला बगळा कसला हवा ? ढवळा कीं करडा ?'

'कसला बी चलंल '

'देईन मी तुला बगळा मारून. पण थोडीशी उघडीप पडू दे, मग जाऊं एक दिवस आपण बरोबरच.'

'बेश. पावमाचा गण वाइमा मोडला की हायेच मीं हजीर धन्याच्या पायाशी' असं म्हणून जाण्यासाठी तो उठला. निघता निघतां त्यानं पुन्हां एकदां माझ्याकड वळून पाहिल कृतज्ञतेची भावना त्याच्या दोही डोळ्यात सामावेनाशी झाल्यामुळ ओसंडून बाहेर वहात असलेली मला दिसली

   

पावसान आज दोन–तीन दिवस चागली उघडीप दिली होती. दिशा स्वच्छ झाल्या होत्या, अन् चिखलही थोडासा हडकला होता. चहा घेऊन नुकताच मी बरोबर आणलेला केळकराचा 'साहित्यविहार' उलथापालथा करीत ओसरीवर बसलों होतो. ऊन्हहि आज छानदार पडलं होतं, अन् सायंकाळी कुठं तरी फेरफटका करून यावं असं पुस्तक चाळता चाळतांच मनाशी मी ठरवल होतं. विहाराचीं चारदोन पानंच मी जेमतेम वाचली असतील, तों मुडकोबाची स्वारी, चौकात पसरलेल्या कुत्र्याला चुचकारीत चुचकारीत हळूहळू माझ्या गेखानंच येत असलेली मला दिसली. त्याला पाहतांच पुस्तक मिटून मी जरासा पुढं झालो मला रामराम घालून, 'आज येताव रानात? परवाच्या धरन पावसाचा गण मोडल्यावानी झालाया, आन् न्हाडबी सुकलीया, तव्हा म्हटलं पुमावं धन्याला,' आशापूर्ण स्वरांत तो म्हणाला

तत्काल मी त्याला हो भरली जगलांत जाण्याची मलाही अगदी सुरसुरी आली होती 'ऊन्ह जरास उतरल्यावर ये तूं, मी तुझी वाट बघत बसतों.' अस सांगून मी त्याला निरोप दिला

   

बदूक पुसून, काडतुस कोणती हवीत नकोत त्यांची निवडानिवड करीत बसलो होतों मी. इतक्यांत सुडकोबा उंबऱ्यांत दत्त म्हणून हजर! कपडे चढवून आणि बंदूक खांद्यावर टाकून लगेच मी त्याच्याबरोबर बाहेर पडलों. सुडक्यानंहि आज अगदी अद्यावत् पेहेराव केला होता. किंतानाचा जाड चोळणा कसला होता त्यानं अंगांत मांजरपाटाच कोरं कुडतं, डोकीला लाल मुंडासं अन् कमरेला एक जुनपुराणं पटकूर. पण त्यांत खवलेली कोयती! त्याची ती कोयती बघून माझं मन गारीगार होऊन गेलं. सहज लीलेनं गर्दन

उतरून घेतां येईल, अशी उथाण वहाती होती ती कोयती ! त्या कोयतीपुढ माझी बंदूक मला कःपदार्थ वाटूं लागली. मी साश्चर्य सुडक्याला विचारलं, 'फांटी तोडायला इतकी जलाल पाजवलेली कोयती लागते कां रे ?'

'वलं झाड ढाळाया लई नामी, आन् काम बी बिगीन उराकतं जंगलांतला जलम धनी आमचा. आमच्या या डवांगराळ मुलुकामंधी आड्याल ही वाघरं लई मातल्याती वखटा वखुत ब्येतला तर आमा रानवटांपाशी हायेच काय दुजं साधान. आमीं कातवडी कोयत्या निसपत जीव की परान पाळतो, तसल्या पालायची गराज तुरुत हायेच कुनाला ? आमच्या गावढ्यांतल्या पांढरपेशाच्या घराघरांनीं कोयत्या हायेती, पर कांबड्याची मुंडी खुरडायाबी बळच करत्याल जनुं ! निऱ्हं ल्वाखाड !'

त्याला पुष्कळस बोलायला लावाव, अन् आपण नुसतंच ऐकत बसावं असं मला वाटल. नदीच्या रोखानं चाललों होतों आम्ही. 'जरा दुरूनच वळसा घेऊन जाऊं,' अस मी त्याला म्हटल

'तल्याकडं येताव ! तल्यावर बी गवासतील बगलं. म्होप हायती तथंबी' ! तो म्हणाला

'चल' म्हटलं मीं त्याला

गप्पागोष्टी करीत करीत आम्ही सरासरीं मैलभर आलों तों तळ्याची पाळ दिसूं लागली. पाळ चढून आम्ही दोघहि वर गेलो तों पलीकडल्या बाजूला कातकऱ्यांचीं कांहीं बायकापोरं कांही तरी उकरीत असलेलीं नजरेस पडलीं. 'काय करताहेत रे हीं माणसं तिथं' ? म्हणून मी सुडक्याला विचारलं.

'कचरा धुंडत्याती,' तो म्हणाला.

'या दिवसांत कचरा कुठच्या ? त्यांचा हंगाम तर अजून पुढच आहे.'

'उजू हाय तुमच म्हननं, पर या सरावनाच्या महिन्यात गावच्या वान्याबामनांच्या ल्येकीबाळी म्हायेरपनाला अक्षी हटकून जमा व्हत्याती,

अन् सय करकरूनशान् आमच्या कातवडयाच्या बायामानसांपाशी कचरा मांगत्यात ! ग्वाडाध्वाडाच्या लालचीन आमची बायामानसं बसतात हतं येऊन चिखुल रवंदाळीत कवल्याकाच्या कसल्या का व्हत ना ! मापटंभर कचरा निऊनशान् दिल्या की मग पुसू नका. अक्षी चंगाळी. गावनन् पातोल्या आन् नारलीभात आऽन् इसारलों की इकत्यात ! हां ऽ ! खांडव्या ! नाय नाय त्ये शेलक जिन्नास वाढित्यात आनून आयशीसंग भांडभांडूं ! !'

त्याच्या त्या लाघवपूर्ण खुलास बोलण्याची मला मोठी मौज वाटली. पाळीवरल्या पाऊल वाटेनंच आम्ही दोघंहि त्या बाया कचरा खादून काढीत होत्या तिथवर गेलों. अन् समोरच पाचचार बगळे—कुणी एकाद्या परमहंस यतीप्रमाण बकध्यान लावून उभे होते, तर कुणी भूतदयेनं प्रेरित होत्साते अगदी जपून पावल टाकीत पाण्याच्या कडेकडेन हिंडत होते—त्यांतल्या एकावर मी चार नंबरचे छर्रे टाकले. सुडक्यान धांवतच जाऊन, हिरव्याचार लव्हाळ्यावर पखाड फडफडावीत पडलेला तो शुभ्रधवल बगळा आणला अन् घरीं पोहोंचविण्याकरितां त्या बायांपैकी एकीच्या हवालीं केला त्या बायानीं काढिलेल्या कचरा सुकण्याकरितां तिथंच गवतावर पसरून टाकल्या होत्या त्यांतल्या ओंजळभर त्यानं मला दिल्या अन् मूठभर आपल्या कुडत्याच्या खिशांत कोंबल्या

'आता घराकडंच चलायचं ना ? घालवाया येनो मी तुमांसंग घरापावतं,' तो म्हणाला

'चल की हिंडायला जाऊ. एवढ्यांत घरीं जाऊन तरी काय करायचं आहे ?'

'बरा तर, मीबी जराशी आपट्याची पानां घेतो खुडून आन् वाइच फांटीबी पघतों गवासली तर.'

फुकटांन मिळालेल्या त्या ताज्या कचरा खात खात आम्हीं जगलाची वाट धरली वाटेन आमच्या सटरफटर गप्पा सुरूच होत्या. थोड्याच वेळात आम्ही जंगलापाशीं येऊन पोहोचलों पालापाचोळा तुडवीत घुमत घुमत आम्हीं आणखी थोडेसे पुढे आलों, तों एके जागी आपट्याच्या झाडाचा एक ताटवाच्या ताटवा आमच्या नजरेस पडला तेव्हा मी सुडक्याला म्हटलं, 'मी बसतों आतां इथंच या कानळावर, तूं घे तुला काय हवीत ती पानं खुडून.'

झराझर निवडक पान खुडून तो धोतराच्या ओट्यात भरू लागला. बंदूक खाली आडवी ठेवून स्वस्थ मनान मी जंगलची मोकळी हवा खात क्षणभर बसलों होतो. माझ्याजवळच्या कचरा आतां खलास झाल्या होत्या, अन् सुडक्याही जुनवान् पानं खुडीत खुडीत बराच पुढ सरला होता म्हणून त्याच्याकडं जावयासाठी मी निघालो त्याच्या अगदी नजीक येऊन पोंहोचलो होतो मी, तों वाघाट्याच्या झुडपांच्या एका दाट जाळीच्या तोंडाशी असलेल्या आपट्याच्या झाडाची पानं खुडीत उभा असलेला तो मला दिसला आतां तिथच कुठ तरी बैठक मारावी असं मला वाटलं, म्हणून मी एकादा टोळा जवळपास दृष्टीस पडतो कीं काय म्हणून इकड तिकडं हुडकूं लागलों इतक्यात पानं खुडतां खुडतां एकाएकींच सुडक्या मोठ्यानं शंखध्वनि करीत झपाट्यानं मागं फिरला, अन् त्याच्या पाठोपाठच एक चित्ता त्वेषानं धांवत येऊन त्यान आपल्या पंजाचा एक जोरदार फटकरा सुडक्याच्या डाव्या फऱ्यावर मारला. त्या जोराच्या आघाताबरोबर प्रथम सुडक्या थोडासा कोलमडल्यासारखा झाला अन् त्यान आपले दोन्ही हात खालीं जमिनीवर टेकले. सुडक्याला धीर देण्याकरितां मी मोठ्यानं इषारा केल्या-मुळ त्या वाघराच लक्ष मजकडं गेलं होतं, तेवढी संधि मिळतांच तो चपळ पोरगा सांवरून उभा राहिला. अन् डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोंच,

कमरेची कोयती उपसून त्यानं त्या वाघराच्या मस्तकावर एक जोराचा प्रहार केला आतां तो खवळलेला चित्ता पुन्हा त्याजवर मोहरा करून धांवला, त्याबरोबर पवित्राभर मागं सरून अन् त्याला जरा अगावर घेऊन त्यानं त्याच्या जबडयावर पुन्हा एक वार केला तो चित्ता आता बराच जरबल्या-सारखा झाला होता पण निघून न जातां जागच्याजागींच शेंपटीची वळवळ करीत रोखून राहिला होता तेवढ्यांत मी झटकन् माझी बदूक भरली, अन् त्यावर आता आवाज टाकणार, इतक्यात त्या खुनशी जनावरान चवताळून पुन्हा सुडक्यावर झेप घेतली सुडक्या आतां हुषारीन आपल्या ठिकाणीं उभा होता झेप घेऊन उच उठल्याबरोबर वर बघून त्यान कोयतीन एकवार त्याच्या कंठनाळावर शिस्त धरल्यासारखी केली, अन् त्या वाघरावर एकच उभा वार करून त्यान त्याच कठ–काळीज एक करून टाकल !

त्या कोंवळ्या पोराचा तो अद्भुत पराक्रम पाहून मी तर थक्क होऊन गेलों, अन् पराकाष्ठेच्या हर्षभरानं अन् कौतुकान मीं त्याची पाठ त्रिवार त्रिवार थोपटली. त्याच्या मांडीतून अद्याप सारखा रक्तस्राव होत होता त्याच्या कमरेच पटकूर सोडून मी त्याची ती जखम नीटनेटकी बाधली बाकीच्याही किरकोळ–सारकोळ जखमा, ओरखडे पुसून त्यावर शाडूची फक्की बसविली अन् किंचित्काल विश्रांति घेऊन आम्ही गांवाकडं निघालों

घरीं आल्यावर मी मुद्दाम त्याच्याकरिता चहा करवून त्याला पाजला. त्याची वृत्ति आतां उल्हसित झाल्यासारखी झाली होती.

बाहेर काळोख मिट्ट पडला होता कंदील पेटवून अन् एका गड्याला सोबतीला घेऊन मी त्याच्या वसतीवर त्याला पोहोचविण्याकरितां गेलों होतो. बगल्याची सागुती शिजवून त्याची आयशी त्याचीच वाट बघत दारांत बसली होती

जंगलांत घडलेली सायंत हकीकत मी त्याच्या आईला अन् तिथ गोळा

झालेल्या माणसांना सागितली. त्याबरोबर तोंडानं कायस पुटपुटत त्याच्या आयशीनं आपल्या एकुलत्या एका लेकावरनं आपले दोन्ही हात उतरून टाकले, अन् नंतर हातांच्या मुठी वळून अन् जमिनीवर टेकून तिन त्या काड्काड् कडकावल्यासारख्या मोडल्या!

थोडया वेळापूर्वीच तळ्यावर मी त्या बिचाऱ्या निरुपद्रवी पांखराचा–बकाचा प्राण घेतला, पण कातवडयाच्या त्या अतुल धैर्यशाली भीमसेनानं, त्याचाच चट्टामट्टा करावयास आलेल्या खऱ्याखुऱ्या बकासुराचा आज मोठ्या शौर्यानं वध केला होता!

## बालवीर

## १

वाडग्यांतून काढून आणलेलं शेरडांचं ताजं दूध त्यानं कटोऱ्यांत ओतलं. पुतळीन–त्याच्या आईन–त्याच्याचसाठीं टाकलेल्या नागलीच्या दोन ताज्या भाकरी त्यान त्यांत कुसकरल्या, अन् न्याहारी झाल्यावर आपला छोटेखानी कमठा अन् तीर ठेवण्यासाठीं बनविलेला कनूवासाचा भाता डाव्या खांद्यांत अडकवून व आईनं दुपारच्याकरतां फडक्यांत बांधून दिलेली शिदोरी अन् 'फरसा' हाती घेऊन स्वारी तडक घरामागल्या वाडग्याकडं वळली. वाडग्याचा झांप उघडून आपलं लाडकं पाडस अन् शेरडं बाहेर काढून, आपापल्या आयांबरोबर बाहेर पडलेलीं सारीं तान्हीं कोंकरं–करडं त्यानं भराभर आंत फेकली. झांप लावून घेतला, अन् हर्रर्र हर्रर्र, करीत रोजच्या-प्रमाणं तो रानाकडं निघाला. खुरट्या झुडपांनीं अन् काटवणानं वेष्टिलेली ती

नेहमींची हिरवी पोपटी टेकडी दिसू लागली. नागमोडी वळणं घेत घेत जगलाच्या अडचणीतून मैदानात बाहेर पडल्यावर निर्झराप्रमाण झुळूझुळू वाहूं लागलेल्या 'पिनाक' नाल्यापाशीं येतांच त्याची जित्राबं अन् तो स्वत. धारेचं खळखळ वाहणार पाणी पिऊन थडगार झाले, अन् नंतर शेरडं माळावर चरणीस लावून तो त्या टेकडीच्याच उतरणीवर असलेल्या खिळ्याच्या एका उंचशा टोळ्यावर क्षणभर निवातपणानं बसून राहिला

   

दिवस कलूं लागला होता त्याची जित्राबही आतां यथेच्छ जोगावली होतीं, अन् आळपणी घातलेल्या त्या शेरडांची स्तनं अन् कासा दुधानं गच्च फुगून गेल्यामुळ एखाद्या बॅग्‌पाइपप्रमाणं शोभिवत दिसत होत्या कुणी रवंथ करीत उभ्या होत्या, कुणी कुसत्रा फुटावयाला झाल्या होत्या तरी हावरेपणानं उच झुडपांवर पुढले दोन्ही पाय ठेवून त्याचे कोंवळे शेंडे–बुमारे खुडावयास बघत होत्या, अन् त्याच प्यार पाडस स्वच्छदपणानं मन मानेल तिकडं इतस्तत. चरत फिरत, विहरत होतं पांढरीची एक सुरेखशी बांकदार फोंकाटी तोडून ती साळीत आपल्याच नादात तो बालक रंगून गेला होता. इतक्यात त्याचं गोजिरवाण पाडस वाऱ्याप्रमाणं वाफडत ठिसकत ठिसकत त्याच्या अगदीं सन्निध येऊन उभं राहिलं. तें कमालीचं भेदरलेलं दिसत होतं, अन् कान टवकारून कावऱ्याबावऱ्या नजरेनं वरचेवर तें नाल्याच्या दिशेला रोखून पहात होतं तें चिमुकल पाडस आपली चिमुकली शेंपटी वारीत पुनः-पुन्हा ठिसके, मधेच दचकल्याप्रमाणं होऊन जागच्या जागी उडया घेई अन् आपल्या चिमुकल्या धन्याकडं कसल्या तरी विशिष्ट भावान बघूं लागे इतका वेळ सुसमाळपणानं चरत–फिरत असलेलं आपलं पाडस एकाएकीच वाफडत आलं, याला काहीं तरी कारण असलंच पाहिजे असं तें बालमन सुद्धां

नि मदिग्धपणानं तरकून गेलं. ते कशाला तरी भ्यालं–बुजलं असावं, अथवा एकादं कुत्रबित्र त्याच्यामागं लागलं असावं असं त्याला वाटलं; तत्काल हातातली फोंकाटी त्यानं बसलेल्या टोळ्याला उभी करून ठेवली, अन् बारीक नजरेनं तो सभोंवार न्याहाळू लागला. त्याला कुठं काहीही विपरीत असं दिसून आलं नाहीं इतक्यात त्याची शेरडंही एकाएकींच बुजल्यासारखी झालीं अन् बें ऽऽ बें ऽऽ करीत खिळ्याकडं उधळलीं 'काहीं तरी अकीत असलंच पाहिजे', असं आता मात्र त्याला वाटलं. सारी शेरडं त्यानं एका जागी गोळा केली, अन् क्षणभर त्या उंच टोळ्यावर टाचा उचावून उभं राहून त्यानं चौफेर टेहेळणी केली. किंचित् काल विचारांत पडल्यासारखा तो जागच्याजागींच निश्चल उभा होता. इतक्यात त्याला काय वाटलं कुणास ठाऊक ? रोजचा वखत झाला नव्हता तरी शेरडं पुढं घालून तो घराकडं जाण्यास निघाला रोज सगळ्याच्या अगदी आघाडीला अकडीनं चालणारं त्याचं पाडस आज मागं मागंच रेंगाळत होतं आडणात ओथंबलेल्या कासा दाटूं लागल्यामुळंच कीं काय, त्याची जित्राबं मंद गतीनं चाललीं होतीं जेमतेम नाल्याच्या कडेला तो येऊन पोहोंचला होता रोजच्याप्रमाणं पाणी पिण्याकरिता अहमहमिकेनं धारेकडं धावणारीं त्याचीं शेरडं आज काहीं पाण्यावर जाऊन पडली नाहीत. उलट बळकशी आल्याप्रमाणं त्याचीं जित्राबं कांहीं केल्या नाल्यांत शिरेनातच 'नाला ओलांडल्याशिवाय घरीं जायचंच कसं' ? तो एकाकीं असहाय्य जीव पुन्हा मोठ्या विचारात पडला. मदतीच्या आशेनं त्याची शोधक दृष्टी एकवार सभोंवार फिरली, अन् आपल्या मदतीस यावयाला जवळपास चिटूपाखरूंही नाही अशी खात्री होताच, नाल्यापलीकडं जाऊन काय प्रकार आहे, अन् आपली जित्राबं एकाएकींच इतकीं हलबललीं का, याचा तलास लावण्याच्या इरादानं त्यानं तिकडं मोर्चा फिरवला.

नाल्याच्या रोखानं पांचचार कदमही तो पुरता गेला नसेल समोरच्या

गर्द छायेत डोळ्यांपुढं एकदम कांहीं तरी चमकल्याचा त्याला भास झाला म्हणून तो तिकडं जरा न्याहाळून पहात उभा राहिला. एवढ्यांत त्या नाल्याच्या पलीकडल्या तीरावर कळकांच्या दाट बेटाआडून पटाईत वाघाचं एक प्रचंड धूड आस्ते आस्ते एकेक पवित्रा पुढें टाकीत आपल्याच रोखानं येत असलेलं त्याच्या नजरेस पडलं. तत्क्षणीं त्यानं आपला चिमुकला कमठा सज्ज केला, अन् एकामागं एक, तीन-चार तीर त्या श्वापदावर शिस्त धरून त्यानं वेगानं सोडले. त्याच्या त्या इवल्याशा छातीत केवढं तरी विशाल काळीज होतं ! त्याच्या त्या छोटेखानी तीरानीं त्या बुभुक्षित प्रचंड वाघाचं काय वांकडं होणार ? अर्थात् किरकोळ जखमा होण्यापलीकड त्याला कांही-सुद्धां इजा पोहोंचू शकली नाहीं, अन् त्याच्या हातांतल्या हत्याराची किमपीहि तम्मा न बाळगतां बेगुमानपणानं तो सरळ पुढं त्या पोरावर चालून आला. आपणावर ओढवलेल्या आणीबाणीच्या प्रसंगाची तीव्र जाणीव त्या इवल्याशा अंतःकरणाला हा हां म्हणतां झाली, त्याबरोबर त्या बेडर बालवीरान बिलकुल न डगमगतां सारीं शेरडं खिळयाच्या बाजूला हाकून दिली, अन् हातातला फरसा परजीत त्या कृतांत काळाशी सामना देण्यासाठीं तो उजवा पाय पुढ टाकून पवित्र्यांत उभा राहिला !

अद्‌भुत ! असामान्य ! ! लोकोत्तर ! ! !

त्याला काय नांव द्यावं तेंच आम्हांला समजत नाही. असला प्रसंग अन् असलं दृश्य केवळ कादंबरीतच शोभेल; पण या घटकेला पिनाकनाल्याच्या तीरावरल्या निर्मनुष्य जंगलांत तें प्रत्यक्ष घडून येत होतं. त्या पोराचा तो आवेश पाहून, एवढा बलाढ्य जंगली प्राणी, पण तोहि क्षणभर रोखल्या-सारखा झाला. 'प्रभूची लीला अगाध आहे' म्हणतात, त्याचच हें प्रत्यंतर असं एवढ्या प्रसंगापुरतं तरी आपण मानून चालू या !

   

आज शिकारीसाठीं झुजूमुंजूच बाहेर पडलेला त्याचा बाप रकाळ्या नेमका याच निर्वाणीच्या क्षणाला–जवळच्या आडव्या वाटेनं–तिथं येऊन पोहोंचला, अन् त्याच्या दृष्टीस तें भयंकर दिव्य दिसतांच त्याचं अंग आपादमस्तक शहारल्यासारखं झालं. तत्काल खांद्यावरलं चितळ त्यानं खालीं झुगारून दिलं, खांद्यांतला कमठा उतरला, अन् विद्युद्वेगानं प्रत्यंचा चढवून त्यानं दोन आटे तंगच दिलेल्या आपल्या कमठ्याला तीर जोडला. सूऽ सूंऽ करीत दोन तीर त्या विक्राळ श्वापदाच्या काळजांत घुसले, अन् त्यामुळ घायाळ होऊन तो जमिनीवर आडवा झाला. पडल्या पडल्या त्वेषानं त्या श्वापदानं आपलंच अग दोन तीन जागीं कडकडा फोडलं ! आणखी एक तीर त्यानं द्रुतगतीनं त्या आडव्या पडलेल्या वाघाच्या पोटाचा नेम धरून सोडला गिधाडाचीं पिसं लावलेला तो जलाल तीर वीतभर त्या वाघाच्या पोटात जाऊन रुतला, अन् त्याबरोबर तो वाघ जागच्या जागीं ठार झाला. हा सगळा प्रकार इतका अचानक घडून आला कीं, काय झाल, कसं झालं, हे त्या छोटेखानी वीरास समजूनसुद्धां आलं नाही. तो स्तंभित झाल्याप्रमाणं जागच्याजागींच उभा होता. त्याचीं शेरडं दूरवर पांगून गेलीं होती. थोडया वेळानं तो भानावर आला, अन् त्यानं मान वळवून सभोंवार पाहिल तो, 'काल्या, काल्या' असा टाहो फोडीत आपला बाप आपल्याकडंच येत आहे असं त्याला दिसल. निमिषार्धात रंकाळ्या पोरास येऊन बिलगला अन् त्यानं त्याला हृदयाशी घट्ट कवटाळून धरल. आपल्या पिटुकल्या पराक्रमी पुत्राच तें अद्भुत कर्म पाहून त्या पुत्रवत्सल पित्याला किती तरी धन्य धन्य वाटलं असेल !

क्षणभर पितापुत्रांची ती जोडी अखिल जगाला विसरल्यासारखी आपल्याच तंद्रीत त्या मरून पडलेल्या वाघाच्या पुढ्यांत बसून राहिली होती. दिवस बुडायचा सुमार झाला होता. भोंवताली किर्र्र् जंगल पसरलेलं होतं, अन्

तशात रात्रही अधारी होती भावनेचा पहिला आवेग ओसरल्यावर त्या बापलेकांनीं इतस्तत· पांगलेलीं आपलीं सारीं शेरड एका जागीं गोळा करून आणली तितक्यात त्या बालवीराचं प्यारं पाडसही लडिवाळपणान आपली तोकडी शेंपटी हालवीत हालवीत कुद्दनस येऊन आपल्या धन्याच्या अंगाला आपल अंग घाशीत उभ राहिल सारा दिवस आद्बून आद्बून पैदा केलेल तें चितळ पुन्हां खाद्यावर टाकून अन् पोराला अन् शेरडाना पुढं घालून रंकाळ्या आता हर्षभरानं घराची वाट चालू लागला होता

   

मी ( बॅ. रॉय ) अन् माझे एक शिकारी स्नेही बाबू हरदयाळ लाहिरी, अ. कॉझर्व्हेटर ऑफ फॉरेस्ट्स्–असे दोघे आज वाघाच्या शिकारीसाठी इथ येऊन दाखल झालों होतों 'बीरभूम' जिल्ह्यातल्या 'चदन' नदीच्या उजव्या तीरावर वसलेल्या 'जीतमोला' नावाच्या खेडयांत—गांवापासून जरा दूरच —आमचा कॅम्प पडला होता नदीच्या दोन्ही तीरांवर, पूर्वेला 'गिधमारू' टेकडया अन् पश्चिमेला 'गुटगुटिया' टेकडयांच्या विस्तीर्ण रांगांपर्यंत घनदाट जगल पसरलेल होतं. *

या जगलांत वाघेल्या भिल्ल लोकांची वस्ती सर्वत्र असून, अष्टभुजादेवीचे ते लोक मोठे उपासक आहेत. फांटीं तोडून विकण, डिंक, मध, विडयांचीं पानं, काथ तयार करण्यासाठीं खैर आदिकरून जगली झाडाची साल मक्तेदारांना पुरविणं, अन् शिकार हेच त्यांचे मुख्यत्वेंकरून उपजीविकेचे धदे.

* कुणा शिकाऱ्यास या जगलासबधी विशेष माहिती हवी असल्यास विल्यम् फ्रँकलिन् कृत "The Site of Ancient Palibothra Part II" हा ग्रथ पहावा

परठिकाणचे आलेले उपरे शिकारी रान उठविण्याकरितां मजुरीनं बोलावीत तेव्हांच काय ते ते लोक जात इतर कोणत्याही प्रकारची मोलमजुरी अथवा शेती ते करीत नसत तीरकमठे अन् 'फरसा' एवढीच त्याचीं आत्मसरक्षणाची अन् शिकारीची साधन क्वचित् जुन्या जमान्यांतल्या तोडयाच्या बंदुकाही काहीं लोक वापरीत. या जगलातली श्वापदं—पटाईत वाघ-दिसावयाला फार तजेलदार—सुंदर असून लाबलचक असतात

आमच्या कॅम्पाची लागालाग झाल्यावर, दुसऱ्या दिवशी आम्ही आमच्यासाठीं तथले माहीतगार भिल्ल, रानकाटे, वगैरे शिकारी लोक बोलावून घेतले त्या लोकाबरोबर शिकारीसबंधी वाटाघाटी करीत असता त्या भागात नुकतीच प्रत्यक्ष घडलेली व कथानकाच्या सुरुवातीसच उद्धृत केलेली एक अद्‌भुतरम्य नवलकथा आमच्या कानांवर पडली. तिच्या सत्यासत्यतेची खात्री करून घेतल्यावर, घडलेल्या त्या रोमाचकारी प्रसगातला नायक—केवळ चौदा-पधरा वर्षे वयाचा तो बालवीर—समक्ष डोळ्यांनी एकवार बघावा अशी आम्हास अगदीं अतर्यामापासून इच्छा झाली, अन् आमचा शिकारीचा नियोजित कार्यक्रम दोन दिवस पुढ ढकलून आम्ही अगोदर त्या बालवीरास पाहण्याकरिता जाण्याच ठरविल.

त्या बालमूर्तीसाठीं, तालुक्याच्या गावी मुद्दाम मनुष्य पाठवून आम्हीं तिकडच्या पद्धतीची एक रूदार बाराबदी, एक छोटेखानी मदील अन् ऐनाचा दाडा बसलेली एक सुदरशी पोलादी 'फरशी' असं साहित्य आणवून ठेवल, अन् दुसऱ्या दिवशी तीन प्रहराच्या सुमारास दोघां पोक्तशा भिल्ल गड्यास सोबतीला घेऊन अन् आमच्या फराळाच्या डब्यांतल्या खुसखुशीत पदार्थांचा एक पुडा बांधून, चार साडेचार मैलावर असलेल्या त्याच्या वस्तीवर जाण्यासाठी आम्ही निघालों

आमचे वाटाडे पानपाचोळा तुडवीत अन् घळया—ओघळी ओलांडीत

सरासर पुढं चालले होते अन् आम्हीही निःशंकपणानं त्यांची सांथ करीत होतों. दोन अडीच मैल गेल्यावर भरजंगलांत पाऊलवाटेच्या कडेलाच आम्हांला एक भलंमोठं पुरातन काळचं देवीचं पडकं देऊळ आढळलं. त्या देवळापुढं प्रशस्त असं आवार होतं. आवारांत जिकडं तिकड नारळाच्या करवंट्या, बकऱ्या–बोकडांचीं शिगं अन् खूर अन् हाडकं इतस्तत. विखुरलेलीं होती मंगळवार अन् त्यातच आंवस पडली होती आज. भगतलोकांचा मोठा मेळावा जमला होता आज तिथं. उलट्या परापिसाचे पाय बाधलेले कितीक तरी कोंबडे सुरीची वाट बघत डोळे मिटून पलीकडल्या चबुतऱ्यावर ध्यानस्थ पहुडले होते. देवीपुढल्या एका ओबडधोबड दगडी कटोऱ्यांत आगरू अन् धूप धुपून राहिला होता. नारळ अन् कागदी लिंबांचा जणूं बाजारच भरला होता त्या आवारांत. एका भगताच्या हातांत पोत जळत होता, अन् कपाळभर पिंजर माखलेला देवीचा एक आग्या वेताळ दूत मोठमोठ्यानं घुमत स्वत.च्याच रंगीबेरगी चिंध्या गुंडाळलेल्या शरीरावर हातांतल्या लठ्ठ शेंदरी आसुडाचे फटक्यावर फटके उडवीत होता! आवारांतल्या पांचचार झाडांना पांचचार भुतांखविसानीं झपाटलेले द्विपाद प्राणी बांधून ठेविलेले होते. त्या दूताच्या हातातल्या आसूडाचे आघात होऊ लागले की, त्या जखडलेल्या बंदिस्त प्राण्यांच्या अंगांत सचारलेलीं भुतंखेत दात खाऊन थडथडा उडत, अन् कुणी मोठमोठ्यान किंचाळायलाही लागत! कित्येक गयावया करूं लागत, अन् कांहीं कांहीं तर आजवर धरलेल्या ‘झाडांना’ कायमची मोडचिठ्ठी देऊन पोबारा करीत!

क्षणभर उभं राहून आम्ही देवीचं तें लीलालालित्य पाहिल, अन् त्या जागत्या दैवताला दुरूनच नमस्कार करून आम्ही पुनरपि आपल्या वाटेला लागलों.

शिरवळ पडावयाच्या सुमाराला आम्ही रंकाळ्याच्या झोपडीपाशी येऊन पोहोंचलों. त्याची वृद्ध मावळण ( आत्या ) बायजी कसली तरी पालेभाजी निशीत दारांतच बसली होती आम्हाला पहातांच तिनं घरांतून एक रकटं आणून जमिनीवर अंथरलं, अन् आम्ही दोघेही त्या रकट्यावर वीरासन घालून त्या म्हातारीबरोबर बातचीत करीत बसलों. क्षणाभरानं फांटी वोपण्याकरितां ( विकण्याकरितां ) झुजुरकाच शेजारच्या खेड्याला गेलेली रंकाळ्या अन् पुतळीही तेवढ्यात तिथं येऊन हजर झाली; आम्हां परक्या शहरी माणसांना पाहून प्रथम ती दोघंही जरा चपापल्यासारखी झालीं, पण आमच्याबरोबरच्या गड्यांनी अन् बायजीनं आमच्या आगमनाचा हेतु सागितल्यावर त्यांच्या मुद्रा एकदम सुप्रसन्न दिसूं लागल्या. मोळ्यांच्या बदल्यात मिळालेली नागली—बाजरी त्या नवरा-बायकोनीं टोपल्यांतून ओतून ठेवली, अन् नतर ती दोघही मोकळेपणान आमच्यांत येऊन मिसळली आम्ही त्योच्या लाडक्या पराक्रमी पुत्राची पूसतपास करतां, तो अद्यापि रानांतून आला नाही असं कळलं. त्या बालवीराच नांव विचारतां, 'कालीया' ऊर्फ 'कर्दुन्या' अस त्यांनी सांगितल. आम्ही त्या दिवशीं जंगलांत घडलेल्या त्या विशिष्ट प्रसंगाचा वृत्तात त्यांच्या मुखानं पुनश्च ऐकून घेतला. तरीही आमच्या कर्णेंद्रियाची तृप्ति म्हणून होईना. त्या रोमांचकारी प्रसंगापेक्षांही आपल्या पुत्राचं कोडकौतुक करायला आलेल्या आमचंच त्या भाबड्या मातापित्यांना अधिक कौतुक अन् नवल वाटलसं दिसलं. क्षणभरानं कालीया आपलीं शेरडं अन् पाडस घेऊन येत असल्याची चाहूल रंकाळ्याला लागली, अन् त्यानं आम्हास 'पोरगा आला' म्हणून सूचना दिली.

स्वारी टेलत टेलत अन् तोडानं काहीतरी गुणगुणत येत असलेली आम्हांला दिसली. घराच्या मागल्या बाजूला असलेल्या वाडग्यात त्यानं आपलीं शेरडं नेऊन कोंडलीं. त्याचं प्यारं पाडस त्याच्या मागंमागंच

घोंटाळत होतं रंकाळ्यानं त्याला हाक मारताच, तो शेरड पिळण्यासाठीं हातात घेतलेला लोटा तिथंच कुडापाशी ठेवून आम्हांपाशी आला, अन् कमरेवर एक हात ऐटीत ठेवून, घोडं मागला एक पाय मुडपून जस ईजूमधे उभ राहत, त्याप्रमाणं आम्हाकडं साश्चर्य बघत तो उभा राहिला.

ती तेजस्वी बालमूर्ति अन् तिचा तो प्रेक्षणीय आविर्भाव पाहूनच आम्हाला इथवर आल्याच सार्थक झालस वाटलं त्याला आम्ही आमच्या-जवळ बोलावल पण तें विनयशील अन् सकोचवृत्तीच पोर कांहीं केल्या आम्हापाशी येईना. शेवटी मी त्याचा हात पकडून त्याला माझ्याजवळ बसवल. त्याचा चिमुकला कमटा अन् 'फरसा' एकवार पाहून घेतला. त्याला त्या दिवशीच्या अद्भुत अन रोमहर्षक प्रसगाबद्दल अनेक तऱ्हांनीं विचारल, पण रानवट म्हटल्या गेलेल्या त्या भिल्लाच्या पोरानं स्वतःच्या बढाईचा अथवा फुशारकीचा एक शब्दही, शहरातल्या लाफेबाज मुलाप्रमाणं स्वतःच्या तोंडावाटं काढला नाही!

डोकीला मंदिल अन् हाती नवा कोरा फरसा घेतलेला तो बालवीर! केव्हांच आम्हाला त्याचा विसर पडण शक्य नाहीं

ते धनुष्याकार चढेल डोळे, अन् शिकेकाईच्या बियांप्रमाण लुकलुकणारीं तीं काळीकुळकुळीत बुबुळ!

कालत्रयींही ती अभिमन्यूप्रमाण पराक्रमी बालमूर्ति आमच्या नजरेपुढून हलणार नाहीं!!

---

* क. बॅ. प्रद्योतकुमार रॉय याच्या शिकारी रोजनिशीतील टिपणांवरून

# हाला अन् सुलेमान ! १०

केवळ हवा बदलण्यासाठीं म्हणून मी बडनेऱ्याला माझ्या एका मित्राकडे जाऊन राहिलों होतो पंधरा–तीन वारांतच तिथ मला पुष्कळ बरं वाटलं. माझी बंदूक मजबरोबर होतीच. मग माझ्या शिकारीच्या छंदाचा पुकारा होण्यास वेळ तो कितीसा लागणार ? कर्णोपकर्णी तहशीलदारसाहेबांकडं आलेल्या पुणेंकर शिकारी पाहुण्याची आवई आसपासच्या टापूंत पसरली, अन् पाहुण्याभोंवतीं नित्य नव्या नव्या लाफेबाज वऱ्हाडपांड्यांची गर्दी गोळा होऊं लागली. शिकारीसंबधीं वीररसप्रधान, लंब्या लंब्या लाफा मारण्याची जणू त्या जमणाऱ्या मडळीत स्पर्धाच लागून राहिल्यासारखी दिसली. फारसं न बोलतां श्रवणाचच धोरण मीं ठेवलं होत अन् तें माझ्या पथ्यावरच पडलं.

'खानसाहेब' नावाचे एक बडे धाडशी शिकारी या गांवांत आहेत अस

पुष्कळांच्या तोंडून ऐकलं महबूब नावाचा खानसाहेबांचा एक सगा या मंडळींत येत असे. त्यानं तर खानसाहेबांच्या अचाट पराक्रमाच्या कित्येक अद्भुत गोष्टी मला सुनावल्या. अन् एकदा 'ते कवडे मारण्यास बाहेर पडले असतां, त्यांच्यावर अवचित एक बिबट्या वाघ चवताळून आला, तेव्हां खानसाहेबानीं खऱ्या शिकाऱ्याच्या ब्रीदास अनुसरून त्याला गोळी न घालतां त्याची शेपूट धरून अन् एखाद्या बिल्लीप्रमाणे त्याला गरगरा फिरवून मैल–अर्ध मैलावर भिरकावून दिला,' म्हणून सांगितलं! बरोबरच आहे. कवड्यांच्या शिकारीला गेलं की कवडेच मारावयाचे त्या वेळेला अवचुकून चुकारीचा वाघ उठला, म्हणून त्याला मारायचं हा कोठला न्याय? अल्लाचा अस्सल अनुयायी असलं फटलंडीचं काम कधी करीत नसतो!

खानसाहेबांच्या शिकारीच्या रोमांचकारी हकीकती ऐकून मी तर चाट होऊन गेलों. 'या अल्ला परवर दिगार!' मी अस्फुट स्वरांत उद्गारलों. खानसाहेबाची ती भीमभीषण आकृति (मी कधीं त्यांना या डोळां देखिलं नव्हतं तरी) माझ्या पुढ्यात असल्याप्रमाणं मला दिसूं लागली, अन् भीतीनं माझ्या मानेचा कळस पडण्याच्या बेतांत आला!

   

घटकामागून घटका, अन् दिवसांमागून दिवस अगदी आंधळ्यांच्या माळकेप्रमाणं दोरीसूत चालले होते. माझी दोस्त मंडळी 'आम्हांस एकदां शिकारीची गमत दाखवा' म्हणून माझ्यामागं लागली होती. अन् मीहि त्यांचं तें खुळचटपणाचं म्हणणं हंसण्यावारी नेत दिवस ढकलीत होतों. असाच आणखी एक आठवडा लोटला. आता माझे दोस्त अगदीं एकेरीवर आले, अन् एक दिवस त्यानीं मला शिकारीस चलण्याचा अगदीं निकराचा

तगादा लावला. त्यांची समजूत काढण मला आतां प्राप्तच होतं. नित्याप्रमाणं मडळी जमल्यावर ह्रा विषय निघालाच तेव्हां मी त्यांस म्हणालों–' शिकार म्हणजे काय चार उलट्यासुलट्या कोलांट्या मारणाऱ्या डोंबाऱ्याचा खेळ आहे, म्हणून मी तो तुम्हांला ठराविक वेळी, ठराविक ठिकाणी हुकमी वठवून दाखवूं ? '

माझं खुल्लम् खुलं बोलणं श्रोत्यांना पटल्यासारखं दिसल. दुसऱ्या दिवसापासूनच, हवा होता तसा स्वस्थपणा मला लाभूं शकला माझ्याभोंवतालची गर्दी पातळ झाली, अन् मग एक दिवस खरोखरीच काहीं तरी पालट म्हणून मी रानात जावयाच ठरविल आसपास मोठस जगल नव्हतंच. रानात तित्तर, लाव्हे, ससे अन् क्वचित् भेंकर (लहान जातीची भुंडी हरण) यांशिवाय काहींही प्राप्त होण्यासारखं नव्हतं, अन् मलाहि त्याची विशेषशी अपेक्षा अन् उत्कंठा नव्हती.

खानसाहेबाचा जिगरदोस्त महबूब यास मी पुरा ओळखत होतों. त्याच्या अंगी काडीचीहि कर्तबगारी नव्हती, पण कमालीचा ' मूके मुजोर ! ' करमणूक म्हणून, अन् त्या रानाचा माहितगार असा एकादा मदतनीस बरोबर असावा, म्हणून मी त्याला बरोबर घेण्याच ठरविलं या व्यतिरिक्त त्याला बरोबर घेण्यांत माझा दुसरा कांहीहि हेतु नव्हता

उदईक मोठ्या पहांटेसच रानांत निघण्याच ठरलं, अन् महबूबभाईस मी एक चागलीशी धमनी भाड्यानं बघण्यास सांगितली. त्याचा एक दोस्त भाड्याचा धंदा करीत असे. अर्थात् त्याचीच गाडी त्यानं ठरविली, अन् मला तशी वर्दी दिली.

रात्रौ जेवण करून आम्ही व्हरांड्यांत गप्पागोष्टी करीत बसलो होतों. इतक्यांत गाडीवाल्यानं गाडी आणून आवारांत सोडली. गाडीची जोडी तरी कशी काय आहे ती बघावी म्हणून मी उठलों, अन् गाडीच्या धुरांडीला

गुंतवलेल्या त्या जनावरापाशी जाऊन उभा राहिलो एका बैलाचीं शिंगं आकाशपाताळ एक करून देत होती, तर दुसरा गोमातेच्या उदरांतून नुकत्याच निसटलेल्या तान्हुल्या वत्साप्रमाण साफसपाट भुंडा होता! त्याच्या शेपट्या कडक लक्ष्मीच्या आसुडाप्रमाण अन् गाठाळगुठाळ दिसत होत्या खंजिरीच्या मढविलेल्या चमड्याप्रमाणं त्याचे चौक तुळतुळीत दिसत होते—याचाच अर्थ त्यांवर शपथेलाहि केंस शिल्लक उरला नव्हता गाडीवानास नांव विचारता 'अल्ली' अस आपल नांव त्यानं सागितलं

अल्लीबाबाच्या त्या प्रेक्षणीय जोडीची त्याच्यापाशी मी करवेल इतकी तारीफ केली, अन् पहाट होईपर्यंत वाट न पाहतां ताबडतोब कूच करायच मी ठरविलं. महबूबहि तितक्यांत तिथं येऊन हजर झाला, अन् मी त्याला, 'आत्ताच निघूं, म्हणजे ताबडं फुटण्याच्या सुमारास तरी रानात पोंचू' अस सांगून, बैलांच्या गळ्यात जुपण्या घालावयास सागितल्या

   

धमनींत चढतां चढताच अल्लीला मी त्याच्या लाडक्या जित्राबांचीं नांव विचारलीं. तो म्हणाला—' एकाचं नांव हाला, अन् दुज्याचं सुलेमान !'

'शुभान अल्ला !' माझ्या तोडावाटं उद्गार बाहेर पडले त्याच्या बैलांची नुसतीं नांवं ऐकूनच माझी छाती दडपून गेली.

आमचा प्रवास धीरे धीरे सुरू झाला. बैलाना ओढावयास हलकं जावं, म्हणून क्षणाक्षणाला अल्ली वंगारीचा वळसा गाडीच्या झिजलेल्या आखांतून फिरवीत होता बऱ्याच वेळान मीं घड्याळात पाहिलं सरासरी दोनअडीच मैल वाट आम्ही चालून आलो होतों. ताशीं नव्वद-पचाण्णव फीट वेगानं आमची गाडी बेफाट धावत होती या चालीनं चालून चालू सालअखेर तरी आपण रानांत जाऊन पोंचूं कीं नाहीं अशी धास्ती मला पडली, अन् गाडी-

वानाला व त्याच्या दोस्ताला तसं मीं बोलूनहि दाखविल मी अस म्हणतांच तावातावान अल्ली बैलांच्या शेपटया मोडू लागला, अन् उच हात करून, हातांतल्या टिकोऱ्यान त्यानं दोन्ही बैलांच्या चौकावर पांचसहा तडाखे लगावले. हात झिणझिणल्यामुळं अल्लीनं आपल्या उजव्या हातांतल टिकोरं एकदा डाव्या हातांत चाळवलेलंहि माझ्या ध्यानांत आल. शाबास त्याच्या बैलांच्या सोशिकपणाची ! त्यांनी नुसतं अंग शहारल्यासारखसुद्धां केल नाहीं कीं एक पाऊलसुद्धां वाजवीपेक्षां उचलून टाकलं नाही. हतमूढ झाल्यासारखा हा सारा प्रकार मी मुकाट्यान बघत बसलों होतों.

कोठल्या तरी वसतीवरल्या कोंबडयानं दुसरी साद टाकली. पूर्व–क्षितिजावर आतां थोडथोडी लाली चढूं लागली होती, अन् पहांटेच्या गार वाऱ्याची झुळूक लहरीवर लहरी मारीत इतस्तत वाहत होती. माझ्यानं आतां राहवेना. अधीर होत्साता मी अल्लीला म्हणालों, ‘ अजून जगल किती दूर आहे रे ? ’

‘ अब्बी आता, अब्बी आता ’ अस म्हणतां म्हणतां, अल्लीनं हातांतला दंडुका दाणकन् एका बैलाच्या पाठीत घातला.

त्याच्या अब्बी-अब्बीचा मला आता अगदीं संताप येऊन गेला, अन् वाटलं, बंदूक उलटी करावी अन् तिचा दस्ता घालावा याच्या टाळक्यांत !

आतां चांगलं फटफटावयास लागलं, अन् थोड्याच वेळानं, समुद्रस्नान करून आलेला सहस्त्ररश्मि आपलीं तेजस्वी किरणं पृथ्वीवर परिवर्तित घाई-घाईनं नभोमार्ग आक्रमूं लागला.

इतका वेळ रस्त्याच्या दोहो बाजूंनीं दिसत असलेली गोरसलेली शेत-जमीन आतां दिसेनाशी झाली, अन चोहोंकडं निर्मनुष्य–ओसाड–अशी पडकंच पडकं दृष्टीस पडूं लागलीं. रस्त्याच्या कडेलाच असलेल्या महाडुंगाच्या एका वृक्षावर बसलेला ‘ पावशा ’ ‘ पीहू ’ शब्द करीत होता, अन् सूर्योदया-

मुळं आनंदून गेलेले लाल पायांचे तित्तर दूरवर कुठं तरी मोठ्या अहमहमिकेनं 'कीहा' टाकून राहिले होते.

आतां सांवलीला कुठं तरी गाडी सोडावी, अशा विचारांत मी होतो. थोडयाच अंतरावर एक मोठा थोरला वृक्ष दिसत होता, तिथवर आम्ही गाडी नेली. तो एक जुनाट पिंपरणीचा वृक्ष होता, अन् त्याच्या खाली सांवलीला पुरुष-दीड पुरुष उंचीचा एक अक्राळविक्राळ म्हसोबा ( वनदेव ) खडा पहारा करीत त्या वनाची राखण करीत होता. त्याच्या कपाळावर कुलपी गोळ्याप्रमाणं लांबट अणकुचीदार टेंगूळ वाढलेलं होतं, अन् म्हसोबाच्या त्या प्रचंड देहयष्टीला माखावयास लागणाऱ्या पुरेशा शेंदराचा अभाव असल्यामुळं, त्याच्या 'योजक' भगतानी त्याच्या कपाळावरलं टेंगूळ तेवढंच लालीलाल करून सोडलं होतं !

तत्काळ आम्ही गाडी तिथंच सोडली महबूबपाशी खाण्याच्या जिनसांचं गाठोडं अन् डबा दिला, काडतुसाचा पट्टा गळ्यांत घातला, बंदूक घेतली अन् तिथल्या जाज्वल्य वनदेवाला लीनपणानं प्रणाम करून मी तडक जंगलाचा रस्ता सुधारला.

सरासरी एक मैलभर रान तुडविल्यावर आम्ही जंगलाच्या अंतर्भागात येऊन पोंचलों. बेदिक्कतपणं आम्हीं पालापाचोळा अन् गचपण तुडवीत चाललों होतों इतक्यांत अनपेक्षितपणं उद्भवलेल्या एका प्रसंगामुळं माझ्या अंगाचा नुसता थरकाप उडून गेला. माझ्या अगदीं जवळून–पाचोळ्यांतून–एक पोटरीसारखा जाड पिवळाजर्द नाग सळसळ करीत सरळ वाट धरून निघाला. अडचणीतून बाहेर पडून जरा मोकळ्यावर निघाल्यावर त्यावर आवाज टाकावा असं मनाला वाटलं, म्हणून मी त्यास तसाच थोडासा पुढं जाऊं दिला. पण अडचण धरून निसटून जाण्याचं त्याचं लक्षण उघड दिसलं, तेव्हां मी सहा नंबरचीं अगदीं बारीक

छऱ्यांची काडतुसं बंदुकीत भरली, अन् घाईघाईनं त्याच्या दृग्गोचर झालेल्या शरीरावर शिस्त धरून आवाज टाकला. मी टाकलेल्या आवाजामुळ त्याच्या शेपटीचा एक वीतभर तुकडा उडाला; त्यासरसा तो त्वेषानं माघारा फिरला, अन् आपली रुंद फडा पसरून, अन् जिभल्याची विलक्षण हालचाल करीत आमची वाट रोखून, तो खवळलेला भुजग मागल्या धडावर उठून साफ उभा राहिला.

भोळा बिचारा तो जीव ! केवढा त्याचा दांडगा आत्मविश्वास ! त्याला वाटलं, आपण म्हणजेच प्रत्यक्ष मृत्यु ! पण अशा छातीठोकपणान आव्हानपूर्वक सशस्त्र शत्रूसमोर उभं राहणं, म्हणजे आपण होऊन त्या सर्वभक्षक काळाच्या जबड्यात शिरण होय, याची जाणीव त्याला कुठून होणार ?

निमिषमात्र मी त्याच्या रौद्र रूपाकड टक लावली. त्याच्या डोळ्यांवाटे जणं अग्निस्फुलिंग बाहेर पडत होते, अन् वरच्यावर फु ऽ फू ऽ करून, अन् आपली आकड्याप्रमाण मागं वळविलेली मान सपाट्यानं पुढं झटकल्यासारखी फेकून तो भयकर जहरी फूत्कार टाकीत होता !

शिस्त न धरताच मी त्याच्या त्या रुंद फडेवर दुसरा आवाज टाकला. त्याच्या मस्तकाच्या शतश. चिध्या झाल्या, अन त्याचं मस्तकविहीन धड धांवत्या मोटारीची ट्यूब अवचित फुटावी त्याप्रमाण, भळभळा रक्त ओकत खाली जमिनीवर पसरल

वर वर्णिलेला अकल्पित प्रसग, जुन्या जमान्यांतल्या उर्दू नाटकांतल्या ट्रान्सफरन्स सीनसारखा माझ्या डोळ्यांपुढून झटकन् निघून गेला, पण माझ अंतःकरण मात्र इतक्या लवकर तो प्रसग विसरू शकत नव्हत. प्रत्येक पावलागणिक माझ्या छातीची धडधड वाढत होती कसेबसे आम्ही त्या अडचणीतून एकदांचे बाहेर पडलों, अन् जवळच दोन नाले एकमेकांस येऊन मिळाले होते तिकडे निघालो. त्या दोनहि नाल्यांच्या मधल्या चिंचींत

चांगली हिरवळ आमच्या दृष्टीस पडली. तिथे ससे चरणावर निघण्याचा बराच संभव वाटल्यामुळ आम्ही तिथ एका तरवडाच्या झुपक्याआड बसून राहिलों. क्षणभर अशा रीतीन बसल्यावर, एके जागी बसून काही लभ्यांश व्हावयाचा नाही अस मनाला वाटल, म्हणून महबूबला तिथच बसण्यास सागून, मी त्या चिंबीच्या कडेकडेनं हिंडूं लागलों.

घटका-दोन घटका आदबल्यानतर मला सशांची एक जोडी मिळाली. ती महबूबच्या हवालीं करून, ती जागा सोडून आम्ही पुढें निघालो वाटेन आम्हांला आणखी एक ससा, दोन-तीन तित्तर अन् दोन लाव्हे मिळाले. ते काठीला गोंवून, विसावा घेण्याकरिता अमळसे एका झाडाखाली टेकलों. ऊन्ह आतां बरंच तावूं लागल होतं. ससे, तित्तर वगैरे छोटे प्राणी आपापल्या ठिकाणी चिडीचीप होऊन गेले होते, म्हणून आम्ही आता हरणाच्या तपासांत होतों. तो सुका नाला ओलाडून आम्ही पलीकडच्या माळावर निघालों. हरणांचे छोटे छोटे माग क्वचित् दिसत होते, पण ते प्राणी कुठंहि दृष्टिपथात येईनात

मैल-दीड मैल गेल्यानंतर मात्र एका लवणांत पांच चार भेकरं आमच्या नजरेस पडली हरणाचा एक छोटासा खांडवाही पलीकडल्या अंगाला उभा असलेला आम्हांला दिसला लाब लांब शिंग असलेला एकच पिंगट वर्णाचा बामण्या नर त्यांत होता मला आशा सुटली. वास्तविक त्या उघडया सपाट माळावर त्याच्या नेटांत जाऊन आवाज टाकण म्हणजे मोठं दुष्कर कर्म होतं पण आशा ही मनुष्याला निव्वळ आशाळभूत बनवून टाकते खरी. अंगांनले कपडे मीं उतरून टाकले, अन् घोरपडीप्रमाणं सरपटत सरपटत त्या तापलेल्या माळावरून अर्धा फर्लांगभर मी गेलों. त्या धूर्त अन् चाणाक्ष प्राण्यांनीं मला तेव्हांच हेरलं, अन् टणटणा उडया घेत ती तत्काल अदृश्य झाली.

   

माथ्यावरला सूर्य आतां चागला वावभर कलला होता जमिनीतून कढत वाफा निघत होत्या, अन् जळजळित झळया, जोराच्या लाटेसरशा, किनाऱ्यावरल्या वाळवटावर फेकल्या गेलेल्या माशाप्रमाण प्राणिमात्रास भाजून काढीत होत्या तहानेन माझा घसा कोरडा पडून गेला पण पाणी ! तें तर कुठंच भेटेना. जवळच्या कोरडचा नाल्यांत जाऊन, थेटल्यासारख्या झालेल्या एका झोळाच्या जागी वाळू उकरून आम्ही चांगला गुडघाभर झरा खोदला. बऱ्याच वेळान त्यात थोडं थोड पाणी जमू लागल विलक्षण दर्प मारणारं तें मचूळ पाणी थोडंस निवळल्यावर आम्ही दोघेहि प्यालो. पण त्या पाण्यान आमची तहान अल्पांशानंसुद्धां भागू शकली नाही आमच्या खाण्याच्या सामानाच्या गाठोड्यात थोडयाशा काकडया अन् संत्रीं होती. त्यांची आठवण मला झाली. गाठोडं सोडून आम्ही दोघानींहि त्यांचा फन्ना पाडला, तेव्हां आम्हास जरास बर वाटलं. माझ्या घशाची कोरड कमी पडली, अन् विश्रांतीसाठी आम्ही त्या नाल्याच्या कडेलाच असलेल्या एका लिंबाच्या वृक्षाखाली क्षणभर जाऊन लवंडलों

बरीचशी विश्राति मिळाल्यामुळं आम्ही पुन्हा ताजेतवाने झालों, अन् हरणांच्या शोधार्थ आमची भ्रमती पुन्हा सुरू झाली. बहुत पायपिटी करून आम्ही थकून गेलों पण हरणं कुठच दृष्टिपथात येईनात प्रखर उन्हामुळं जीव कासावीस होऊ लागला. सहजगत्या माझी नजर वर गेली. आकाशांत एकामागून एक अक्राळविक्राळ ढग उठू लागले, अन् थोड्याच वेळांत अलग-अलगपणानं वावरणारे ते काळे-कभिन्न मेघ परस्परांशीं सलग्न होऊन, त्यांनी आपल्या गटाची एक प्रचंड फळी बनविली.

ही सारीं लक्षणं पाहून वेळेवारींच गाडीकड परतावं, असं माझ्या मनांत आलं. वळिवाचा अवकळणी पाऊस पडूं लागला कीं, एखाद्या वेळीं भलताच पडतो. तस झाल्यास, अन् ओढ्यानाल्यांना पूर आल्यास त्या फजितीला पारावर

उरणार नाही असं मला वाटलं, अन् झपाट्यानं नाला ओलांडून आम्ही पार झालों

नाला ओलांडून पुरते फर्लांगभरसुद्धां आम्ही आलों नव्हतो, तोंच पाण्याचे टपोरे थेंब टपटपा वरून ठिबकूं लागले, अन् थोड्याच वेळांत, आकाश फाटल्याप्रमाणं वरून मुसळधार पाऊस ओतूं लागला !

ज्या दत्ताला मी इतका वेळ भीत होतों तोच साक्षात् मजपुढं येऊन उभा राहिला एका क्षणापूर्वीच वातावरणांत असलेला ऊष्मा एकदम कुठच्या कुठंच अंतर्धान पावला, अन् गारठ्यामुळं आम्हाला आता हुडहुडी भरण्याची वेळ आली. निवाऱ्यासाठी झाडांझाडांनी पांखरांच्या झुंडीच्या झुंडी बसून राहिल्या होत्या त्यांची किलबिल बिलकुल बंद पडली होती, अन् अंगावरलं पावसाचं पाणी निथळून टाकण्यासाठी अधूनमधून पंख फडफडा-वीत तीं पुन्हा जिथल्या तिथं चीपचाप होत होती

जवळ जवळ दोन घंटे याप्रमाणं पाऊस कोसळत होता आता त्याचा जोर किंचित् कमी पडल्यासारखा झाला, अन् आणखी थोड्याच वेळानं तो अजीबात उघडला. विद्युल्लतेचं तांडवनृत्यहि थांबलं, अन् आकाश निरभ्र होऊन गेलं पण इतक्यांत सोसाट्याचा वारा घोंगावूं लागला अन् वाऱ्यानं मोठमोठे वृक्ष उन्मळून पडतात की काय, असं वाटूं लागलं निरु-पायानं आम्ही पुनः झाडाच्या खोडाला बिलगून बसलो

क्षणभर मनःपूत धिंगाणा घातल्यावर मरुत्राज शांत झाले, अन् " आतां काय पुढे या ! " असं मनाशीच म्हणत, विडी काढण्याकरितां मी खिशांत हात घातला माझ्या रबरी पाकिटांतल्या विड्या बऱ्याचशा कोरड्या राहि-ल्या होत्या. पण काड्यांची पेटी—ती तर भिजून चिंब झाली होती काळोख दशदिशा व्यापून राहिला होता. खिशांतला टॉर्च काढून, महबूबच्या तोंडावर शिस्त धरून मी तो उजळला. त्याबरोबर मान वर उचलून त्यानं

एकदां आकाशाकड पाहिल, अन् आपले दोनहि हात स्वस्तिकाकार छातीवर धरून हताशपणानं तो ओरडला ' ला—हौला—वला—कूवत ! '

   

नाल्याला आलेल्या पुराचा खळखळ आवाज स्पष्ट ऐकूं येत होता. इथून आमची गाडी सुटली होती तें ठिकाण, अनुमानानं अडीच–तीन मैलांपेक्षांहि अधिकच दूर होतं. रानहि आमच्या पायांखालच नव्हत. वाटेचा तर पत्ताच नव्हता, अन् दिशाहि आम्हांला नीटशा उमगत नव्हत्या. मोठ्या मुष्किलीनं आम्ही चिखलांतून एकेक पाऊल उपशीत कुणीकडं तरी चाललों होतों, अन् पायांना गोळे येऊं लागले म्हणजे त्या चिखलांतच उभं राहून क्षणभर विसावा घेत होतों.

" पंकमग्नौ व्याधौ " (' रानोमाळ ') या माझ्या गोष्टींतल्या गोऱ्या शिकारी दुकलीसारखी तर आज आमची अवस्था नाही ना होणार ? असं मनात येऊन, मी मनाशींच स्मित केल. पांच–पचवीस कदम गेल्यावर, असेच आम्ही एका ठिकाणी विसावा घेण्याकरितां उभे राहिलों होतों. इतक्यांत कुठून तरी कुत्र्याच्या रडण्याचा सूर आमच्या कानीं आला. ' बुडत्याला काडीचा आधार ' म्हणतात तें अगदी खर जवळच कुठ तरी वसती असावी, असा आमचा तर्क झाला मोठ्या आशेनं आम्ही त्या आवाजाच्या अनुरोधानं बघूं लागलों, तोंच आगटीचा नाचरा प्रकाश आम्हां दोघांच्याहि नजरेस पडला, अन् मोठ्या हुरूपानं आम्ही त्या प्रकाशाच्या खुणेवर निघालों.

थोड्याच वेळांत आम्ही त्या वसतीजवळ येऊन पोंचलों. कुत्र्यांनीं आमच्याभोंवती नुसती धेंगट उडवून दिली होती, अन् त्यांना धुडकावीत एक पोक्तसा गडी अन् दोन–तीन पोरं आम्हांभोंवतीं येऊन उभी राहिलीं. तिथं दहा–बारा पालं ओळीनं दिलेलीं होती. चौकशी करतां, त्या पालांतून

राहणारे लोक जातीनं बेरड होते असं कळलं 'म्हसोबाच स्थान इथून किती दूर आहे रे?' म्हणून आम्ही त्या म्हाताऱ्याला विचारलं. आमचा अदमास तंतोतंत बरोबर होता. 'दोन कोस हाय' तो म्हातारा म्हणाला. 'तुझ्याजवळ एखादं घोडं असल तर दे आम्हांला, अन् आमच्याबरोबर चल. तुला चांगली बक्षिसी देऊं' मी म्हणालो.

गोमाश्यांनीं बुजबुजलेल अन् कळवा घातलेलं एक घोडं तिथं जवळच कुडकुडत उभं होतं. त्याकडं बोट करून तो म्हातारा म्हणाला—'अन् त्ये पघा की! माझीच हाय ती शिंगी. अक्षी वारू! पुन् तिचा योक पाय मोडलाय, धनी!'

'मग तिला गोळी घालून टाक कीं!' मी.—

'गोळी कशी घालू, धनी? वर्सा-दिडा वर्सा ती शिंगरूं टाकते, अन् मलाबी धा-बारा रुपये पराप्त व्हत्यात. त्यो पड्याल तब्या हाय नव्ह का! त्येचं घोडं अगदीं तगडं! चारी पाय अक्षी दांडावानी! पुन् त्यो आतांच तर्रर्र हून आल्येला हाय, अन् आल्याबरुबर अस्तुरीला ध्वापाट ध्वापाट ध्वापाटली अन् पल्डायू तथच चिखलामंदी.'

'दाव तर खर आम्हांला तब्याचं पाल,' मी—

त्या बुढढ्याला बरोबर घेऊन आम्ही तब्याच्या पालावर आलों. तबाजी-बुवांची स्वारी अजूनहि अस्तुरीला शिव्या हासडीतच होती. एखाद्या झुक-लेल्या केळीच्या झाडाला डेंग्या द्याव्या, त्याप्रमाणं तब्या आपल्या दोन्ही हातांच्या आधारावर पुढं तोल टाकून बसला होता. मोटारीचा टप पाडाव-याचा झाला, म्हणजे आपण त्याचे तणावे जसे मोडतो त्याप्रमाणं मधून मधून, कोंपरापासल्या सांध्यांत त्याचे हात दुमते होत अन् त्याचं कपाळ जमिनीवर आपटे.

त्याचं लक्ष आमच्याकडं वेधावं, म्हणून मी एकदां खांकरल्यासारखं करून मोठ्यानं हाक मारली– तबाजीबुवा !

गुजेसारखे लालबुंद झालेले आपले डोळे त्यान आमच्यावर वटारल्या-सारखे केले, अन् म्हणतो– ऑ, मानसं माराया आलात व्हय हथं ! रातचं मानसं मारीत फिरतां व्हय !

मी एकदम सर्द होऊन गेलों. मोठया अजीजीनं पुनः मीं त्याला म्हटलं– तसं नव्हे, तबाजीबुवा शिकारीकरितां आम्ही इकड सकाळींच आलों होतों. शिकार झाल्यावर परत फिरतों तों आम्हांला पावसान झोडलं, अन् पडलों आम्ही रानांतच अडकून. त्या म्हसोबापाशी आमची गाडी सुटली आहे. तिथवर जाण्याकरितां तुमचं घोडं आम्हांला देतां कां ! अन् बरोबरहि कुणी द्या. आम्हीं तुम्हांला भाडं देऊं. '

' मोठ आल भाडं येनार ! असल्या काळुखांत कोन येनार मरायला ! '

खिशांतला रुपया काढून, मी त्याच्यासमोरच पडलेल्या जात्याच्या एका फुटक्या तळीवर टाकला. माझी मात्रा बरोब्बर लागू पडली. ' छन्न्– ' असा त्या नाण्याचा मधुर, मोहक नाद कानावर पडतांच तो थोडासा चमकल्यासारखा झाला, अन् किंचित् सुधा बोलूं लागला.

तो पाघळलेला पाहून मी तत्काळ महबूबला म्हणालों, ' महिबूब, त्या म्हाताऱ्याला एक ससा अन् तित्तर दे, अन् बाकीचे दोनहि ससे अन् सारे तित्तर अन् लाव्हे तबाजीबुवाला देऊन टाक. '

ती ताजी शिकार पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटलं, अन् आतां त्याची कळी चांगलीच खुलली.

त्या शिकारीचा लोभ धरण्याच आम्हांला आतां कांहींच कारण नव्हतं. या वेळीं जवळचं ओझं हलकं करणंच आम्हांला अधिक इष्ट होतं.

त्यानं आपल्या पोराला हाक मारली, अन् घोड्याला 'वठाळी' दे म्हणून सांगितलं. पोर पहिल्यानं काणकुण करू लागलं; पण 'उद्यां तुला प्वाटभर सागुती चारतो बिब्वा,' असं म्हणताच तें पोर तयार झाल, अन् तट्टाला ओठाळी लावून, त्यानं त्याच्या पाठीवर एक फाटकं तरटहि टाकलं.

तबाजीबुवाचा निरोप घेऊन, अन् हातीं ओठाळीच्या दोऱ्या धरून अस्मादिकाची स्वारी अश्वारूढ झाली. इतक्यात झरझरा तो वारू, मागले दोनहि पाय पार जमिनीपर्यंत दुमते करून मागं मागं सरू लागला, अन् त्या वारूसह आमची स्वारी चिखलांत लोटांगण घेण्याच्या बेतांत आली झटकन् मी हातांतल्या ओठाळीच्या दोऱ्या थोडया ढिल्या दिल्या त्याबरोबर तो वारू उठून उभा राहिला, अन् आणीक कांहीं बयदा न होतां एकदाचे आम्ही मार्गस्थ झालों

गाडीपाशीं आम्ही येऊन पोंचलों तों मध्यान्हरात्र उलटून गेली होती अल्ली, बैलांच्या खालचा चेतविलेला आंबटओला गळाठा फुंकून फुंकून शिलगाविण्याच्या प्रयत्नांत होता. आपल्या दोस्ताकडे पाहून तो म्हणाला—'दोस्त, मला वाटलं, तुम्हीं दोघहि गेला नाल्याच्या पुरांत वाहून!'

तब्याच्या पोराच्या हातावर बक्षिशीदाखल मी एक अधेली ठेवली. वाटल्यास 'उजाडल्यावर तूं आपल्या वसतीवर जा' अस मी त्यास म्हणालों पण पळभरहि न थांबतां त्यानं घोड्यावर टाग टाकली, अन् गडद काळोखांत तो दिसेनासा झाला.

अंगावरचे ओले कपडे मी उतरून ठेवले, अन् अल्लीला विचारलं, 'बडनेऱ्याला केव्हां आतां निघायचं?'

'उद्यांचा आखा दिवस ऊन्ह चागलं तावलं, अन् चिखल हडकला, तर परवां पहांटे निघायचं'

गारठ्यानं थिजण्याच्या बेतांत आलेले माझे डोळे मी हिंदुस्थानाच्या वायव्य-सरहद्दीकडे लावले, अन् ओठांतल्या ओठांत पुटपुटलों, 'हाला अन् सुलेमान !!'

## चंद्रभागेच्या तीरावर. ११

" रहाता करावा ब्येत आजचा. कसनुसच कावधान सुटलंय्, अन् बुरंगाटबी शितडाया लागलंय्, " पोटरीवर वाखाच्या वेसणी वळतां वळतां राघू मला म्हणाला.

खूप मोठं कावधान (वावटळ) झालं, कडाकड झाडांच्या खांद्या मोडून पडल्या, कित्येकाच्या घरांवरचीं काडाचीं छपरें उडालीं, कडब्या वैरणीच्या गंजी रेलून गेल्या. वाडग्यांचीं अन् मळ्यांभोंवतालचीं काटीं कुंपणें इतस्ततः पसरलीं, अन् मळ्यांमळ्यांतून निसवावयाच्या बेतांत आलेली हुंडी पार जमिनीवर लोळून गेली! पंचमहाभूतांतल्या एका खवळलेल्या भूतानें घटकाभर अशा रीतीनें थैमान घातल्यानंतर जिकडेतिकडे शांत झालें, अन्

इतका वेळ घरांत चिडीचिप् झालेली मुलें किलबिल करीत पुनः आनंदानें इतस्ततः बागडूं लागलीं.

कापावयाला आलेली हुडी अन् दृष्ट लागेल असा तुऱ्यावर आलेला मका जमिनीवर साफ निजलेला पाहून विषादपूर्ण अंतःकरणानं मी विहिरीजवळच्या गणपतीच्या देवळाच्या पायरीवर बसून राहिलों होतों. इतक्यांत पॅर्ट्रिज माझ्या दोन्हीं छोकऱ्याना हातीं धरून माझ्यासमोर येऊन उभा राहिला, अन् डोक्यावरची हॅट उचलून त्यानं प्रथम मगलमूर्तीला अन् नंतर 'गुडईव्हिनिंग' म्हणून मला अभिवादन केलें.

"अरे कसली गुडईव्हिनिग, हें समोर वाटोळं झालेलं तुला दिसत नाहीं कां ?"

"हॅलो! त्याला काय करायचं! पण उद्यां शिकारीला काय मजा येईल म्हणतोस! थोडेसे थेब झाल्यामुळें उद्यां माग काय झकास लागतील! चाचपडायच कारणच नाहीं. गाडी घे उद्यां बरोबर आपल्या! शेरडुक्या शेकाट्यानें बाभळीच्या शेंगा झोडपतोना, तशीं उद्या आपण जनावरं होलगडून पाडूं" !!

त्याच्या त्या बेछूट बोलण्याचं मला हंसू आलं माझ्या मनाची विषण्णता पार नाहींशी झाली आणि वृत्तीही उल्हसित झाली. आणखी थोडया इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर शिकारीला येण्याच माझ्याकडून अभिवचन घेऊन तो आपल्या मकाणावर निघून गेला.

हरणांवर जाण्याचा आजचा माझा बेत कावधानामुळें तहकूब झाला होता तोंच हें दुसरं आंवतण मला आलं होतं.

   

ई. जे. पॅर्ट्रिज हा ख्रिश्चन गृहस्थ माझ्या मळ्यापासून जवळच स्टेशन-

रस्त्याला रहात असे त्याचा चुनखडीपासून चुना तयार करण्याचा धदा होता. मुंबईच्या कांहीं कॉंट्रॅक्टर लोकांस तो चुना पुरवी. त्यानं आणखीही एक जोडधदा अलीकडं सुरूं केला होता. तो काळवीट मारून मुंबईच्या एका बड्या हॉटेलला पाठवी. खेळता खेळतां शिकारीवर तो आतां कमाई करूं लागल्याचं कळल्यामुळ त्याच्याबरोबर हरणांवर जाण्याच मीं वर्ज्य केलं होतं; पण आज तो अगदी खनपट्टीस बसल्यामुळें मी डुकरांच्या शिकारीस येण्याचं त्याला कबूल केल होतं.

   

सगळीकडचा निवडुंग नाहींसा झाल्यामुळं शिवारांतील जनावरे ( रानडुकर ) आतां पातळ झालीं होती. कुरणाकुरणानी आतां क्वचित्–तुरळक जनावरं आढळत, पण गुरांच्या अन् शेरडांच्या वर्दळीमुळें खेळात व्यत्यय येई. घनदाट अडचणीच्या अन् ज्यात चराऊ रान बिलकुल नाही अशा कुरणा काटवणात तेवढी ही श्वापदं रहिवासलेलीं असत गारच्या नानावुवांच्या मठाच्या पिछाडीपासून तों कानगांवला वळसा घालून भीमा नदी पुढ निघते त्या वांकणापर्यंतच्या विस्तीर्ण कुरणांत आज आम्हांला खेळायचं होतं. मी, पॅट्रीज अन् त्याचा एक दोस्त डिमेलो असे तिघे बंदुके, तीन बाऱ्यांवर होतों. नदीला पाणी फार नसल्यामुळे वेळेनुसार श्वापद नदीत उड्या घेऊन पलीकडे पसार होण्याची धास्ती असल्यामुळं, त्या बाजूनं श्वापदं मोडून बारीवर घालविण्याकरितां आम्हीं माणसें उभी केली होती. पण खेळाचं क्षेत्र अफाट असल्यामुळे खेळाच्या यशस्वितेची खात्री आम्हांपैकी कुणालाच वाटत नव्हती. माग सोडवून पण दैवावर हवाला ठेवूनच आम्हीं हके आंत घातले.

   

हके कुरणांत शिरल्याला पुरती एक घटकाही लोटली नव्हती. पश्चिम-

बाजूनं नदीची कड धरून रानकाढे रान सोडवीत चालले होते. तोंच त्यांना एका खोपेंत गेलेले डुकरांचे दोन ताजे माग आढळले. जनावरं बाहेर न पडल्याबद्दल खात्री करून घेऊन त्यांनी मला वर्दी देण्याकरता माझ्याकडे एक मनुष्य रवाना केला. मजपाशीं येऊन तो वर्दी देणारा इसम उभा राहिला, आणि दोन भारी जनावरं जागेवरच हेरल्याची वर्दी त्यानं मला दिली. "आवाज नेटातून टाकण्याच जमलं, तर एकाशेजारी एक पहुडलेली ती वराहाची जोडी एका गोळीतच ओवली जाईल," असा त्याचा होराही त्यानं मला उद्गारून दाखविला!

किती अचूक होती त्याची कल्पना! पायांना पंख फुटावे त्याप्रमाणे मी त्याच्याबरोबर धावतच गेलो.

कुरणाच्या तोंडाशी येताच मी माझ्या अंगातले कपडे काढून फेकून दिले, अन् अक्षरशः घोरपडीप्रमाण सरपटत सरपटत जाऊन माझ्या सहकाऱ्यानं दाखविलेली ती वराहाची जोडी प्रत्यक्ष मी माझ्या दृष्टीनं पाहिली. गडद अंधकार असलेल्या गर्दीडात ती काळीकभिन्न श्वापदं चागलीशी उमगून येत नव्हती वरच्या एका बाजूचे तोंडाबाहेर आलेले त्यांचे पांढरे सफेत सुळे तेवढेच किंचित् चमकत असलेले माझ्या दृष्टीस पडले, अन् माझी रायफल पालथा पडल्यापडल्याच मीं माझ्या खवाट्याला जोडली. अत्यंत सावधगिरीनें श्वास रोधून मी माझ्या रायफलीचा हॅमर खेचला. जागच्याजागीं थोडीशी धडपड करून व पाय पाखडून ती दोन्हीं जनावरं शांत झालीं, अन् त्यामुळं माझं अंत करणही विलक्षण उत्साहान मस्त झाल्यासारखं त्यावेळीं मला भासल.

   

गड्यांच्या नेहेऱ्या उरकल्यानंतर दुसरी उठावणी सुरू झाली. आम्ही

सगळेजण आपापल्या बाऱ्यांवरून सावधगिरीनें होतों. दिवस माथ्यावर आला होता. हरामखोर कावळे कुरणातल्या श्वापदांना धोक्याचा इषारा देण्याच्या इरादान घसे कोरडे पडेपर्यंत कोकावत होते कुरणाभोंवतीं एकदोघे शेरडुके घुटमळत होते, त्यांना आम्ही आमच्या माणसांकडून लांब हांकून लावलं. इतक्यात पॅर्ट्रिजच्या बारीवर पाठोपाठ दोन आवाज घुमले. पांच चार मिनिटं मी माझ्या बारीवरच खडा होतों, पण आणखी कांहीं हलचाहूल न लागल्यामुळें मग मी पॅर्ट्रिजच्या बारीकडे निघालो. पॅर्ट्रिजनें एक भली मोठी डाडर ( डुकराची मादी ) ठार केली होती, अन् कृतकृत्य होत्साता तिच्याकडे बघत तो ऐटीत उभा होता

   

थोडीशी विश्रांति घेऊन अन् पोटाला थोडी आहुति देऊन आमचे गडी पुनरपि अद्यापपर्यंत न चाळवलेल्या कुरणाच्या गार बाजूच्या टापूंत घुसले. आम्हींही आमच्या सहकाऱ्यांच्या विचारानं नव्या बाऱ्या मुक्रर करून त्यांवरून जाऊन बसलो दिवस बराच कलला होता पॅर्ट्रिज एका निरुंद पादीच्या तोडाशीं असलेल्या–पण खात्रीचं बार पाहून बसला होता मधल्या बारीवर मी होतों, अन् डिमेलो अगदीं अखेरच्या बारीवर उभा होता. गिरवळ पडण्याचा सुमार होत आल्यामुळे अन् मघा झालेल्या आवाजामुळ रानही जागं झालं असल्यामुळें, आतली श्वापदं अर्थात्‌च सावध होतीं. रानकाढे गडी मोठ्या अहमहमिकेनं हाका टाकीत होते थोड्याच वेळानें डुकरांचा एक मोठा खांडवा रानकाढ्यांना उठला, अन् तत्काळ त्यानीं आम्हांला तशी सूचनाही दिली.

एकदम बाहेर न भडाडतां तीं इब्लिस श्वापदे कुरणाच्या कडेवर येऊन आपल्या शत्रूची चाहूल घेत उभीं होतीं. पण आतां रानकाढे पाठीवर येऊन

दाखल झाल्यामुळे त्याचा निरुपाय झाला, अन् त्या खाडच्यांतलीं दोन मोठीं प्रेक्षणीय जनावरं दुडकत दुडकत अखेर बाहेर पडली पॅर्ट्रिजनं मोठ्या कौशल्यानं दोन आवाज टाकून त्या दोघा श्वापदांनाही लोळवलं, अन् मोठ्या डौलानें त्यांच्या जवळ जाऊन अन् रायफल जमिनीवर टेकून त्यांच्या-कडे पहात तो उभा राहिला होता

तिसरी उठावणी होऊन गेली होती, सूर्य अस्तास जाण्याच्या विचारात होता, अन् कुरणांतील गडी बाहेर पडावयाचाच काय तो अवकाश कीं खेळ खलास झाल्यासारखाच होता

जिवाच्या भीतीनं, गडी अगदीं नजीक येईपर्यंत थबकून राहिलेलीं बाकीची श्वापदं आता हरमळीनं बाहेर निघाली, अन् गहाळपणानं उभ्या असलेल्या पॅर्ट्रिजला त्या हरमळीतल्या एका मस्त डुकरानं एकच ठोंस लावून फूटबॉलप्रमाणे, त्यान आवाज टाकलेलीं दोन्ही जनावरं नुकतीच मरून पडलेलीं होतीं-नेमकं त्याच्या शेजारीच फेकून दिलं !

रानकाढे गडी पाळीवर होते, म्हणूनच आज पॅर्ट्रिजची जान बचावली. नाहींतर बेहोष बनलेल्या त्या मस्त श्वापदान त्याला केव्हांच आपल्या आकाशांतल्या बापाकडे रवाना करून दिला असता !!

## एकांत तीन !

## १२

पांच सहा दिवस पुण्यास, आणि तेथून आल्यानतर जवळ जवळ एक आठवडा कांहीं निकडीच्या कामामुळें रानांत जाण्यास न बनल्यामुळें, मला रानांत जाण्याची आज अगदीं सुरसुरी आली आणि राघूस सायंकाळीं निघावयाचे म्हणून सूचना दिली. नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें त्यानें सर्व तयारी केली, आणि थोडा दिवस कलल्यानंतर दोघांतिघां गड्यांसह आम्ही वाट चालूं लागलों. गडद पडण्याचे सुमारास आम्ही मांडवगणास पोहोंचलों आणि नानासाहेब फराटे यांचे मळ्यांत मुक्काम केला. फराटे यांचा मळा आणि संत्र्याचा बाग गांवाबाहेर दीड एक मैलावर होता. तेथून अगदीं थोडया अंतरावर पुष्कळसें पडीक शिवार होतें आणि त्याचे पलीकडे कुरण होतें. खेळावयास मोठें सोयीचें आणि मनपसंत ठिकाण तें होतें.

नानासाहेब आम्हास अगत्यपूर्वक तेथेच मुक्कामास येण्याविषयीं आग्रह करीत आणि आम्हासही ती गोष्ट इष्टच असल्यामुळे, या बाजूस यावयाचें झाले म्हणजे आमचा पहिला मुक्काम तेथेच पडे. त्या पडीक आणि ओसाड शिवारांत हरणांचे कळपच्या कळप असत.

चहा घेऊन, माणसास माणूस दिसतें न दिसतें अशातच आम्ही खेळाव-याचे जागीं येऊन दाखल झालों. गाडी जरा दूर उभी करून तेथला तो नयनरम्य देखावा क्षणभर पहात बसलों हिरव्यागार रानात ती नाजुक जनावरे स्वैर विहरत होती.

कित्येक सुदर हरिणी–आमच्या भाषेंत बोडक्या–आपलीं लहान लहान पाडसें पोटाशीं घेऊन स्वस्थ चित्ताने रवथ करीत होत्या. कान फटफटावून जणू आळस झाडीत, चरणावर निघण्याचे तयारीनें त्यांतील कांहीं, आस्ते आस्ते खड्या होत होत्या. कित्येकाचा शिवाशिवीचा खेळ चालला होता. मस्त काळे ( काळवीट ) आपल्या लाब लांब शिंगांनीं माती उकरीत होते, तर कांहींच्या टक्करा लागल्या होत्या.

कलावंताच्या हळुवार भावनेचा हा अत.करणात उदित झालेला कप्पा मीं अगदी घट्ट मिटून टाकला. कारण, माझ्या तो कामाचा नव्हता. मनांतले असले काव्यमय–नेभळट–विचार हुसकून लावावेत म्हणून बंदुकीच्या गार पडलेल्या नळीवरून मीं दोन तीन वेळां जोरानें हात फिरविला. बंदूक भरली. घोडा उघडला आणि राघूस, तेथे ऐरणीजवळ मोठ्या चुरशीनें लढत असलेल्या पुष्ट काळ्यांचे रोखानें गाडी घेण्यास सांगितले. काळे टप्यांत येतांच मी आवाज टाकला आणि आमची 'भवानी' तर झाली. लांब लांब शिगांचा तो दुसरा काळा किरण घेऊन उडाला, तों मी दुसरा आवाज टाकला; त्याचीही पहिल्याप्रमाणेंच गत झाली सर्व रान हलून गेलें मुंग्यांसारखी हरणें असलेल्या त्या पडकांत आतां एकादे पाडसही दिसेना ! गारांचा पाऊस

पडावा आणि त्यांतच जोराचे वावटळ उठावे त्याप्रमाणे ती हरणें इतस्ततः उधळलीं. गाडीस ओझे नको म्हणून ते दोन्ही काळे, त्याचे कोठे काढून, मळ्यांत नेऊन पोहोचविले, आणि आम्ही पुन्हा त्या पडक्याच्या पूर्वेस असलेल्या माळाकडे निघालों खेळत खेळत इनामगांवावरून तीन प्रहरी पिंपळखुटीचे शिवारांत शिरलों.

आम्हांस फक्त एकच 'बामण्या' (पिंवळसर रंगाचा काळवीट) सायासानें मिळाला. आम्ही आतां परत फिरण्याचा विचार केला मधून न जातां कोठेतरी सडकेला लागावे म्हणून गाडी वळविली.

ओघळ ओलांडून अलीकडे येतो तो नागरगावची काही मंडळी तिकडून येत असलेली दिसली त्यांतील एक-दोघाच्या खांद्यावर वाघरा (जाळी) दिसल्यावरून ते हरणावर निघालेले असावेत असे मी ताडले. आतांपर्यंतच्या खेळांत त्यांना कांही कमाई झालेली दिसत नव्हती आम्हास पाहून ते जरासे थबकल्यासारखे झाले त्यातील काहीनी मला रामराम घातला व ते गाडीजवळ आले म्हणून मी गाडी उभी केली इकडच्या तिकडच्या गप्पा होता होतां 'आमच्या कुरणांत रानजनावराचा लई रहिवास आहे, तुम्ही येत असाल तर चला' म्हणून ते मला म्हणाले. 'आज मजजवळ रान उठविण्यास माणसें नाहीत, पुढे केव्हां तरी तुमच्या गावी येऊ,' असें मी त्यांस म्हटले. पण, 'आम्ही काय नाबर आहोत ? तुमच्या अंगावर खाडवाच्या खांडवा आणून घालू की,' वगैरे अघळपघळ थापा मारून त्यानी फारच लगट केली. माझे जवळचा 'बामण्या' उडविण्याची ती एक क्लृप्ति असावी अशी मला शंका आली. पण त्याबद्दल परिस्फुटता न करिता मी ती मनातच ठेवून, त्याचेबरोबर येण्याचे कबूल केले. आम्ही सर्व रात्री दहा साडेदहा वाजण्याचे सुमारास नागरगांवीं येऊन पोहोचलो, आणि आम्ही बहिरोबाचे देवळांतील एका सोप्यावर आपली पथारी लावून दिली राघूस गाडीतला

'बामण्या' व फराटयांचे मळ्यांत नेऊन टाकिलेले दोन्ही काळे पाटसास पोहोंचवून, उद्यां दोनप्रहरपर्यंत नागरगावी परत ये म्हणून सांगितलें, आणि थोडासा फराळ करून आडवा झालों. उजाडताच चहा करून घेतला आणि गांवकरी मंडळी येऊन बसली होतीच त्याचे विचारें पुढला कार्यक्रम ठरविला. कुरणास एकवार वेढा देऊन यावें आणि कुरणात जनावरे असल्याबद्दल खात्री करून घ्यावी म्हणून आम्ही बाहेर पडलो, आणि मिळविता आली तेवढी माहिती गोळा करून परत आलो गावकरी मडळी आपला किरकोळ कामधदा उरकून व न्याहाऱ्या करून जमतात तों सूर्य डोक्यावर आला होता. लगबगीनें आम्ही कुरणाकडे मोर्चा वळविला आजच्या खेळाचा रागरंग मला कांहीं तितकासा उत्साहकारक वाटत नव्हता. कुरणांतून जनावरे बाहेर पडल्यास नदीच्या किनाऱ्यावरील शेरण्यांतून घुसावयाची असा अदमास करून, मी कुरणाबाहेरच्या पातळशा काटवणात एका टेपाडावर उभा राहिलों बारीवर उभे रहावें तो बारी अशी कोठें नव्हतीच. नदीकडची सर्व बाजू खुली होती. तीं माणसेंही गैरवाकबगार आणि गव्हार दिसली त्यास 'जनावरे कोठून बाहेर पडतील' म्हणून विचारता, काहीतरी वेंधळ्यासारखी ते उत्तरें देत. ते लोक कुरणांत शिरले पण शिस्तवार फरा न धरतां पेंढाऱ्यांसारखे कोणी कुठेंही हाका टाकीत फिरत असा प्रकार होता. मागानें जाऊन त्यास एका ठराविक बारीवर काढावयाचें, तें तर बाजूसच राहिले. पण कांहीं अंगचोर लोक आंत न शिरता, मी उभा होतों त्याच बाजूनें हाका टाकू लागले. संतापानें दातओंठ चावीत मी मुकाट्यानें उभा राहिलों होतों. मला माझी जागाही सोडितां येईना न जाणों, त्यास सूचना देण्याकरिता मी आपली जागा सोडली, आणि त्याचवेळीं एकादें जनावर भडाडलें तर पचाईत! अशी माझी केविलवाणी अवस्था झाली. तास झाला, दीड तास झाला; जनावरे तर बाहेर पडेनात. दाट झुडपें व काटवण असल्यामुळें तीं फक्त

आपली जागा चाळवीत आणि तेथेच तुरमुंडी देत. रामोशी लोकांप्रमाणें मागानें जाऊन, धोरणानें व नेटानें जनावरे घाबरीं करून, बारीवर आणावयाचीं हे त्यांस माहीतच नव्हतें. दिवस पार कलला तेव्हां मी आपली जागा सोडली. लोकांस बाहेर बोलावून घेतलें आज फार मेहनत घेतल्याबद्दल त्यांचे —अंतःकरणापासून नव्हे— शाब्दिक अभिनंदन केले आणि गांवाकडे निघालों. नागरगांवकरांनी आज मला चांगलाच धडा शिकविला आमचे खेळाचा आज निखालस पोरखेळ झाला !

   

पाटसाहून राघू गाडी घेऊन केव्हांच माघारा आला होता. उद्ईक दिवसभर हरणांवर जाऊन सायकाळी घरी परत फिरावयाचें असें आम्ही ठरविलें· आज मुक्कामास गांवांत न राहता, खेळण्याचे जागेनजीक कोठेतरी जाऊन गाडी सोडावी असा माझा बेत मी माझ्या बरोबरच्या माणसास सांगितला पण पाण्याचे सोयीला—नदीचे लगत्यास मुक्काम टाकावा असे त्यांचें म्हणणे पडलें. गांवापासून सरासरी एक मैलावर भीमेचा एक मोठा डोह असून, कडेला चांगलें प्रशस्त वाळवट होतें, तेथेंच जाऊन आम्ही तळ दिला. बैलास वैरण सोडून गडयानीं भाकरी सोडल्या आणि मीही थोडासा फराळ उरकून घेतला. थोडा वेळ आजच्या शिकारीबद्दलचा काथ्याकूट झाल्यावर, तेथेंच वाळवटावर घोंगडया पसरून ते झोपी गेले. आजच्या खेळाचा पुरा फजितवाडा उडाल्यामुळे, उद्यांचा दिवस तरी कसा जातो याची रुखरुख माझे मनास लागून राहिली होती. बराच वेळ झोंपेची आराधना केली पण झोंप काही येईना. साटीच्या एका पात्यास टेकून आणि दुसऱ्या पात्यावर पाय टाकून नदीच्या प्रशात पात्राकडे पहात मी बसलों.

गांवाचे बाजूनें येत असलेला ढोलाचा गंभीर आवाज कानांस मोठा गोड

लागत होता. रातपाळीला कंटाळून दूरवर कोठेतरी मोटेचें चाक कंपित स्वरानें कुरकुरत होतें. मधेच एकादी कुरणांतील मोराची केका माझ्या कानांवर पडत होती. मळेकऱ्याच्या पिकाचा फडशा पाडून, मालकास तशी सूचना देण्याकरितांच कीं काय, विजयश्रीनें कोल्हे ' कुई ' टाकीत होते. आणि ती ऐकून, आकाशाकडे तोंडे करून, शिवारांतील कुत्रीं उगाचच भुंकत होती आणि कांहीं रडतही होतीं.

तास दीड तास मी असाच बसलों असेन. इतक्यांत नदीच्या पात्रांत कांहींतरी तरंगतांना मला दिसलें. होडगें किंवा बोट म्हणावी तर तेथें कांहीं बोटक्लब नव्हता; किंवा स्वतःच्या बोटींतून जलविहार करण्याइतका शोकीन मनुष्य असल्या भिकार खेडयांत असणे सभवनीय नव्हतें. खेरीज, बोट म्हणावी तर तरंगता तरंगतां ती मध्येंच अदृश्य होई जपानची एकादी पाणबुडी, ब्रिटिश आरमाराचा डोळा चुकवून, आरबी समुद्रातून भीमेंत शिरली असावी म्हणावे, तों तेंही शक्य दिसत नव्हतें कारण, ब्रिटिश आरमाराची तयारी अलीकडे फार कडेकोट असल्याचें वाचून आणि ऐकूनही होतो

असला कांहीच प्रकार तेथे नव्हता. ती एक जुनाट, प्रचंड सुसर होती. दिवसाच्या कोलाहलांत, डोहांत दडी मारून पडावें लागत असल्यामुळें या निवांत वेळीं ती वाऱ्यावर निघाली होती.

एकवार अनवाणी पायांनीं, मी वाळवंटांतून शेरण्या होत्या तेथपर्यंत जाऊन आलों. माझ्या डोळ्यांचें पारणें फिटलें. ज्या नागरगांवकरांना मी यावत्कालपर्यंत मनांत शिव्या देत होतों, त्यांना आतां मी धन्यवाद दिले.

गाडीपाशीं येऊन घाईघाईनें मी बंदूक भरली. काडतुसांची माळ गळयांत घातली आणि मीं आपल्या माणसांस उठविलें 'मी बोलावीपर्यंत तुम्हीं जागचे हलूं नका ' म्हणून त्यांस बजाविलें, आणि त्यांच्यापैकीं एकाजवळच्या

चुन्याच्या डबीतून ओला चुना घेऊन, त्याची गोळी करून ती बंदुकीच्या माशीवर बसविली. शुद्ध चतुर्दशीचे शुभ्रधवल चांदणे होतें तरी, माशी स्पष्ट दिसावी म्हणून मी इतकी खबरदारी घेतली होती सुदैवानें चालून आलेला डाव व्यर्थ जाऊ नये म्हणून जितकी कासाविशी करिता येईल तितकी मी आपणांकडून करीत होतों यावेळी टॉर्चक्लॅम्प माझे बदुकीस नव्हता अनवाणी पायांनीच मी पुन्हा निघालों, आणि शेरण्याआड डोके किंचित् वर काढून त्या विक्राळ जनावराकडे टक लावून बसलों मोठमोठे काटे असलेल्या त्या निब्बर कातडीच्या जनावरावर गोळी लागू होईल किंवा नाही याची मला शकाच पडली ती चांगली नेटांत येऊं द्यावी म्हणून मी कितीतरी वेळ तिष्ठत उभा होतों. चाहूल घेत घेत, अत्यंत धिमेपणानें ती सरकत होती. नेटांत येतांच श्वास रोधून आणि तिचा जबडा वेधून मीं बदुकीचा घोडा ओढला. तों तिनें शेंपटी पाण्यावर जोरानें सबकून डुबी घेतली. खूप उंचावरून मुटका टाकावा त्याप्रमाणे पाणी हबकलें ती लागली याबद्दल मला शंकाच नव्हती; पण परिणामाची खात्री नव्हती. चांगली जरबली असल्यास पाण्यात ती दम काढणार नाही, हवेवर पडण्यास बघेल, असें मनांत येऊन मी तेथेंच वाळवटावर बसलों. पैलतीराचे बाजूनें उंचच उच डगर असल्यामुळें तिकडे आसरा घेण्यास तिला ठिकाण नव्हतें. माझ्या पायांखालचें वाळवंट चांगलें अर्धे पाऊण मैल लांबीचें होतें. मी जेथून आवाज टाकला तेथें ती निघणे शक्यच नव्हतें, म्हणून मी थोडा खाली जाऊन पुढें काय होतें, याची मार्गप्रतीक्षा करीत बसलों. कोंबडयानें पहिली साद टाकली, तरी पात्रांत कसलीही हालचाल दिसेना. आणखी थोडा वेळ जाऊं दिला. आतां मी एके जागीं न बसता शेरण्यांचे कडेकडेनें येरझारा घालूं लागलों. बराच वेळ झाल्यामुळें तिला आतां निर्धास्तपणा वाटून, शेरण्यांचे कडेकडेनें चाहूल घेत ती मंदपणें सरत होती ती इतक्या कडेला डोकें वर काढील

अशी मला कल्पना नसल्यामुळें माझी नजर पात्राचे मध्यावरच साधारणपणें होती. पण माझा कयास निखालस चुकीचा होता. अडचण जवळ करून, ती कोठेतरी हवेवर निघण्यास बघत होती पहांटेचा गार वारा अंगास झोंबत होता, तरीही ती माझ्या डावात येईपावेतों आणखी वाट पहाण्याचे मीं ठरविलें. जसजशी ती सरे तसतसा मीही आतल्या बाजूनें सरत होतो सरा-सरी दोन अडीच फर्लांगावर ती अर्धी आत आणि अर्धी बाहेर अशी किनाऱ्यास चिकटली. माझें सावज आता पूर्णपणें माझ्या आटोक्यात आले. दलदलींतून आणि दाट शेरण्यांतून मला जितके अंतर तोडता येईल तितकें तोडून मी तिच्या अगदी जवळ येऊन पोहोंचलो माशीवरचा चुना पडून गेला होता, आणि माझेंही पण त्यावाचून आतां अडलें नव्हतें. मी बंदुकीच्या नळीवरून एकदां हात फिरविला. घोडा उघडताना झालेला ' क्लिक ' असा आवाजही मला त्यावेळीं मोठा वाटला. पायानें दोहीं बाजूंच्या शेरण्या घट्ट चिखलात दाबून टाकल्या, आणि तात्काल तिच्या कानशिलावर मीं आवाज टाकला. एखाद्या मोठ्या मशीनच्या दोनचार चक्रांचे दांते एकदम करकरावेत, त्याप्रमाणें ती सुसर अती कर्कश्य आणि भेसूर ओरडली आणि साफ उपडी झाली ! शेरण्यांतून बाहेर पडून, जवळ जाऊन, मी तिला एकवार नीट निरखून पाहिलें. प्रवाहाचे कडेला जाऊन, चिखलानें भरलेले पाय स्वच्छ धुतले आणि गाडीकडे परतलों. मी आपल्या माणसांस आपली जागा न सोडण्याबद्दल ताकीद दिलेली होती पण पहांट झाली तरी मी जाग्यावर नाही असें पाहिल्यावर, आणि दुसरा आवाज कानांवर येतांच ते अर्ध्या वाळवंटात येऊन गुपचूपपणें मुद्या मारून बसले होते. मला पाहताच ते एकदम उठून उभे राहिले. आम्हीं सर्वजण त्या मरून पडलेल्या सुसरीकडे निघालों तें प्रचंड धूड पाहून ते, ' दिवसाची कसर रात्रीं निघाली, ' असे उद्गारले. दुसऱ्या दिवसाचा कार्यक्रम मी आतां रद्द करून टाकला. उजाडल्यावर चहा घेऊन आम्हीं निघण्याचे तयारींत होतों.

राघूनें बैलांच्या खांदावर जूं ठेविलें आणि जुपण्या गळ्यांत घातल्या. इतक्यांत बरेचसे वैदू आणि फांसेपारधी जमून आमचे गाडीजवळ आले. त्यांची पाले जवळच कोठे पडलेलीं होती, आणि दुपारीं आम्ही जनावरावर निघालों, तेव्हांपासूनच ते माझ्या हालचालीवर मोठया आशेनें नजर लावून होते. दुपारच्या खेळाचा निकाल त्यांस माहीत झाला होता; तरी रात्रीं झालेल्या पहिल्या आवाजानें त्यांचे तोंडास पाणी सुटल्यामुळें ते माझ्या पाठीवर होतेच. सुसर मारल्याचें त्यांस तत्काळ कळले, आणि कदाचित् ती आम्ही आमचे गांवीं नेऊं अशी त्यांची कल्पना झाल्यामुळें ते ती आपणास मिळावी म्हणून माझेकडे आले होते ती न्यावयाची झाली तरी तें मोठया जिकीरीचेच प्रकरण होतें, म्हणून फारसें ओढून न धरितां, त्यांस ती नेण्याची मी परवानगी दिली आणि तेथून कूच केले

नागरगांवचा शिवार संपताच, वाटेत आम्हास सहजासहजी एक काळा मिळाला. त्यास मागे खुटल्यास आडवा टांगून, पुन्हां आम्ही आमचा प्रवास सुरू केला.

सर्वांचींच मनें मोठी उल्हसित झाली होती. गांवांत हाळीस निघालेल्या एका मळेकऱ्यापासून विकत घेतलेली हिरवीं राताळीं, गाडीत बसल्या बसल्या, आम्हीं अनक्षुधपोटीच कडाकड फोडून खात होतो. शेतांनी भाकरी पोंचविण्यास गेलेल्या बिनकांसोटयाच्या आणि आपल्या हिरव्या लुगड्यास लाल रंगाची पुस्ती लाविलेल्या शेतकऱ्यांच्या बायका, आम्हांस पाहून डोक्यावरला पदर नाकापर्यंत ओढून घेत होत्या. घराच्या ओढीनें बैल पाऊल उचलून टाकीत असल्यामुळें, रस्त्यानें फुपाटा उडून राहिला होता. आणि बोर्डाचे मजूर रस्त्याच्या खांचखळग्यातून मुरमाऐवजी माती टाकतां टाकतां लो. बो. मेंबरांच्याही डोळ्यांत धूळ फेंकीत होते !

## वेळ सांगून येत नसते !

## १३

साडेपाच सहाचा सुमार झाला, आणि मी माझ्या कोटाच्या डाव्या खिशांत तीन पांच नंबरचीं काडतुसं अन् उजव्या खिशांत थोडयाशा विडया अन् काड्यांची पेटी टाकून व बंदूक घेऊन फाटकाबाहेर पडलों. लागोपाठ दोन तीन दिवस मला जवळपास ससे न मिळाल्यामुळं मीं आज जरा लांब जायचं ठरविलं, अन् 'जबरदंडा'कडे मोर्चा वळविला. वाटेंत शेरीच्या मळ्याजवळ ओढ्याच्याकडेच्या काटवणांत माझ्या चाहुलीनं एक ससा उठला. पण लगेच तो पुन्हा दाट झुडपांत शिरल्यामुळं मला त्यावर आवाज टाकण्यास फावलं नाहीं. झपाझप पावलं टाकीत मी दौंड सडकेपार झालों, अन् 'गोलांडी'ला वळसा घालून जबरदंडाच्या उतरणीवर येऊन पोहोंचलों. एका खिल्लाराचं मेंढरांचं खांड अजूनही तिथं रेंगाळत असल्यामुळं तिथं ससे

चरणावर निघण्याची आशा दिसेना, म्हणून मी तिथूनही सटकलों, अन् डोंगराचा एक लहानसा फाटा (पाटस) गांवाच्या रोखान जातो तो ओलांडून, जुन्या तलावाच्या पिछाडीच्या नितांत ओसाड अशा जगलात एका ओघळी-च्या कडेला सशाच्या पाळतीवर बसून राहिलो थोडयाच वेळांत सशाची एक जोडी चरणावर निघाली. त्यातला एक मी तत्काल पाडला. दुसऱ्यावरही तो धांवतपळत जात असतां आवाज टाकला, पण घाईघाईन टाकलेला तो आवाज खाली गेला आणि ससा सही सही शाबूत निघून गेला.

अंधेरी रात्र असल्यामुळ बिलकुल वेळ न गमावितां मारलेला तो ससा डाव्या हातात घेऊन ताबडतोब मी मळ्याकडे जाण्यास निघालों. डोंगराच्या पायथ्याशीं येतों तो बराच काळोख झाला होता. ठेचाळत ठेंचाळतच डोंगराचा अडसर चढून मी माथ्यावर येऊन पोहोंचलो. इतक्यात माझ्या आजूबाजूस कांहींतरी चमत्कारिक शब्द झाल्याप्रमाणं अन् कसली तरी चोरटी हालचाल होत असल्याप्रमाणं मला वाटल उगाच काहीं तरी मिथ्या आभास असेल असं समजून तसाच मी ती लहानशी खिड उतरून पुन्हा जबरदंडाच्या उतरणीला येऊन लागलों. तो डाव्या हातच्या खिळ्याआडून एकामागं एक चार पांच लाडगे अन् एक पिलंवाली लास (लांडग्याची मादी) माझ्या मार्गावर आडवी येऊन घोटाळू लागलेली नसल्या काळोखांतही मला स्पष्ट दिसलीं. तत्काल हातांतला ससा मीं खाली ठेवला. माझ्या खिशांत शिल्लक असलेल तें एकुलत एकच छर्‍यांचं काडतूस मी बंदुकींत भरलं, आणि कांहींएक विचार न करता मी तें त्या श्वापदांच्या रोखानं झाडलं. धांदरट-पणान, केवळ त्या श्वापदांना भेडसावण्याकरितांच टाकलेला तो आवाज. चारदोन छर्रे कदाचित् त्या श्वापदांस शिवले असतील नसतील ! पण त्याचा परिणाम मात्र विपरीत झाला. आता चाल करून येण्याच्या विचारानं ते पिसाळलेले प्राणी चहूं बाजूंनीं माझा मार्ग अडवून रोखून उभे राहिले. आणि

त्यातले काही तर त्वेषात्वेषाने मागल्या दोन्ही पायांनीं एकसारखी माती उकरू लागले माझ्या हातातल्या सशाच्या वासावर माझ्यामागं ते आले असतील अशा कल्पनेनं माझ्या हातांतला ससा मी त्याच्यांकडे जोरान भिरकावला पण निमिषार्धात त्याचा चट्टामट्टा करून ते पुनश्च माझ्यापुढं खडेखमूच्या खडेखमच ! तो अनपेक्षित प्रकार पाहून माझ्या अंगावर कांटाच उभा राहिला, अन् माझं सारं अग घामान डंवडवून गेलं काय कराव तें मला सुचेना यावेळीं एल्. जी. किंवा एस् जी काडतुसं मजजवळ शिल्लक असती तर मीं त्या सर्वांनाही पाणी पाजल असतं ! पण आतां त्या वाटण्याचा काय उपयोग ? मजजवळ तर बारीक छर्‍यांचंही एकादं काडतूस शिल्लक नव्हत !

कांहीतरी करायच म्हणून आतां मी खिशांतली काड्याची पेटी काढून भराभर काड्या ओढून त्या खोडील पण अक्कलमंद श्वापदाकडे फेकूं लागलों, त्याबरोबर ती अज्ञ श्वापदं किंचित् मागं मागं सरू लागलीं. मीं उसनं अवसान आणून कसातरी पावला पावलानं पुढं सरत होतों त्या श्वापदांच्या पिछाडीला एका ऐरणीजवळ एक बाभळीचं झाड माझ्या दृष्टीला दिसत होतं, तिथवर हरप्रयत्नानं त्याना हटवावं असा माझा इरादा होता. तें झाड जवळ करतां आलं तरच प्राण वाचण्याची कांहींतरी आशा मला वाटत होती. खरं सागावयचं म्हणजे, मनातून मी अगदी भिऊन गेलों होतों, तरी तसं मला बाहेर दाखविण्याची सोय नव्हती. जीवनाशेनं मीं वरकरणीं कां होईना, धैर्याचं सोंग आणल होतं. पण त्या सोंगामुळंच आज माझा निभाव लागला. एकदोन वेळां तर मी माझी बदूक दाणकन् खवाड्यावर आदळून त्यांजवर रोखल्यासारखी केली, आणि हातात दगड–डिखळं–जें कांहीं हातीं लागेल तें–खूप मोठ्यानं ओरडून त्यांजकडे फेकली केवळ देवाची खैर ! माझा आविर्भाव पाहून तीं भिकार श्वापद बरीचशीं मागं हटलीं. त्याबरोबर झपकन्

मी पुढं झालों, अन् माझा जीवनाधार असं तें बाभळीचं झाड माझ्या अगदीं पुढ्यांत आलं !

झाडावर चढून जाण्याकरितां मला अवश्य तो अवसर मिळण्यासाठीं आतां मी धिमेपणानं संधी शोधीत होतों. माझ्या हाताला येईल अशी एक आडवी फांदी मीं तेवढ्यातल्या तेवढ्यांत हेरून ठेवली. बंदूक पुन्हां खवाट्याला जोडून निमिषमात्र मी नेटानं तसाच उभा राहिलों होतों. उभ्या –उभ्याच माझ्या पायांतला चढाव मी काढून टाकला. झट्कन् त्यांच्या झेंपेच्या आवांक्याबाहेर मला चढून जावयास हवं होतं. मी निसटून जातों असं त्या दुष्ट श्वापदांच्या हेरीत आलं असतं, तर मजवर त्यांनीं एकदम हल्ला चढविण्यास कमी केल नसतं. मला किंचित् उसत मिळताच हातातली बंदूक मी त्या झाडाच्या बुडाशी उभी करून ठेवली, अन् डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोंच दोही हातांनीं त्या आडव्या फादीला लोंबकळून पाय वर घेतले.

मोठ्या हिकमतीनं घेरलेल सावज निसटून गेलेलं त्याच्या लक्षांत यावयाचाच काय तो अवकाश ! ते खवळलेले प्राणी, मशीन्‌गन्‌मधून गोळ्या सुटाव्यात त्याप्रमाणं मी चढलेल्या झाडाच्या बुध्यावर झेपावून धांवले, अन् तावातावानं नख्यांनीं त्या झाडाचा बुंधा खरवडूं लागले. माझी बदूक आतां खालीं मातींत लोळत पडली होती, आणि ती वखवखलेलीं श्वापदं मी असलेल्या झाडाभोंवतीं घिरट्या घालीत फिरत होतीं !

या वेळीं मला झालेल्या हर्षाचं यथार्थ वर्णन माझी लेखणी करू शकत नाहीं. कोरपलेल्या शाळूच्या शेतावर ऐनवेळीं पाऊस पडावा त्याप्रमाणं मला आनंद झाला जीव बचावल्याचा आनंद होता तो ! पण तो माझा आनंद केवळ क्षणभंगुर ठरला. मी चढून गेलेल्या झाडावर काळे चावके डोंगळे होते. ते आतां माझ्या हातांपायांना डसूं लागले, अन् त्यामुळं माझ्या आनंदांत विरजण पडल्यासारखं झालं. त्या मुंगळ्यांचं अन् त्या लांडग्यांचं जणूं

संगनमत झाल्याप्रमाण, ते क्षुद्र प्राणी मला झाडावरून पुनरपि त्या लांडग्यांच्या तावडींत ढकलूं पहात होते असं मला भासलं. अंगावरले मुंगळे तोडून काढतां काढतां माझा जीव हैराण होऊन गेला. शेवटीं अंगांतला कोट काढून मी त्याचा अक्षरश. बोळा बनविला, अन् त्यानं त्या फांदीवरले मुंगळे झाडून काढू लागलों कट्टया वैऱ्याला कल्पनेनंही कुणीं चिंतणार नाही, असला खडतर प्रसंग यावेळीं मी प्रत्यक्ष अनुभवीत होतों बंदूक जवळ असली म्हणजे दिनदुनिया माझ्या खात्रीत नसे पण मजजवळची बंदूक या घटकेला झाडाच्या बुंध्याशी मातीत लोळत पडली होती, अन् मी झाडावर बहिरी ससाण्याच्या भीतीनं साळुंकी अथवा पख्याची चिमणी छपून बसते, त्याप्रमाणे लाचार होऊन बसलो होतों !

तासांमागून तास चालले होते. रात्र अमावास्येची होती. आकाशांत असख्य चांदण्या चमकत होत्या सारी दुनिया चिडीचीप् झाली होती, अन् मी मात्र एखाद्या ब्रह्मसमंधाप्रमाणं स्वत.चंच अंग ओरबाडीत त्या काळ्याकुट्ट अंधारांत कुठतरीच डोळे फाडफाडून बघत होतों. वाऱ्याच्या गार लहरी अंगाला झोंबत होत्या, अन् बाभळीच्या फुलांचा उग्र दर्प माझ्या मस्तकांत एकसारखा भरत होता उजाडतं केव्हां अन् या मुंगळ्यांच्या काचांतून मी सहीसलामत सुटतो केव्हां असं मला झालं होतं. एकवार रांगड्या हडेलहप्पी पोलिसाची लाठी पुरवली, पण सी. आय. डी. च्या दूताची ती नाजुक बारीक चवकशी नको, असं जसं केव्हां केव्हां माणसाला होतं, तसं या मुंगळ्यांपेक्षां ते द्वाड लांडगेच बरे असं म्हणण्याची पाळी मजवर आली होती !

असाच आणखी किती तरी वेळ निघून गेला. आतां झुंजमुंजू व्हावयाचा सुमार झाला होता. कुठल्या तरी वसतीवरल्या कोंबड्याची बापुडवाणी कारुणिक साद माझ्या कानांवर आली, अन् त्याबरोबरच माझ्या गळाठलेल्या मनास थोडा हुरूप आला. पायांना आलेल्या मुंग्या ( मुंगळे नव्हेत ! )

घालविण्याकरिता मी आळीपाळीन एकेक पाय झाडाच्या फांदीवर आपटीत बसलों होतो, इतक्यांत चारणीस आलेल्या कुणाच्या तरी बैलांच्या गळ्यांतल्या घुगरांचा मजुळ किणिकिणि आवाज जवळ जवळ येत असल्याचा मला भास झाला. त्या आवाजाचा कानोसा घेत चातकाप्रमाणं मी कुणाचीतरी वाट पहात बसलो होतों, तोंच बैलांना उद्देशून कुणीतरी हंसडलेली एक फर्मास गाळी माझ्या कानांवर पडली. माझ्यान ओरडवेल इतक्या मोठ्यानं ओरडून मी त्या गाळी देणाऱ्या अज्ञात व्यक्तीस पाचारिलं. इतक्यांत, सारी रात्र माझा पिच्छा पुरविलेल्या त्या नतद्रष्ट बुभुक्षित श्वापदांनीही तिथून काढता पाय घेतला ! त्या श्वापदांनीं काळ केल्याची खातरजमा होतांच तत्काल मी झाडावरून उतरलों–नव्हे–उडी घेतली. इतक्यांत गोधडी लपेटून घेतलेली ती अज्ञात व्यक्तीही माझ्यासमोर येऊन उभी राहिली. मी नीट न्याहाळून त्या व्यक्तीकडे पाहिलं, अन् त्याचवेळीं ती व्यक्ति म्हणजे मला चागली परिचित असलेला, 'दसऱ्या रामोशी' हाच असल्याचं मला कळून आल. तोंडाचा आ वासून विस्मयचकित मुद्रेन मजकडे बघतच तो तटस्थ उभा राहिला होता. रात्रभर मातींत लोळत पडलेली माझी बंदूक मी उचलून घेतली, अन् दसऱ्याला चागला गदगदा घुसळून त्याला त्याच्या नांवान हाक मारली, तेव्हांच कुठं त्याची तद्री उतरली अन् "जी, इकुत्या झुंजुरक्का तुमी हथं कशाला आला व्हता !" म्हणून त्यानं मला प्रश्न केला. रात्रीं घडलेली इत्थंभूत हकीगत मीं त्याला सुनावली, अन् माझ्या मळ्यापर्यंत पायी जाण्याचं त्राण मला आता नसल्यामुळ, 'माझ्या मळ्यांत जाऊन लवकर गाडी घेऊन ये,' म्हणूनही त्याला सागितलं. "चला माझ्यासग ! त्या खिळ्याच्या पडथाल माझी कोपी हाय तिथं वाइच टेका. माझ्या कोपीपासून एका हाकवरच बाबाजी महाराची वसती हाये, तथनं मी गाडी आनतों आन् तुमास तुमच्या मळ्यामंधी पावतं करतों," असं म्हणून तो आपली बैलांची

जोडी पुढं घालून निघाला. त्याच्याबरोबर मीही त्याच्या कोपीवर येऊन दाखल झालों. कोपीतून एक फाटक तरट आणून त्यानं कोपीपुढ अंथरल. त्यावर बैठक मारून अस्मादिकांची स्वारी बसली, अन् तो आपली बैलांची जोडी घेऊन बाबाजीच्या वसतीवर गाडी आणण्यासाठी चालता झाला. गारठ्यामुळ माझ सर्वांग अजूनही थरथर कापत होतं. विडी ओढावी असं मला वाटलं, म्हणून मी माझ्या कोटाच्या खिशांत हात घातला पण माझ्या खिशांतल्या विड्याच अक्षरशः ' वर्तकी तपकिरीत ' रूपांतर झालेलं होतं ! दसऱ्याची अस्तुरी कोपीत दळण दळीत बसली होती. तिला मी बाहेर बोलावून घेतली. दसऱ्या विड्या ओढतो हें मला ठाऊक असल्यामुळं, दसऱ्याच्या सामानासुमानांत कुठं एकाद्दुसरी बिडी असल्यास घेऊन ये, म्हणून मी तिला म्हटल. मी अस म्हणतांच, तिनं एका गाडग्यातून पाचसहा विड्या अन् काड्याची पेटी काढून आणून मजपुढं ठेवली. एकामागं एक मी दोन तीन विड्या फुंकून टाकल्या. एवढ्यात दसऱ्याही गाडी भरधांव फेंकीत कोपीपाशीं येऊन दाखल झाला अन् आम्ही ताबडतोब मळ्याच्या वाटेला लागलों.

सथपणानं गाडी मळ्याच्या रस्त्यानं चालली होती. रात्रभर शिणून गेल्यामुळ मला बोलण्याचा कसा तो बिलकुल उत्साह राहिलेला नव्हता, पण, दसऱ्याचं तोंड मात्र रेडिओंतल्या संभाषणाप्रमाणं सारख चाललेलं होतं " दोन वर्सांपूर्वी, कान्हाटीच्या रानांत आमचा योक गडी, रातचा या वंगाळ जित्राबानीं ( लांडग्यांनीं ) मोठ्या गफलतीनं मारल्याची " हकीकत त्यानं मला एकाद्या सुरस दंतकथेप्रमाणं सांगितली, आणि " कुनाला तरी सांगातीं घेतल्याबिगार रानात चलत जाऊं नका अन् गडाद् पडायच्या वाढूळ आधींच घराकडं परतावं. आजच्या परमानं आक्रीत व्राज उठून घडत नाय ह्ये खरं, पुन सापाकिरडांचं भ्या आपल्या रानांत लई, अन् त्यांचा वाऱ्यावर पडण्याचा वखतबी तिनूसांजांचाच म्हनूनशान् म्हनतों,

गडद् पडायच्या आंत–येरवाळीच–घरी यावं ह्ये बेश येळ कांही सांगून येत नसते ! ”

## विषय तोच पण प्रसंग वेगळा. १४

तें सबंध साल सर्वांनाच मोठ कठीण गेल शेतकरी अर्धपोटी दिवस काढीत होते, शेतीच्या जनावराना बाजारात घार खात नव्हती, अन् शेरड करड, ढोरांबैलाचा भाव खाऊन बसलीं होती

पाटसात रामोशांचा भरणा मोठा मिळाल्यास मोलमजुरी करावी, नाही तर खांद्यांवर वाघरी टाकून, दिवसभर ससे धुंडाळीत वणावणां डोंगरांअड-सरांनीं फिरावं हा त्यांचा नित्याचाच व्यवसाय बनून गेला होता. रानावनांत भटकतां भटकतां पुष्कळ वेळां हरणं त्याच्या नजरेस पडत, केव्हां केव्हां त्यांच्या वर्दळीन डुकरंही उठत, पण त्याना मारण्याचं कोणतंच साधन हाती नसल्यामुळं त्यांचा निरुपाय होई.

कांहीं दिवस वऱ्हाडांत अन् तिथून गोविंदगड वगैरे ठिकाणीं जाऊन

जवळजवळ दीड महिन्यानं आज मी पाटसास परतलों होतों. माझ्या पश्चात् रानांत मला घेऊन जाण्याच्या इराद्यान ते बिचारे माझ्या मळ्यांत नेहमीं खेटे घालीत, अन् अद्याप मी आलेला नाहीं अस कळल्यामुळं मग निराश मनानं माघारे फिरत. आज इथं मी आल्याच त्यांना कळलं मात्र. धाधावल्या-प्रमाणं रामोशांच तें टोळकं माझ्या मळ्यांत येऊन हजर झालं रात्र बरीच झालेली होती. जेवण उरकून मी बाहेर वाऱ्यावर येऊन बसलों होतों. मला बाहेरच बसलेला पाहून मोठ्या प्रेमभरानं त्या टोळक्यांतल्या प्रत्येक रामोशानं मला रामराम घातला, अन् मग ते सारे मी बसलेल्या झोंपाळ्या-भोंवती गराडा घालून घरच्याप्रमाण खुलास मनानं मजबरोबर गोष्टी करीत बसले. "लई दिसांत तात्या, कसलीबी सागुती खाया गवसली न्हाई. हातपाय कस गळाल्यावानी झाल्यात सांज–सकाळ भिरीं भिरी फिरावं त्यन्हां कुठं योक–अर्धा ससा वाघरीमंधी गवासतो, पर इकत्या गब्यांमंधीं त्यो कुनाकुनाच्या म्हून वाट्याला येनार? वंगाळ जिणं आमा रामुशाचं! धा–बारा वर्स झालीं, आच्या रामुसवाड्यांत तोड्याची योकच बंदूक व्हती. तीबी सरकारानं आमा रामुशापाशीं राहूं दिली न्हाई. सरकारला वाटतं, ह्ये ल्येकाचं दरावडं घालत्याल. पर दरवडं घालनारांना बंदुकांची कुठं तुटार पडलीया? बिगरदऱ्यांत आमाला लई वक्तां भारी भारी जनावरं (रानडुकरं) उठलीं. तुमीबी हथं नव्हतां. जीव आक्षी लई चुटपुटला पघा. पर करनार काय? आतां चला योकदां आमासंगं रानांत. बिगरदरा आन् कुशागावची खिंड इकूत्याच परवरांत जनावर कायम गवसत्याल."

त्यांचं बोलणं अवधानपूर्वक मी एकत होतों. आपल्या पारतंत्र्याची जाणीव त्या अडाणी लोकांना नसली, अथवा असूनही त्याना ती व्यक्त करतां येत नसली, तरी आपल्या निःशस्त्र जिण्याची निःसंशय त्यांना खंती वाटत होती. सहवासामुळं माझं मन त्यांच्या भावनांशीं कधीं कधीं एकरूप

होऊन जाई, तसंच या घटकेला माझं झालं होत, त्यामुळ त्यांच्या चित्ताची या वेळची ऊर्मी पूर्णपणें मला कळून चुकली

"चार-दोन दिवस मला थोडी विश्रांति घेऊं द्या. बरेच दिवस मी इथ नसल्यामुळ मला बाकीची हालहवालही बघावयास हवी. जरूरीचीं कामंधाम एकदां उरकतों अन् मग तुमच्याबरोबर म्हणाल तितके दिवस रानांत येतों पण मला वाटत, एकादा पाऊस होऊं द्यावा अन् मग रानांत निघावं तें आपल्या फायद्याचं होईल नेमकी तीं जनावरं आपण जाग्यावर गांठू उगाच चांचपडत फिरायला नको. आताशा खूप आभाळ निघत आहे, लवकरच तें उतरल्याशिवाय राहणार नाही कसं काय वाटतं तुम्हांला?"

निमिषमात्र त्यांचे डोळे परस्परांच्या डोळ्यांशी भिडले अन् नतर सगळ्यांनीं माझ्या म्हणण्याला एकमतान मान्यता दिली.

'वाइच बुरंगाट झाल्यावर येतों तुमांस सूचना करायला' अस म्हणून गांवाकड जावयासाठी ते उठले, अन् मला पुन्हां एकवार रामराम घालून उल्लसित चित्तान ते गांवाकडं चालते झाले

   

जवळ जवळ एक आठवडा मी स्वस्थ घरी बसून काढला शेतामळ्यांचीं कामधामं यथापूर्व चालूंच होतीं. कुठं तरी फिरून यावं, असं वाटल्यामुळं सकाळीं लवकरच उठून मी कवठीच्या आळ्याकडं एखादा ससा मिळाला तर पहावा म्हणून गेलो होतों क्षणभर बसल्यावर चरणावर एक ससा मिळाला तो घेऊन मी परत फिरलों तों, शाळूच्या ढाशीवर चाललेला चालता नांगर उभा करून त्याचे दोघंही गडी माझ्याजवळ आले, अन् 'तात्या, तुमचीं गडीमानसं आन कुत्रींबी सागुती खाऊनशान् कटाळल्या-वानी झाल्याती, पन आमाला द्या कीं योकांदा ससा एकांद्या वक्तीं,' असं

मला मोठ्या काकुळतीनं म्हणाले. तत्काळ हातातला ससा मीं त्यांच्या स्वाधीन केला, अन् आणीकही कधी तरी मी तुम्हांला एकाददुसरा ससा मारून देईन असं त्याना सांगून मी मळ्याकडे निघालों.

   

पाच साडेपाचचा सुमार झाला होता. सडसडून पाऊस पडून जाऊन आभाळ आता उजळल होत अन् दिशा स्वच्छ झाल्या होत्या. आपली एअरगन् घेऊन मुलं अगणांत खेळत होती मी आपली राय्फल अन् बदूक स्वच्छ करीत पडवीत बसलो होतों एवढ्यात कशाला तरी बुजून, तबेल्यात ठाणावर बाधलेल्या माझ्या घोड्यान दुगाण्या झाडून पिछाडीच्या दोन लाकडी आडवटांपैकीं वरलं आडवट काड्कन् मोडल्याचा अन् नंतर खालच्या जाड तक्त्यावर जोरानं टापा आदळल्याचा आवाज माझ्या कानावर आला घाई-घाईनं उठून पडवीच्या दारांत मी येऊन पहातो तो, मुल घाबऱ्या घाबऱ्या फाटकाबाहेर धांवत जात असलेली माझ्या नजरेस पडली. काय भानगड आहे ती पहावी म्हणून मी तबेल्यापाशी आलों. घोड्याचे दोन्ही पायबंद तुटून पडले होते अन् त्याच्या मागल्या दोन्ही पायाच्या मुठी रक्तबबाळ होऊन गेल्या होत्या. त्याचं थयमान अजून चालूंच होतं. इतक्यांत पलीकडल्या गोठ्यांत असलेले माझे दोघे गडीही तिथं येऊन दाखल झाले. त्यांच्यापाशीं विचारपूस करतां ते कांहींच बोलेनात. चुचकारीत चुचकारीत हलकेच मी घोड्यापाशीं गेलों अन् निरखून पाहूं लागलो तो, त्याच्या उजव्या कुशीवर रक्ताचा एक ठिपका माझ्या नजरेस पडला. हळुवार हातानं मी तो रक्ताचा बिंदू पुसून घेतला, त्याबरोबर एकदर प्रकार माझ्या ध्यानात येऊन चुकला ताबडतोब एका गड्याला मी मुलाना कुठं आहेत ती बघून घेऊन येण्याला सांगितलं. माझ्या सांगण्याप्रमाणं तो गडी मुलांना घेऊन आला. माझा एक

गडी राघू, जवळच रहात होता त्याच्या घरात जाऊन त्याची आई भाकरी टाकीत बसली होती तिच्याभोंवतीं तीं गुपचूप बसून राहिलीं होतीं. माझ्याजवळ आल्यावर एखाद्या चोराप्रमाण खाली माना घालून तीं सगळीजणं उभी राहिली. 'घोड्याच्या पोटावर छर्रा कुणी झाडला? बदूक कुठं आहे?' म्हणून मी त्यांना विचारल, पण एकजण बोलेल तर शपथ. संतापानं मी सायडलमधला हॉर्सव्हिप उपसला त्याबरोबर 'अण्णान, अण्णान,' अस सारीजणं एकदम उद्गारली. माराच्या भीतीन तीं थरथरा कापत होती. आपल्या भावाला मार बसूं नये म्हणून प्रथम तीं त्याचं नांव सागेनात. त्या क्रोधावश अवस्थेतही त्याच्या त्या मनःस्थितीची जाणीव मला झाल्यावांचून राहिली नाही एकाच्या अपराधासाठी सगळ्यांनीं शिक्षा भोगण्याइतकी त्यागबुद्धि त्या लहान मुलाच्या ठिकाणी मायेमुळं उद्भवलेली पाहून मनातल्या मनात मी विरमून गेलो माझ्या हातातला व्हिप् मी दूर भिरकावून दिला थोडस दरडावून त्याना घरात जावयाला सागितल, अन् घरातून चिमटा आणून घोड्याच्या कुशीत रुतून बसलेला तो बारीक छर्रा मी अल्लाद उपसून घेतला. पायांच्या मुठी स्वच्छ धुवून काढून त्यावर अन् त्या छर्र्याच्या जखमेन आयडोफॉर्मची बुकटी बसवून त्याच्या पायांना मी बॅन्डेज गुंडाळीत होतो, तों नाईक मंडळी ( रामोशी ) माझ्यापुढं दत्त म्हणून हजर!

'आलों इकाडला ब्येत बघाया. तुमच्या आमन परमानं पाऊसबी झालाया. आतां कव्हा चलतां रानांत?'

'कसचा बेत बघतां डोंबलाचा! हा बघा कीं बेत पाऊस झाल्यावर तुम्हाला कुठला दम निघायला? तुमच्याच तजविजीत होतों मी. त्या बंदुका बघा पडवींत अजून तशाच पडल्या आहेत. पुसता पुसतां मध्येंच हें नसतं विघ्न येऊन उभं राहिल,' मी —

'कसलं इम्र ?'

आपली शिकार राहिली तिकडं बिगरदऱ्यांत. पण आमच्या दिवट्या चिरंजीवानीं घरच्या घरींच माझ्या घोड्याची शिकार करायची वेळ आणली होती की आज. हा पहा छर्रा त्याच्या कुशीतून मीं इतक्यांतच उपसून काढला,' असं म्हणून मी त्याना घडलेली हकीगत सांगितली.

'प्वाराची जात !' इतकच म्हणून एकमेकांकडे बघत ते हंसू लागले.

बॅन्डेज बाधून जिथल्या तिथं सगळ ठीकठाक झाल्यावर त्या मडळीना घेऊन मी पडवीतच जाऊन बसलो. बंदुका पुसतां पुसतां एकीकडं मी त्यांच्याशीं गोष्टी करीत होतों. उद्यांच रानांत निघावं असं त्या मंडळीचं म्हणण पडलं. पण उद्याचा दिवस जाऊ द्या, चिखल जरा हडकल्यावर परवां जाऊं असं मी त्यांना म्हणालों. 'हाय कुठं चिखुल तिकडं डोगर माळाला, पर तुम्ही म्हनत असाल तर परवांचा ब्येत करू,' ते म्हणाले

अखेर परवांचा बेत कायम झाला. 'पहांटे लवकरच उठून तुम्हीं नागेश्वराच्या देवळापाशी तयार रहा. तुमची जमाजम होते एवढ्यांत मी तिथच तुम्हांला येऊन मिळतों. माणसाला माणूस दिसतं न दिसतं अशांतच आपण निघूं,' मी त्याना म्हणालों. जातांना त्यांना मी वाघरा व भालेही घेऊन चलण्यास सांगितलं एका अंगाला वाघरा देऊन दुसऱ्या बाजूच्या बारीवर आपण रहावं असा माझा बेत होता. खेळण्यापेक्षां सागुतीसाठींच तुर्तातुर्त ते खंतावले आहेत हे मी समजून होतों, अन् म्हणूनच मी अशी योजना केली होती.

   

तांबडं फुटायला अजून बराच अवकाश होता. फराळाचा डबा, पाणेरं अन् बंदूक गड्याजवळ देऊन अधारांतच आम्ही गांवाकड जाण्यासाठीं निघालों.

नागेश्वराच्या देवळाशीं येतों तों सगळे गडी जमून माझी वाट पहात बसले होते. तावडतोब आम्ही बिगरदऱ्याकड कूच केलं नव तळ ओलांडून आम्ही जरासे पुढें येतों तों चागलं फटफटावयास लागल होतं. वाटेंत वाइगीच्या ओढ्याजवळ आम्हाला एक चिनकारा ( माळठिसक्या हरणाच्या जातीचा नर ) आढळला. त्यावर एक बकूशॉट् टाकून मी त्याला ठार केला अन् त्याला गांवाकड रवाना करून देऊन आम्ही तसेच पुढं निघालों. थोड्याच वेळात आम्हीं बिगरदऱ्यापाशी येऊन पोहोंचलों बिगरदऱ्याच्या बगाटाबगाटा-नच दोनतीन वळसे घेऊन सुप्याचा घाट जातो. घाटाच्या डाव्या बाजूस असलेल्या उंच पठारावर 'चोरचुब्यापाशी' आम्हीं तुमची वाट पहात बसतो, अस सांगून आम्ही गडी चहूं दिशानीं मागावर सोडले अन् बाकीच्या गड्यांसह घाट चढू लागलों

पठाराचा शिखरमाथा दिमू लागतांच घाटरस्ता ओलांडून आम्ही चढण चढावयास सुरुवात केली अन् अर्ध्याएक कलाकानं आमच्या खुणेच्या ठिकाणीं येऊन पोहोंचलों गड्यानीं खांद्यांवरून शिंकाळून आणलेल्या वाघरी खालीं कातळावर टाकल्या, अन् हुश्श हुश्श करीत ते तिथल्या प्रचंड लिंबाच्या छायेला विसांवा घेत बसले सडकून भूक लागल्यामुळं मीही थोडीशी पोटाची भर केली अन् मग आम्ही सारेजण विडया फुंकीत जना-वरांची वर्दी येण्याची वाट पहात बसलों.

दोन कासरे दिवस चढून आला, पण अद्याप जनावरांची वर्दी घेऊन कुणीही येईना. नुसतं बसून रहाण्यापेक्षा पठाराच्या आग्नेयीस रोटदऱ्याच्या बाजूला गडी मागावर गेले होते, त्यांच्या पाठीवर एक गडी बरोबर घेऊन मी निघालों. पठाराची सपाटी संपून एका अडसराची नागमोडी वरंगळ सुरू झाली होती. एकदोन वळणं घेऊन आम्ही एका प्रचंड शिलाखंडापाशीं आलों तों, त्या शिलाखंडाआडून कुणातरी माणसांची वलवल आमच्या कानीं आली.

थोडे पुढें होऊन पहातों तों, माग पाहण्यासाठीं म्हणून या बाजूस आलेले आमचे गडी एका झाडाच्या सांवलीला खुशाल जुव्वा खेळत बसले आहेत ! आम्हांला अवचित तिथं आलेले पाहून ते तिघही गडी गांगरल्यासारखे झाले. जमिनीवर अस्ताव्यस्त पसरलेले पत्ते गोळा करतां करतां, 'इकाडली दरोबस्त खोपाड आम्ही चाळलीं, पर जनावराचा मागमुद्या लागना त्यव्हा टेकलो दम घ्याया वाईच इथ,' अशी चाचरत चाचरतच त्यानी आपल्या वर्ननाची संपादणी केली.

   

एका शब्दानंही त्याना कांही न म्हणता त्याच पावली मी तिथून परत फिरलों. त्या बेजबाबदार इसमांची मला इतकी चिरड येऊन गेली की, खेळ टाकून मळ्याकड चालतं व्हाव असही एकवार मला वाटल. ज्यांच्यासाठी पदराला खार लावून घेऊन मी स्वत चा देह उन्हातान्हात सुकवीत होतो, त्याना मी करीत असलेल्या त्यागाची कितीकशी मातब्बरी वाटत होती हें कळून आल्यामुळं माझ चित्त उद्विग्न होऊन गेलं. माझ्या हातातली बंदूक मीं त्या वाघरीच्या ढिगाऱ्यावर फेकून दिली, अन् शून्य मनानं त्या झाडाच्या खोडाशी बसून राहिलों.

माझ्याबरोबर आलेल्या गड्यानं तिथ असलेल्या बाकीच्या गड्यांना त्या पोराची ती कारवाई सांगितली. आमच्या पाठोपाठच तीं पोर तिथ येऊन बसली होती त्या गड्यांनी प्रथम त्या पोराची 'न भूतो न भविष्यति' हजेरी घेतली अन् मग माझ्याजवळ येऊन, "तात्या, तुम्ही आपल्या मनाला कां इनाकारन लावूनशान् घेता ? ...... या पायीच आमची रामुशाची मानसं तटातट् आनपान्यावाचून मरत्यात्, पर गाव सोडून कुठ मुलखावर जात न्हाइता. हीच पोरं बघानात कां ! प्वाट भराया ममईला गेल्याला

पुरतं वरीसबी नाय् झालं त्याना, पर निसता चवचालपना तथनं शिकूनशान् आल्यात दुवक्ता चाय् लागू लागलाय त्यांना. टकुऱ्यावर रेशमी मदील आन् आगात मलमलीच कुडतं, आन् त्याच्याबी आतनं गंजीफरास असल्या-बिगार व्हईनासं झालय त्याना याच्या बानं कंधी अंगाला आन् कपड्याला साबून लावला व्हता व्हय ! हिंगाणबेटाला काय दुकाळ पडलाया रानात. पर हिंगाणबेट आनाया फिराव कुनी ? वान्याच्या दुकानांतनं सायतानशी साबून आनत्यात, आन् बसत्यात लई वाढूळच कपडं धुईत तिकिट काढाया पगाराच पैसं शिलाक नव्हतं त्याच्यापाशी, त्यव्हा रोहिल्याच पैसं काढूनशान् आल्याती इकडं गावाकड ! आन् आता जातावक्तीबी आयाबहिनींनी म्वाल-मंजुरी करूनशान् गाठीला ठिवलेल्या पैशासाठी घरातल्या उतराडी उतरत्याल ही खेदान ! चैनीला चटावलेली ही पोर पहिल्यावानी आतां रानच्या कामाला कणाद काढित्यात म्हनता व्हय, कशाला नांव घेता" !

त्याच्या कृतगळपणाच्या कार्यकारणभावाची त्या गड्यानीं केलेली ही लावलचक मीमासा मला पटली, अन् आता मी त्या विषयाचा विचारच करण्याच सोडून दिलं.

   

ऐन बाराचा सुमार झाला होता. मागावर गेलेल्या गड्याचा ठावठिकाणा काही लागतो की काय हें पहाण्यासाठी गड्याना मी पठाराभोवती एक चक्कर टाकून या म्हणून सागितलं थोड्याच वेळात ते गडी अन् कुशागाव रस्त्याच्या अंगानं मागावर गेलेले गडी रोटदऱ्याच्या बाजूनं सपाट्यानं येत असलेले माझ्या दृष्टीस पडले. त्यांच्या उल्लसित दिसत असलेल्या चेहेऱ्या-वरून त्यांनीं काहींतरी आशादायक खबर आणिली असावी असा मनाशीं मीं तर्क बांधला.

माझ्याजवळ येतांच, “ खुद रोट दऱ्यांतल्या योका मोठ्या आळ्यात योक खांडवाच्या खांडवा आक्षी बिनघोर पडून हाये. आम्हीं दोन दोन येळां आळ्याला येढं टाकूनशान् माग सोडवल्यात, ” अशी वर्दी त्यांनीं मला दिली.

‘ पण कुशागावच्या बाजूला गेलेले तुम्ही लोक तिकडंच मार्गाचा तपास करायचा सोडून रोटदऱ्याकडं कसे झुकलां ? रोटदऱ्याकडं पाठविलेली हीं पोरं तर त्या बाजूला मागाबिगाचा काही तपास लागेना म्हणून केव्हाच परत फिरली ! ’

‘ ही ममईवाली पोर व्हय, जमला व्येत ’ !

आपल्याच जातवाल्यांनीं केलेली आपली ही संभावना पाहून ती पोरं अगदी काळी ठिक्कर पडून गेलीं. त्या गडयाच्या नजरेला नजरही न देतां त्यांनीं तिथून हळूंच काढता पाय घेतला.

‘ कुशागाव वाटेकडं आम्ही माग धरूनच निघालों व्हतों. पर त्येच माग दुसून माघारं फिरलेलं दिसलं. माग कस अगदी वलं कचकचीत ! थेट रोटदऱ्यांत आनूनशान घालवलं माग काय तसं म्होटं टपकाळ नायता, पर खांडवा लई म्होटा.

   

माग पहाण्यासाठी पांगलेल्या गडयाना शक्य तर पालवून बोलवून घेण्याकरितां मी त्या त्या बाजूला माणसं रवाना केली, अन् वाघरा वगैरे सर्व सरंजाम रोटदऱ्याकडं रवाना करून दिला.

सगळ्यांची जमाजम होतां होता सावल्या उगवत बाजूकडे बऱ्याच कलल्या होत्या. आमचे कांहीं गडी लांबवर झुकले होते, पण त्यांची वाट पहात न बसतां आम्ही तावडतोब रोटदऱ्याकडं निघालों. थोडयाच वेळांत

आम्हीं त्या जनावरं असलेल्या आळ्यापाशीं येऊन दाखल झालों. मी जातीनं एकदा त्या आळ्याभोंवतीं वेढा टाकून आलों, अन् जनावरं आंत कायम असल्याची खात्री होताच पूर्वेच्या बाजूनं गड्याना वाघरा द्यावयास सांगितल्या.

गड्यांनीं वाघरा जिथल्या तिथं दिल्यावर वाघरींच्या दोहीं अंगाला झाडझडोरा तोडून आणून लहानसा आडोसा तयार केला, अन् त्याच्या आड चांगले वाकबगार गडी भाल्यानिशीं सज्य ठेविले वाघरींवर श्वापदं मोडून घालविण्यासाठीं एका ढापाआड कांहीं माणस जय्यत ठेविलीं, अन् मग मावळतीकडच्या एका मोक्याच्या बाऱ्यावर मी स्वतः जाऊन उभा राहिलों.

गडी आळ्यांत शिरून हांका टाकू लागल्याला पांच मिनिटंही पुरतीं लोटलीं नव्हती. तोंच आळ्यांतलीं श्वापदं एकाएकीं पूर्व बाजूच्या बारीवाटं बाहेर भडाडली. समोरच्या वाघरांना बगल देऊन तो खांडवा थोडासा पुढें निघतो तोंच, इतका वेळ ढापाआड दडून बसलेले गडी आरडाओरड करीत पुढें झाले अन् त्यांचा मार्ग रोखून उभे राहिले. गड्यांचा तो ताफाच्या ताफा पुढं आडवा आलेला पाहून तो डुकरांचा खांडवा बेहाय गांगरून गेला. त्या खांडव्यांतली एक मोठी डाडर अन् तिचीं दोन तीन बांडगीं माघारी फिरून पुन्हां त्याच आळ्यांत शिरलीं, अन् बाकीचीं सारींच्या सारीं डुकरं धडाधड आम्हीं दिलेल्या त्या तिन्हीं वाघरींवर जाऊन पडलीं. तत्काल वाघरा पडल्या, अन् गड्यांच्या हातांतले भाले भसाभस त्या श्वापदांच्या काळजांतून घुसले.

त्या खांडव्यांतून फुटून माघारीं फिरलेलीं तीं श्वापदं आळ्यांत शिरल्यावर बराच वेळ आंतल्याआंत वेढे घालीत फिरत राहिलीं. पण तिथंहि त्यांना दम निघेनासा झाल्यामुळें मी उभा असलेल्या बारीवाटं तीं पुन्हा बाहेर पडलीं.

त्यांतली दोन माझ्या बंदुकीतून सुटलेल्या गोळ्यांना बळी पडली अन् दोन बिगरदऱ्याच्या घाटाकडं वेगानं निघून गेलीं.

   

वाघरी दिलेल्या बाजूची काय हालहवाल आहे ती पहावयासाठी मी आता तिकडे निघालों. भाले देतांना झालेल्या त्या श्वापदांच्या कर्णकर्कश कोलाहलावरून परिणामाच्या भीषणतर स्वरूपाविषयीं थोडाफार अदाज मीं बांधलाच होता. आळ्याला वळसा घालून थेट वाघरा दिलेल्या जागी जाऊन मी उभा राहिलों. तिथ भरलेला मूर्तिमंत ‘ यमाचा दरबार ’ पाहिल्यावर मला एक प्रकारची चिळसच आली. “ आता पुढलं तुमचं तुम्ही पाहून घ्या, ” असं त्या यमस्वरूपीं नाईक मडळीना सांगून पळभरही तिथं न थांबतां मी माझ्या गड्याला घेऊन मळ्याकडं निघालों.

   

झपाझप एकेक अडसर मागं टाकीत आम्ही घाट रस्त्याच्या अलीकडल्या टेपावर येऊन दाखल झालों. सूर्य अस्ताला जाण्याच्या अगदीं बेतांत होता. घाट उतरून संधिप्रकाश आहे अशांतच तळं गांठावं असा माझा हेतु होता. बोल बोलतां एका वळणापाशी आम्ही सडकेला येऊन लागलों. तें वळण संपवून थोड्याच वेळात आम्ही दुसऱ्या एका वळणापाशी आलों तों, सडकेच्य उजव्या बाजूच्या अगदीं कडेवर एक भरली गाडी पालथी होऊन पडलेली आमच्या दृष्टीस पडली. जवळ जाऊन चवकशी करितां, करडीचीं पोतीं लादलेली ती गाडी सुप्यास जाण्यास निघाली होती असं कळलं. आम्हांला मोठा विचार पडला. बिचारा तो गाडीवान ! आडरानांत त्याच्यावर मोठा बिकट प्रसंग येऊन गुदरला होता. त्याच्याबरोबर त्याचा पंधरासोळांच्या उमरीचा मुलगा होता. ते दोघे बापलेक पालथी झालेली ती

गाडी नीट करून पुन्हां भरण्याच्या खटपटीत होते त्या गाडीचं जुनं पुराणं साकण दोन तीन जागी तुटून गेल होतं. करडीच्या सहा पोत्यांपैकीं एक पोतं फुटून त्यांतल्या करडी रस्त्यावर उधळल्या होत्या. पोत शिवावयास जवळ दाभण सुतळी नसल्यामुळं त्यानी निम्म्या करडी पोत्यात भरून वाखाच्या पडांनीं तें पोतं बांधल अन् निम्म्या करडी पांघरावयाच्या घोगडीची खोळ करून तीत भरल्या. तशा निराधार अवस्थेत त्या गाडीवाल्याला सोडून आम्हांला पुढ जाणं शक्य नव्हतं आम्ही त्याला धीर देऊन, 'तूं काळजी करू नको. तुझी सर्व व्यवस्था ठीकठाक लावून देऊन अन् तुला वाटेला लावून दिल्याशिवाय आम्ही येथून जात नाही,' अस आश्वासन दिलं, अन् त्याला, 'कशामुळ तुझी गाडी पालथी झाली' म्हणून मीं प्रश्न केला "थीरपणानं नीट वाटेन आमची गाडी चालली व्हती, इतक्यांत डाव्या हातच्या पठारावरनं दोन रानजनावर (डुकरं) धुमाट पळत आलीं, आन् गाडीच्या जित्राबाना धुडवून उतरली तशींच उजव्या हातच्या खोपाडांत. बैलं बुजलीं तसं एक चाक चढल दगडाच्या योका उटीवर आन् झाली गाडी पालथी बरं तर बरं, आणीक वाइच हातभर कां पड्याल जाती मजी बैलं आन् आमीं दोघंबी बापलेक म्येलों व्हतों आज ठार!" अस म्हणून त्या गाडीवाल्यानं माझ्या गड्याच्या हातातल्या बदुकीकड विलक्षण खोंचक दृष्टीन बघितलं! माझा गडीहि माझ्याकडं अर्थपूर्ण नजरेन पाहूं लागला. त्या पहाण्यातला गूढार्थ केव्हाच माझ्या ध्यानात येऊन गेला होता

माझ्या गड्याला मी रोटद्न्याकडं जाऊन दोघं तिघ रामोशी गडी अन् वाघरीचा सरदोर काढून घेऊन ये म्हणून सागितलं, अन् तों पावेतों त्या गाडीवाल्याबरोबर गोष्टी करीत बसलो. त्याची गाडी पालथी घालणारीं तीं दोन्ही डुकरं, खेळत असतां आम्हांलाच उठलीं होतीं हें त्या गाडीवाल्याला आतां पुरतं कळून आलं होतं.

सरासरी अर्ध्याएक घंट्यानं माझा गडी त्या रामोशांना पुढं घालून त्या गाडीपाशीं येऊन हजर झाला. त्याच्या गाडीच तुटलेल साकण काढून टाकून गड्यांनीं बरोबर आणलेल्या दोरखंडानं त्याच्या गाडीचं साकण चांगलं मजबूत आवळून दिल, अन् त्याची गाडी भरून दिल्यावर आनंदानं तो पुन्हा सुप्याच्या रस्त्याला लागला. नाईक मंडळी रोटद्र्याकड निघून गेली अन् आम्हींही मळ्याकडं जावयासाठीं पुन्हां घाट उतरू लागलों.

## मानवी रक्तास लालचावलेली

## वाघांची दुक्कल.

## १५

वडील दिवगत होताक्षणीच पहिल महत्त्वाचं काम त्यानीं कोणत केलं असेल तर तें वडिलांनी काढलेला हत्यारांचा परवाना रद्द करून घेण्याचं !

बाबू अंशुमाली चक्रवर्ति म्हणजे त्या टापूंत विशेष नाणावलेली अशी एक अद्वितीय वल्ली होती बॅ. प्रद्योतकुमार रॉय ( 'शौकीन शिकाऱ्याचा शोकपर्यवसायी शेवट !' 'रानोमाळ' पहा ) यांचे हे सख्खे मेहुणे, उत्तर बंगालमधल्या 'पार्वतीपूर' गांवचे एक बडे जमीनदार होते. अर्थात् बडया लोकांच्या ठिकाणी वास्तव्य करणारे सारे मिजासींचे प्रकार त्यांना अवगत होते हें सांगणें नकोच. वर्षाचे बाराहि महिने–दुर्गाष्टमी, रामनवमी, गोकुळाष्टमी अशांसारखे उपवासाचे चार दिवस वजा जातां–पाश्चात्य पद्धतीचं

जेवण जेवल्यावांचून त्यांची भूक शमन होत नसे. असं असतांहि हिंसेचं मात्र त्यांना अगदीं वावडं होत. रायफल, ट्रॅवेल्व्हबोअर गन्, रिव्हॉल्व्हर वगैरे फक्कड हत्यारं जवळ जय्यत असूनहि कधीं पाणबदकंसुद्धां मारायची बुद्धि त्यांना उभ्या आयुष्यांत झाली नाही. जहरी कृष्णसर्पापेक्षाहि हत्यारांची त्याना अधिक भीति वाटत असे. आपल्या भेकड स्वभावावर पांघरूण घालण्यासाठीं, मांसाशनास पक्के चटावलेले हे सद्‌गृहस्थ वेळीअवेळीं दया-धर्मावर लवीं लंबीं प्रवचनं झोडीत असत. जणूं काय यांच्या खान्यासाठीं नित्यनेमानं घरात आयात होत असलेली सागुती गहूं–हरभऱ्यांप्रमाणं शेताशेतांनीच पिकत असे !

   

खुद्द त्यांचे मेहुणे प्रद्योतकुमार शिकारीचे मनस्वी शौकीन होते, पण शिका-रीचं नांव काढतांच अशुबाबू धक्का लागलेल्या सायाळाप्रमाणं किंवा वशिंडावर गोमाशी बसलेल्या पोळाप्रमाणं आपलं अंग शहारल्यासारखं करीत. भित्रेपणा हा त्यांचा मनोधर्मच बनून गेला होता असं म्हटलं असतां तें जास्त सयुक्तिक दिसेल. प्रद्योतकुमारांच्या शिकारीच्या शौकाची 'रानवटपणाचं कृत्य' म्हणून ते नेहमीं हेटाळणी करीत; पण यदृच्छेनं आज त्यांच्यावरच अशी पाळी आली होती कीं, त्यांना अप्रिय वाटणारं तेंच रानवटपणाच कृत्य आचरण्यासाठीं त्यांना मोठ्या अजीजीनं पत्र लिहून आपल्या मेहुण्यांना आपल्या गांवीं पाचारण करणं प्राप्त झालं.

   

त्यांच्या गांवापासून आठ नऊ कोसांवरच एक मोठं किर्र्र् जंगल होतं. अन् त्या जंगलांत वाघ, रानडुकरं, तरस वगैरे वन्य श्वापदंहि विपुल असत. जंगल उठविण्यास वाकबगार माणसांचा अभाव असल्यामुळं त्या बाजूस

चांगले शिकारी फार करून शिकारीसाठीं येण्याचा कंटाळा करीत. अन् त्यामुळं या जगली श्वापदांची बेसुमार वाढ त्या जंगलांत झालेली होती. त्यांचा उपद्रव अलीकड खुद्द त्यांच्या गांवाला लागूं लागला होता, अन् त्यांतच एक धटावलेला वाघ रात्रींबेरात्रीं एकटं दुकट माणूस त्याच्या आडसट्टयांत आल तर बेलाशक ठार करून खावयाला सवकला होता. अखेर अखेर तर त्या माणसं मारण्यास सोकावलेल्या वाघानं भोंवतालच्या खेडवळ शेतकऱ्यांस इतका उच्छाद दिला की, ते बिचारे नि शस्त्र शेतकरी त्राहि भगवन् होऊन गेले. यावर काहीं तरी उपाययोजना आतां झालीच पाहिजे म्हणून पुष्कळसे रयत लोक जमून त्यानीं पार्वतीपूरच्या आपल्या जमीनदा-रांच्या प्रासादतुल्य बंगल्यावर मोर्चा नेला अथवा त्यांच्या दारांत धरणं धरलं, म्हणा हवं तर. पण अपवादाला सुद्धां हे बडे जमीनदार जातीनं कधीं जंगलाच्या बाजूला फिरकले नाहींत, कीं त्या मनुष्यभक्षक श्वापदाला ठार करण्याची कोणतीहि तजवीज त्याच्यांकडून होऊं शकली नाहीं. शिकारीच नांव त्याच्यासमक्ष कुणी उच्चारलं तर ते दोन्ही कानांत बोटे घालीत, पण अशानं निभाव कसा लागावा ? शेतकऱ्यांनीं आणि रयत लोकानीं आपलीं शेतीचीं जनावर अन् स्वतःच जीवितच सुरक्षित नसल्यावर शेतामळ्यांची मशागत तरी कशी करावी ? अन् जमिनीच पड पडल्यावर त्यांनीं रयतावा तरी कुठून भरावा ? अखेर निरुपायामुळं त्यानी आपले मेहुणे प्रद्योतकुमार यांना कलकत्त्याला समग्र हकीगतीच पत्र लिहिलं अन् त्यांना आपल्या मागचा हा त्रास चुकवावा अशी मुठीत नाक धरून विनंति केली.

   

गोरखपूरला गुरांचं अन् शेतीचं मोठं प्रदर्शन भरलं होतं तें पहाण्यासाठीं मी या वेळीं तिकडे गेलों होतों. प्रदर्शन आटोपल्यावर प्रद्योतबाबूंचा मला

आज पुष्कळ दिवस आग्रह होता म्हणून त्याचा पाहुणचार घेण्यासाठी मी कलकत्त्याला आज एक आठवडाभर त्याच्याकडे येऊन राहिलों होतों. शिका-रीचा कांहीतरी प्रोग्रॅम ठरेल असं मला वाटत होत, पण तो योग काहीं या-वेळीं जमून आला नाहीं नुसता पाहुणचार खात पडण्याचा कंटाळा आल्या-मुळ मी आता परतण्याच्या विचारात होतों, अन् ' आमच्या जमीनदारीच्या गावी दोन दिवस जाऊ ' अशा सबबीवर प्रद्योतबाबू तर मला कांही इतक्यात सोडीत नव्हते.

   

कोर्टांत काही किरकोळ काम असल्यामुळ बॅरिस्टरसाहेब आज कोर्टात गेले होते. मी एकटाच माझ्या खोलीत बंकिमचंद्रांची ' देवी चौधराणी ' नांवाची एक उत्कृष्ट कादंबरी वाचीत पडलों होतों. धाड् धाड् जिना चढून कोण आल तें पहाव म्हणून खोलीतून मी बाहेरच्या गॅलरींत आलों तों पोस्टमननं बरंचसं टपाल आणून व्हरांड्यांतल्या टेबलावर टाकलं. त्यानं आणून ठेवलेल्या टपालांतल्या एका सचित्र बंगाली मासिकाचं रॅपर फाडून मी त्यांतली तीं सळनळीत अन् विशिष्ट बंगाली साच्याची गचाळ चित्रं पहात बसलो होतों तोंच प्रद्योतबाबूंची मोटार बंगल्याच्या पोर्चमध्यें येऊन खडी झालेली वरून मला दिसली. मोटारींतून उतरताच प्रद्योतकुमार सरळ जिना चढून माझ्या खोलीशी आले, अन् ' उद्या सकाळीं लवकरच इथून निघायचं बरं का ' असं मला म्हणाले. कपडे उतरून मग स्वस्थपणान टपाल बघत बसावं म्हणून ते दिवाणखान्याला लागूनच असलेल्या आपल्या खासगी खोलीकडं निघाले. पण एवढ्यांत त्यांना काय वाटलं कुणास ठाऊक ! त्यांनीं त्या टपालांतून एक लांबट निळा लखोटा उचलून हातांत घेतला अन् तो फोडून पुन्हां माझ्या शेजारी खुर्चीवर येऊन बसले. किलकिले डोळे करून त्यांनीं लखोट्यां-

तून काढलेलं तें पत्र समग्र वाचल. तें पत्र वाचतांना त्याच्या मुद्रेवर कितीतरी निरनिराळे भाव उमटून गेलेले मला दिसले. आपल्या चष्म्याच्या अन् भिवयाच्या सापटीमधून त्यांनीं मजकडे एकवार रोखून पाहिल्यासारखं केलं अन् नंतर ते स्वत शीच पण खूप मोठयानं हंसले

   

त्याचे मेहुणे अंशुबाबू याच्याबद्दलची थोडी फार हकीकत मला प्रद्योतकुमारांच्या आणि त्याच्या पत्नी मृणालिनीदेवी याच्या तोंडूनच पूर्वी कळलेली होती. त्यांच्या भित्र्या स्वभावाच वर्णनहि एके प्रसंगीं मला त्याच्या तोंडूनच ऐकायला मिळालं होत. पार्वतीपूरच्या पोस्टाच्या शिक्क्यावरून तें पत्र अंशुबाबूंच असावं असहि साधारणपण मी ताडलं होतं. पण त्याच्या पत्रात प्रद्योतकुमाराचं मन विचलित होण्यासासारखा कांहीं मजकूर असेल अशी मात्र मला कल्पना नव्हती. प्रद्योतबाबूंनी पुन्हा एकदा त्या पत्रावरून आपली नजर फिरविली अन् तसंच तें माझ्याकडं दिलं अथपासून इतिपर्यंत मी तें पत्र वाचल, अन् मला तें पत्र वाचावयास देण्यातला मतितार्थहि समजलो

"अंशुबाबूंना आतां आम्हा जगली लोकांची आठवण झाली काय!" असं म्हणतच ते आपल्या खोलीकडे निघून गेले

मी इथ आल्याला सबंध आठवडा लोटला, पण शिकारीसंबधी चकार शब्दहि प्रद्योतबाबूच्या मुखावाटे बाहेर पडला नव्हता, तोंच अंशुबाबूंच वरील आशयाचं पत्र येऊन थडकल या विलक्षण योगायोगाचा मनाशीच विचार करीत मी स्वस्थ बसलो होतों. इतक्यात प्रद्योतबाबूंच्या नोकरान, 'चहासाठीं साहेबानी तुम्हाला तिकडच बोलावल आहे' म्हणून वर्दी दिली. तें पत्र अन् बाकीचंहि टपाल घेऊन मी प्रद्योतबाबूंच्या खोलीकडं निघालों; तों

जामानिमा उतरून प्रद्योतबाबू दिवाणखान्यांत येऊन माझीच वाट पहात बसले होते. माझ्या पुढ्यांतला चहा अन् प्लेटमधल्या निम्म्याच्यावर केक्स खलास करून मी दुसऱ्यांदा आपल्या कपांत चहा ओतून घेतला तरी प्रद्योत-बाबूंचा कप अर्धाहि रिता झाला नव्हता. चहाकडं त्यांचं लक्षच नव्हतस दिसलं चहा घेता घेतां ते मध्येंच उठले. पलीकडल्या खोलीत जाऊन त्यांनी पत्र लिहायच सारं साहित्य बाहेरच आणलं, अन् चहाच्या टेबलावरच त्यांनीं अंशुबाबूंच्या पत्राचं उत्तर खरडावयास सुरुवात केली. "आपल्या पत्राप्रमाणं आम्ही–मी व माझे एक स्नेही–परवां सायंकाळीं तेथे येतों, तोंपावेतों आपणांस त्या श्वापदासबधीं जितकी माहिती मिळवितां येण्या-सारखी असेल तितकी मिळवून ठेवावी, आणि कांही माहितगार माणसंहि मिळण्यासारखी असल्यास बोलवून घ्यावीत. मृणालिनीदेवीहि कदाचित् आमच्याबरोबर येतील." अशा आशयाचा मजकूर लिहून त्यांनीं पत्राची घडी केली. पत्ता लिहून पत्र लिफाफ्यात घातलं. अन् आता लिफाफा बंद करणार तों पुन्हां काय लिहायच विसरले कुणास ठाऊक ! लिफाफ्यांत घातलेलं तें पत्र त्यांनीं पुन्हां बाहेर काढलं अन् घाईघाईनं त्यावर आणखी कसल्यातरी मजकुराच्या चार ओळी खरडून टाकल्या. 'रान अन् रानटी श्वापदं हीं जोंपर्यंत या जगात विद्यमान आहेत तोंपर्यंत रानवट माणसंहि पण जगांत असणारच,' असं स्वगतच पण खोंचक दृष्टीनं माझ्याकडं बघून ते म्हणाले. त्यावरून मागाहून उद्देशून खरडलेल्या त्या चार ओळी म्हणजे दुसरं तिसरं कांहीं नसून अंशुबाबूंना लेखी दिलेला तो एक खरपूस टोला होता, हें तत्काळ माझ्या लक्षात आलं.

   

शिकारीच्या उद्देशानं या वेळी मी बंगाल्यांत आलेला नसल्यामुळं माझी

रायफल अर्थातच मजबरोबर नव्हती, अन् तिच्यावाचून माझं अडण्यासारखंहि पण नव्हतं. शिकाऱ्याजवळ रायफलच्या जोडीला डबलबॅरल्ड ही असावयाचीच, त्याप्रमाणं प्रद्योतबाबूंजवळ उत्कृष्ट ट्वेल्व्हबोअर डबलबॅरल्ड् होती अन् तिच्यावर माझं काम भागण्यासारख होतं.

   

रायफलची अन् डबलबॅरल्ड् गन्‌ची भरपूर काडतुसं व इतर आवश्यक बाबीची तरतूद करून मृणालिनीदेवींसह आम्हीं तिसऱ्या दिवशीं पार्वतीपूरला जावयासाठीं प्रस्थान ठेवलं, अन् दिवेलागणीच्या सुमारास तिथं जाऊन पोहोंचलों. स्टेशनवर आम्हाला घेण्यासाठीं अंशुबाबूंची स्वारी आपल्या 'ग्रेहाउन्ड' जोडीला नवीनच घेतलेल्या ब्यूक गाडींत घालून आलेली होती. प्रद्योतबाबूंनी अंशुबाबूंशी माझी ओळख करून दिल्यावर आम्ही सर्वजण गाडीत जाऊन बसलों, अन् निमिषार्धात एक नागमोडी वळण घेऊन गाडी मुख्य रस्त्याला लागली. केवळ उत्कृष्ट शिकाऱ्याजवळच शोभेल अशी अस्सल ग्रेहाउन्डची जोडी अंशुबाबूंनीं शोकान पाळलेली पाहून मला आश्चर्य वाटलं. वाटेनं आपल्या भगिनीला—म्हणजे मृणालिनीदेवींना—त्या माणूसमाऱ्या वाघाच्या गोष्टी—पदरचं वरचसं तिखटमीठ चोपडून—मोठ्या आवेशानं अंशुबाबू सुनवीत होते, तोंच गाडी बंगल्याच्या पोर्चमध्यें येऊन खडी झाली अन् आम्ही सारे अंशुबाबूंच्या बंगल्याच्या त्या अर्धचंद्राकार, संगमरवराच्या स्फटिकतुल्य पायऱ्या चढून एकदमच बंगल्यात शिरलों.

   

फारा दिवसांनीं आज बहीण अन् मेहुणे पार्वतीपूरला आलेले असल्यामुळें बरीच रात्र पडेपर्यंत मडळी गप्पागोष्टी करीत बसली होती. प्रद्योतबाबूंनीं अंशुबाबूंना त्या श्वापदासंबंधानं मिळेल ती माहिती काढण्याबद्दल पत्रांतून

सूचना केलेली होती. पण पत्रापाठोपाठच आम्ही तिथं येऊन हजर झाल्या-मुळं अंशुबाबूंना मिळावी तितकी फुरसत मिळू शकली नाहीं, अन् शिवाय शिकाऱ्यास नक्की कोणत्या प्रकारची माहिती हवी हें शिकाऱ्याची दृष्टि नसल्यामुळं त्यांना जमण्यासारखंहि नव्हतं.

   

दुसऱ्या दिवशीं उजाडल्यावर आम्ही आमच्या नियोजित कार्याच्या उद्योगास लागलों. अंशुबाबूंच्या परिवारांत जीं माणस होती ती अगदी अनभिज्ञ कुचकामाचीं—पण एकेक बात सव्वा सव्वा हात अशापैकीच होतीं. त्यांच्यामार्फत आमचा काहीं कार्यभाग होईल अशी सुतराम् आशा नसल्या-मुळं आम्हीं जातीनच सर्व काहीं माहिनी काढावयाची अस ठरविल. त्या श्वापदाचा छडा लावणारी माहितगार माणसं मिळविण्यासाठीं अन् आम्हाला अवश्य असणारी इतर माहिती गोळा करण्यासाठी आम्हांला खेडोपाडी बरीचशी भ्रमंती करावयास पाहिजे होती. अन् जगलाची परिस्थितिहि एकवार प्रत्यक्ष पाहून यावयास हवी होती. अर्थात्च मोटारचा आम्हांला काहींहि उपयोग होण्यासारखा नसल्यामुळं अशुबाबूंचा जोडीचा शिग्राम आम्ही आमच्या दिमतीस मागून घेतला, अन् त्यातल्या त्यांत त्या बाजूची माहिती असलेला एक इसम निवडून आम्हीं प्रथम त्या जगलाच्या आस-पासच्या खेडयांतून जाऊन यावयाचं ठरविल.

लागोपाठ दोन तीन दिवस आम्हीं अवश्य ती माहिती काढण्यात मग्न होतों जंगलाच्या आसपासच्या वसत्यांवरून कांही आभीर कोळी जातीचे जंगली लोक होते. पण ते तितकेसे वाकबगार नसल्यामुळ जगल उठवून खेळावयाचं नावच काढावयास नको होतं, अन् माणसांच्या रक्तास चटावलेलं तें श्वापद जंगलांतल्या ठराविक भागात उठेलच अशी खात्री पण

आम्हांस वाटत नव्हती जगल उठवून खेळायचं म्हटलं तरी, आम्हांला हवं असलेलं तेंच विशिष्ट श्वापद नेमकं कसं सापडाव ? केवळ वाघाच्या शिकारीचा हेतु या वेळी आमच्या डोळ्यांपुढ नव्हता आम्हाला त्या मनुष्यभक्षक श्वापदाशीच गाठ घालावयाची होती. या बाबनीत सावज लक्ष्यावर आणून ठार करण हा एकच उपाय शक्य होता पण त्या बाबतीतहि निश्चित अशी योजना आंखण्याची एवढ्यात मुष्किलच होती वेताळाच्या फेरीप्रमाणं तें इब्लिस श्वापद आज एकीकडं तर दुसऱ्या दिवशी तिसरीकडच डल्ला मारीत फिरत असे अन् सर्वांत मोठी अडचण हीच होती की, अनेक तऱ्हेच्या खऱ्याखोट्या आवया केवळ गमतीखातर लोक बेदिक्कतपणानं प्रसृत करीत. या सगळ्या गोष्टी जमेस धरून अन् एकदर परिस्थितीचा साधकबाधक विचार करून आम्हीं शेवटी चार दोन दिवस जगलानजीकच कुठ तरी मुक्काम टाकावा असं ठरविल अन् त्याप्रमाण अशुबाबूंना कळविलं कॅम्पावर रात्रीच्या वेळी चाहुलीसाठी प्रद्योनकुमारानीं त्यांच्या कुत्र्यांच्या जोडीचीहि मागणी त्याजपाशीं त्याच वेळीं केली

प्रद्योनबाबूकडून कुत्र्याची मागणी होताच धरणीकंपाच्या धक्क्यान भेदरून गेल्याप्रमाण अशुबाबूंची चर्या कावरीबावरी दिसूं लागली 'तुम्हाम हवी असलेली प्रत्येक तजवीज तुमच्या म्हणण्याप्रमाण करून देतो, पण... पण '

प्रद्योनबाबूंनीं त्यांना पुढं मुळी बोलूच दिल नाही. त्याच्या 'पण ..पण' चा अर्थ तत्काल त्याच्या लक्षात आला प्रॅक्टीसकड त्याच विशेषसं लक्ष नसलं तरी, अत्यन कुशाग्र बुद्धिमत्तेचे वकील अन् उडत्या पांखराची पर पारखणारे एक अव्वल दर्जाचे शिकारी होते ते "रानडुकरांवर कुत्रीं सोडतात त्याप्रमाण वाघावर कांहीं आम्हाला तुमचीं लाडकीं कुत्रीं सोडावयाचीं नाहींत. ... आम्हां माणसांपेक्षाहि तुम्हास तुमच्या कुत्र्यांच्या

जीविताची अधिक मातब्बरी वाटते अं" ! असा फारच कडक टोमणा बोलतां बोलतां त्यानीं अंशुबाबूना मारला.

यावर 'कुत्सितपणानं बोलण्याची सवयच पडून गेलेली असते वकील-मंडळीना,' एवढंच बोलून अंशुबाबू गप्प झाले. अन् टेबलावरल्या ताबळ्या पेन्सिलीनं लिहिण्याच्या पॅडवरच लहान मुलाप्रमाण रेघोट्या ओढू लागले

मेहुण्या–मेहुण्यांमध्ये झडलेल्या या आकस्मिक चकमकीमुळं हॉलमधलं वातावरण एकदम तापून गेल्यासारख झाल होत बराच वेळ बोलण्याच्या मनःस्थितीतच कुणी नव्हतं. या मध्येंच बंद पडलेल्या चर्चेला पुन्हां वाचा कशी फोडावी या विवंचनेंत मी होतों. एवढ्यांत अंशुबाबूंच्या पत्नी उषादेवी मृणालिनीदेवीसह दाण् दाण् जिना चढून वर आल्या प्रातःकालीन रम्य उषेनं चंडिकेचा उग्र मुखवटा चढविल्याप्रमाणं त्याची मुद्रा या वेळीं दिसत होती भृकुटी वक्र करून अन् अंशुबाबूना अनुलक्षून, "तुमच्या त्या लाडक्या कुत्र्यांना गोळ्या घालून एकदां मारून टाका कीं ! माझ्या राणीवर मेल्याचा ती घरांत आल्यापासूनच दात. शेवटी आज त्याच्या मनाप्रमाण झाल एकदांचं !"

उषादेवीनीं मोठ्या हौसेन कलकत्त्याहून आणलेली त्यांची विलायती 'राणी' मांजरी, अंशुबाबूंच्या लाडक्या कुत्र्याच्या जोडीनं थोड्याच वेळा-पूर्वी खेळतां खेळता जिवें मारली होती, अन् त्यामुळं उषादेवी आपल्या पतिराजांवर सर्वांसमक्ष वरप्रमाणं बेछूट कडाडल्या होत्या.

   

या अवचित घडून आलेल्या उद्वेगकारक घटनेमुळं अंशुबाबूंना जणू आणखी एक झटका बसल्यासारखा झाला. हतबुद्ध झाल्याप्रमाण क्षणभर ते आपल्या पत्नीच्या चेहेऱ्याकडे नुसते बघतच राहिले. टेबलावरल्या ॲशपॉटच्या

खोबणींत विझून पडलेली सिगारेट पुन्हां शिलगावून त्यांनी तिचे दोन तीन झुरके मारले. तपकीर ओढल्यावर माणूस शिकत त्याप्रमाणं त्यांनी एक दोन जोराच्या शिंका काढल्या. अन् हातरुमाल तोंडावर धरून, "तूं आपल्या जिवाचा बिलकूल संताप करून घेऊ नकोस. त्या गुलामांना आतां मी त्या माणसं खाणाऱ्या वाघाच्या तोंडीच देऊन टाकतों मुळीं!" असं छद्मीपणानं बोलून अन् आपल्या सतप्त पत्नीकडं वळून ते खो खो करून हंसूं लागले.

"सदानूकदा तुमची आपली थट्टाच!"

उषादेवीचा लटका राग कुठच्या कुठच मावळून गेला. इतक्या वेळचं गरम गंभीर वातावरण पार हवेंत विरून गेलं, अन् दिलखुलास हास्याच्या लहरींवर लहरी लहरू लागल्यामुळं तो दिवाणखाना जणूं आतां हेलावल्या-सारखा होऊन गेला

   

उषादेवीचा राहिलासाहिला रोष घालविण्यासाठीं अंशुबाबूंनीं उषादेवींच्या 'राणी'ला मोठ्या समारंभानं पुरल, अन् तो दिवस अशौच पाळल्याप्रमाणं घालविला.

ती रात्र सरली. उजाडल्यावर एकाएकींच कुठून अन् कशी कळ फिरली कुणास ठाऊक! अंशुबाबू आतां अगदीं उल्हासयुक्त अतःकरणानं अन् कंबर कसून आमच्या मागण्या पुऱ्या करण्यासाठी झटू लागले परवांचा अधिक आगळा अप्रिय प्रसंग ते अजिबात विसरून गेले होते. दोन तीन दिवसांतच आमच्या पसतीनुरूप आमच्या शिकारी कॅंपाची उत्कृष्ट व्यवस्था त्यांनीं लावून दिली, अन् आम्ही आमच्या परिवारासह अन् अंशुबाबूंच्या 'ग्रेहाउन्ड्' जोडीसह आमच्या कॅम्पावर रवाना झालों निघतांना अंशुबाबूंनीं

कुत्र्यावर नेमलेल्या आपल्या नौकराला रात्रीच्या वेळीं गाफील न राहण्या-बद्दल पुन पुन्हा बजावलं.

   

त्या किर्र्र् जगलाच्या अलीकडे दोन सव्वादोन कोसांवर 'ललितपूर' नांवाच एक छोटस खेडं असून गावाच्या नजीकच स्वच्छ पाण्याच एक मोठ तळं आहे. त्या तळ्याच्या कडेवरच असलेल्या एका सपाटशा टेपावर आमचा कॅम्प् पडला होता. गांवच्या उत्तर बाजूच्या पडीक शिवारापलीकडे जगल असून बाकी तीनहि बाजूचा शिवार सुपीक आहे. जिकडं तिकडं तागाची, भाताची अन् क्वचित् निळीचीं पिंवळसर अन् हिरवीचार शेतं पसरलेली असून शेतांच्या बाधाबाधांनीं राखलेल्या उंच उंच झाडाचे कोवळे शेंडे सूर्यकिरणं पडून चमकूं लागले म्हणजे मोठी अपूर्व शोभा दिसे. त्या निसर्गरम्य स्थळीं एक दिवस स्वस्थपणानं आम्ही विश्राति घेतली अन् दुसऱ्या दिवसापासून आम्ही आमच्या उद्योगास लागलों. प्रथम आम्ही त्या जगलाच्या आसपासच्या पाच चार खेड्यातून, त्या श्वापदाची काही चाहूल लागल्यास आमच्या ललितपूरमधल्या कॅम्पावर वर्दी पोहोंचविण्याबद्दल दवंडी देवविली, अन् त्यातल्या त्यात विशेष वर्दळ लागत असलेल्या दोन गावाच्या गांवठाणातल्याच पण ओसाड अशा भागांत हेले बांधून ठेवण्याचीहि तजवीज केली. प्रयत्नांची पराकाष्ठा केल्याशिवाय सहजासहजीं तें श्वापद जाळ्यात सांपडण्याचा बिलकुल संभव आम्हाला दिसत नव्हता, म्हणून निरनिराळ्या क्लृप्त्या योजून त्याला घेरण्याची आम्ही आपल्याकडून शिकस्त करून पहात होतों.

   

दोन दिवस होऊन गेले, तिसराहि दिवस मावळला. पण त्या श्वापदाचा

कांहीं एक तलास लागेना. दोन्ही गावच्या गावठाणातून खुटवून ठेविलेले ते हेले सकाळीं पहावेत तों सुसमाळपणान रवंथ करीत बसले असल्याची वर्दी येई आम्ही मोठ्या विचारात पडलों.

   

स्वस्थपणान माशा मारीत बसण्याचा कटाळा येऊन गेल्यामुळ आज पहाटेस उठून आम्ही शिराजगंजच्या बाजूला पाणबदकाच्या शिकारीसाठी गेलो होतो. थोडंस खेळून दहा साडेदहाच्या सुमाराला आम्ही आमच्या कॅम्पावर परतलों तों तिघ चौघ इसम, गाडी एका झाडाच्या सांवलीला सोडून कॅम्पावर आमचीच वाट पहात बसून राहिले होते नमस्कार चमत्कार झाल्यावर आम्हां त्यास त्याच्या आगमनाचं कारण विचारलं. जंगलाच्या पूर्वेला असलेल्या 'पऱ्हाई' गावची होती ती मंडळी त्यात त्या गांवचा पटेलहि होता. गावापासून मैला–दीडा मैलावरच असलेल्या त्या पटेलाच्या मळ्यांतल्या गोठयाचा कारव्या–कुसमुडाचा कूड मोडून अन् गोठयांत शिरून, त्याचा एक सुंदर खोंड रात्री वाघानं मारल्याची वर्दी त्यानं आम्हाला दिली. "सावज फार भारी ! एकाद दुसऱ्या गोळीन त्याचा बालहि वांकडा व्हाव-याचा नाही, अस त्याला नजरेनं पाहिलेली माणस म्हणत होतीं... "

जुन्या पिढींतले विख्यात कादंबरीकार कै. हरिभाऊ आपटे यांच्या 'गड आला पण सिंह गेला' या लोकप्रिय कादंबरीतल्या पहिल्याच प्रकरणां-तलं "भला थोरला हत्तीसारखा प्रचंड रानडुक्कर" (मोठयांतमोठया रान-डुकराची उंची तीन फुटापेक्षां अधिक नसते ) हे वाक्य वाचताच जाणत्या वाचकाला जस हंसूं कोसळतं, अगदी तस्सं हसूं त्या पटेलाच्या तोडच त्या वाघाचं वर्णन ऐकून मला कोसळलं, अन् त्याबरोबरच त्याच्या एतद्विषयक ज्ञानाची कीवहि आल्याशिवाय राहिली नाही

'...कुत्री अन् माणसं मागं लागल्यामुळं त्याला मारलेलं वांसरूं नेतां आलं नाहीं,' असंहि त्याच्या तोंडून आम्हांला समजलं; अन् नेमकं तेंच आम्हाला हवं होतं ! त्यानं सांगितलेली हकीकत ऐकून प्रद्योतकुमार अक्षरशः हर्षवायु झाल्याप्रमाणे नाचूउडूं लागले. "वासरूं नेता आलं नाही !" कितीदां तरी त्यांनी तेंच तें वाक्य पुनःपुन्हा घोळलं, 'अन् म्हणूनच आमच्या बंदुकीचा बळी आता मुकर ठरून गेला !' फिरता फिरता त्यानी आपल्या उजव्या मांडीच्या पटावर एकाद्या थिल्लर उल्लूप्रमाणं एक जोरकस थाप ठेवून दिली, अन् 'उदईक रात्रौ तुमचं वांसरूं मारणारा तो वाघ ठार झाला असच धरून चाला,' असं त्या ग्रामस्थ मंडळींकडं पाहून ते कमालीच्या दर्पानं उद्गारले !

   

उडाला तर मचाणावरूनच बार उडावयाचा संभव दिसत असल्यामुळे, विद्युद्दीपाची योजना करण्यासाठी पार्वतीपुराहून आम्ही मुद्दाम एक वायरमन् सर्व सामुग्रीसहित आमच्या कॅम्पावर आणवून ठेविला होता. मचाण बांधणारीं माणसं, अन् तो वायरमन् असा सारा सरंजाम सर्व सामुग्रीसहित आम्ही त्या माणसांबरोबरच पुढें रवाना करून दिला अन् जेवण वगैरे उरकून आम्हीहि त्या माणसांच्या पाठोपाठच पऱ्हाईला जाण्यास निघालों. पुढं रवाना झालेली ती माणस अन् आम्हीं बरोबरच पटेलाच्या मळ्यांत येऊन पोहोंचलों. क्षणभरहि उसंत न खातां तेथल्या एकदर परिस्थितीचं आम्हीं बारकाईनं निरीक्षण केल. चार दोन दिवस तें श्वापद मारलेल्या लक्ष्याच्या वासावर तिथं घिरट्या घालीत रहाणारच अशी आमची बालंबाल खात्री होती. त्या धोरणानंच आम्ही पुढची योजना ठरविली. त्याच रात्री मध्यरात्रीच्या सुमारास मळ्यांतली कुत्री एकाएकीच खूप भुंकूं लागलीं, अन् पडळीच्या बाहेरच्या अंगाला बांधलेलो आमच्या शिग्रामाची घोडीहि एक दोन वेळां

मोठ्यानं हिसली. त्यावरून त्या श्वापदाची फेरी येऊन चाहूल घेऊन गेली असावी असा आमचा तर्क झाला.

   

त्या गोठ्यापासून जवळच शेणखई सांठविण्याची एक मोठी खांच होती, अन् पलीकडं एक दोन आंब्यांची अन् एक उचस शिरसाच झाड होतं. मचाण बांधण्यासाठी तेंच आम्ही पसत केल.

उदईक सूर्यास्ताच्या आंत मचाण बांधून तयार व्हावयास पाहिजे होतं. सारा दिवस आटोकाट मेहनत घेऊन आमच्या माणसांनीं तें बहुतेक पुरं करीत आणल विद्युद्दीपाची नरतूद तेवढी व्हावयाची राहिली होती; पण 'तुम्हीं बिलकुल काळजी करू नका, एका तासांत मी तें पुरं करून देतों,' अस आश्वासन त्या वायरमनून आम्हास दिल्यामुळं आम्ही निश्चित होतों.

होतां होतां सूर्यास्त होऊन काळोख पडूं लागला. त्या शिरसाच्या झाडापासून बरोबर दीडशें यार्डावर आम्ही तो वाघानं मारलेला खोंड टाकविला अन् त्याच्या शेजारींच, सावज लक्ष्यावर येऊन पडल्याचा नक्की इषारा मिळण्यासाठीं एक जवान टोणगा वांधून ठेवला मचाणापासून वायर आणून बांधलेल्या लक्ष्यावर लोंबती सोडली अन् एक पॉवरफुल बल्ब त्या वायरला बसवून दिला. स्विच्, बॅटरी जिथल्या तिथं फिटप् झाली; मचाणावर चढून आम्ही एकवार भावी खेळाची रंगीत तालीम घेतली अन् सगळं टिपटॉप् झाल्याची खात्री झाल्यावर मचाणावरून खालीं उतरलों.

रात्रभर जागायचं असल्यामुळ आम्ही जेवण न करितां चहा-रोटीवरच क्षुधाशाति केली. मळ्यांतल्या साऱ्या माणसांना बाहेर फिरीक न होण्याबद्दल ताकीद दिली. कुत्री जखडून टाकविलीं अन् वखत झाल्यामुळं काडतुसाचे बेल्ट

गळ्यांत घालून अन् बंदुका काखोटीत मारून आम्ही पुन्हां माचव्यात जाऊन बसलों

   

प्रद्योतबाबूंनीं आपली रायफल भरून सज्ज केली मीहि आपली ट्वेल्व्हबोअर भरली, अन् मोठ्या सावधगिरीनं आम्ही श्वापदाचा कानोसा घेत राहिलो. बार उडाला तर एका मिनिटात उडून जातो. पण त्या एका मिनिटाची मार्गप्रतीक्षा करीत तासचे तास शिक्षा दिल्याप्रमाणं काढावे लागतात. बोलण्याची चोरी, हलण्याची चोरी, विडी पिण्याचीहि चोरी !

बसून बसून जीव कटाळून गेला, पण सावज काही केल्या लक्ष्यावर येईना. मध्यरात्रीचा सुमार झाला होता. हलक्या आवाजांत आमच्या गप्पा चालूंच होत्या. ' कदाचित् आज न येतां एकादा दिवस विसर पाडून उद्या सुद्धा तें येईल, कुणी सागावं ! ' प्रद्योतबाबू म्हणाले

' केव्हांहि येवो. त्याची गांठ पडेपर्यंत आपल्याला त्याची वाट पहात बसलंच पाहिजे, ' अस म्हणून मी झटकन् सिगरेट शिलगावली ' मग मींच काय पाप केलं आहे, ' असं म्हणून प्रद्योतकुमारानीहि माझ्याच सिगरेटवर आपली सिगरेट चेतविली अन् आम्ही दोघेहि स्वस्थपणानं सिगरेट्स पीत बसलो. तें वस्ताद श्वापद फार करून आतां येणार नाहीं असं वाटल्यामुळं आम्ही थोडेसे गहाळच पडलों होतो. इतक्यांत पडळीपाशीं बाधून टाकलेली कुत्री चवताळून भुंकू लागलीं म्हणून बंदुकीचे हॅमरहि उघडून आम्ही पुन्हां तय्यार होऊन राहिलों

जवळ जवळ घटाभर आम्ही मोठ्या आशेन त्या श्वापदाच्या वाटेकडं डोळे लावून बसलों होतों, पण श्वापदाचा पत्ता नाही.

   

तीन प्रहर रात्र उलटून गेली होती. आकाशात चंद्राचा प्रकाश मंद होत चालला होता, अन् शुक्राचा तेजस्वी तारा उदय पावत होता. जागरणामुळं आमचे डोळे तारवटून गेल्यामुळं बदुकांचे हॅमर पाडून स्वस्थपणानं मचाणाच्या मधल्या आडवटाला रेलून आम्ही बसलो होतों. इतक्यांत आमिषावर बांधून ठेवलेला हेला धडपडून उडून मोठमोठ्यानं रेकूं लागला अन् पडळीपासल्या कुत्र्यांनींहि भुकून भुकून नुसता जीव काढला. तत्काल आम्ही आमच्या बंदुकाचे घोडे उघडून स्विच खेचला अन् पहातों तो काय ! एकाऐवजी दोन प्रचंड वाघाची धुडं त्या हेल्याला जमीनदोस्त करून त्याचे वाभाडे काढीत आहेत ! विद्युद्दीपाचा झोत पडतांक्षणीच ती दोन्हींहि श्वापद एकदम चमकल्यासारखीं झालीं, अन् त्या हेल्याच्या अंगावरून पलीकडं उडया घेऊन आपल्या लांबसडक शेपट्या वळवळावीत डोक्यावरल्या विद्युद्दीपाकड रोखून पहात त्वेषान गुरगुरत उभी राहिलीं. त्या विद्युत्प्रकाशातहि त्या श्वापदाचे डोळे विलक्षण चमकत होते. परस्परांना सूचना देऊन आम्ही आपापल्या बंदुका खवाट्याला जोडल्या, अन् सावकाशपणं शिस्त धरून आम्ही दोघांनीहि त्या दोन्ही श्वापदांवर एकामागं एक दोन दोन फैरी झाडल्या. बंदुकाच्या आवाजांनीं अन् त्या श्वापदाच्या भयानक डरकाळ्यांनी सार अस्मान दणाणून गेल प्रद्योतबाबूनीं झाडलेल्या दोन्ही गोळ्या त्या श्वापदाच्या बरगडीत जाऊन घुसल्या, त्यासरस तें वाघाचं धूड जागच्या जागीच उलथून पडल, अन् मी आवाज टाकलेल श्वापद ( त्याच्या किंचित् लहानसर जबड्यावरून अन् पातळ दिसत असलेल्या केंसावरून ती मादी असावी ) बरोबर गोळीचं संधान साधून किरण घेऊन उठलं, अन् लांब लांब झेपा टाकीत जवळच्या काळोखांत अदृश्य झाल. परिणामाची चांचणी पहाण्याकरिता ती वाघीण पसार झाल्याच्या दिशेनं मा आणखी दोन मोघम आवाज टाकले, अन् आतां धोका नाहीं अशी खात्री होतांच मचाणावरून आम्ही खालीं उतरलों.

मचाणांतून उतरल्यावर आम्ही थेट त्या मरून पडलेल्या वाघाजवळ जाऊन उभे राहिलों झाडावरून बसून राहिलेलीं आमचीं माणस अन् मळ्यांतलीं गडीमाणसंहि बऱ्या पेटवून दबक्त दबकत त्या श्वापदाला पहाण्यासाठीं तिथं येऊन जमा झालीं मीं आवाज टाकलेली मादी उभी होती त्या जागींहि बरंचसं रक्त गळालेलं दिसल, म्हणून आम्ही ती गेली त्या दिशेनं माग धरून निघालों तों, साऱ्या वाटेनं रक्ताचा नुसता सडा झालेला आमच्या नजरेस पडला त्यावरून ती जखमी वाघीण फार वेळ वांचेल असं आम्हांला वाटत नव्हतं. तरी पण रात्रीच्या वेळीं पोळलेल्या श्वापदामागं जाणं तितकस सुरक्षित नसल्यामुळं उजाडल्यावर तिचा तपास करण्याचं ठरवून आम्ही पडळींत जाऊन जरासे कलडलो

   

लवकर उठायचं आम्हीं ठरवलं होतं तरी आम्हांस उठावयास थोडासा उशीरच झाला होता. प्रातर्विधि उरकून अन् चहापान करून आम्ही लगेच आमच्या कामगिरीवर निघालों. आम्हांबरोबर तो पटेलहि येतो म्हणाला म्हणून त्यास आम्हीं त्याचीं कुत्रीहि बरोबर बांधून घेण्यास सांगितलीं मूळ ठिकाणापासून त्या रक्ताचा माग धरून आम्ही धडक निघालों, तो सरासरीं फर्लांग दीड फर्लांगावर एक तागाचं शेत होतं तिथपर्यंत तो माग नेऊन घालविला. पण पुढें मागाचा नीटसा छडा लागेना. ती जखलेली मादी त्या तागाच्या शेतांत जाऊन पडली कीं आणखी कुठं अडचणीत जाऊन खुपसून बसली हें कांहींच समजेना. त्या शेताच्या बाधाबाधानीं आम्ही किती तरी वेळ चांचपडत फिरत होतों. ‘ कदाचित् ती वाघीण अद्याप जिवंतहि असेल अन् त्या शेतांतच कुठं तरी दबा धरून बसली असेल, काय नेम सांगावा ?’ माझ्या शंकेचं निरसन करून घेण्याच्या इरायानं त्या शेताच्या मध्यावर.बंदूक रोखून मीं आणखी दोन तीन आवाज टाकले, पण छे ! सगळीकडं कस अगदीं

सामसूम ! पटेलाला आता मीं त्याचीं दोन्हीं कुत्री मोकळीं सोडावयास सांगितली त्या कुत्र्यांना मोकळं सोडल्याबरोबर ती प्रथम थोडा वेळ इकडं तिकडं वाफडली, अन् नंतर त्या तागाच्या शेताच्या एका कोंपऱ्यावर असलेल्या मऊ अशा वाळसरापाशीं जाऊन कांहींतरी हुंगत अन् मागल्या पायानीं उकरीत बराच वेळ उभी राहिली तीं कुत्रीं तिथं नादावलेलीं पाहून माझ्या मनात काहीएक सूचक कल्पना उद्भवली म्हणून प्रद्योतबाबूंना अन् त्या पटेलाला घेऊन मी तिकडं निघालों. जाताना माथ्यावर एक दोन घारवटं फिरताना पाहून, " ती बहुतेक कुठ तरी अडचणींत जाऊन मरून पडली असावी, " अस प्रद्योतकुमार म्हणाले. पण ती त्यांची अटकळ निखालस चुकीची होती. " मेलेल्या वाघावर गिधाडंसुद्धां फार करून येऊन पडत नाहीत, " मीं खुलासा केला. मी वाघीण हमखास जिवत आहेच असं म्हणण्याचा माझा इरादा नव्हता. पण हरणं, डुकर वगैरे इतर प्राण्याच्या मुर्दाडासाठीं ज्याप्रमाणं घारवट-गिधाडं अंतराळांत घिरट्या घालीत रहातात, त्याप्रमाणं मेलेल्या वाघाच्या कलेवरासाठींच त्याचं अंतराळांतलं अस्तित्व असाव असं गृहित धरून चालल्यास दगा होण्याचा सभव असल्यामुळंच प्रद्योतबाबूंना मीं जाणूनबुजून ती इशारत दिली होती.

   

त्या वाळसरापाशी येताच पटेलाला त्याची कुत्रीं आवरावयास सांगून आम्हीं बारकाईनें त्या जागेची तपासणी केली तेव्हां जागजागीं रक्ताचे थेंब ठिबकल्याचं आमच्या दृष्टोत्पत्तीस आलं. " अस असून मागाचा असा बुचकळा कां व्हावा ? माग इथल्याइथंच गुप्त कसा झाला ? "

किती तरी वेळ आम्ही या मुद्याची भवति न भवति करीत तिथ बसलों होतों. इतक्यांत माझी नजर त्या वाळसराच्या अगदी कडेवर दिसत असलेल्या

एका बारीकशा उचवट्याकडं गेली. प्रद्योतकुमार अन् मी दोघहि उठून तिथं जाऊन पहातों तों जखमांमुळ व्याकूळ होऊन गेलेली ती वाघीण त्या जागी खूप वेळ आपलं अंग घोळसून निघून गेल्याच्या कित्येक निशाण्या आमच्या नजरेस पडल्या तिथली बुकणीसारखी वाळू त्या वाघिणीच्या रक्तानं तांबडसर होऊन गेली होती, तिच्या रक्तात वाळू भिजून बनलेले काही खडेहि तिथं आमच्या दृष्टीस पडले, अन् लोळून लोळून बनलेल्या त्या खळग्याच्या एका कडेवरच वाळू जमून मा मघा पाहिलेला तो उचवटा आलेला होता. आम्हांला इतका वेळ पडलेल कोड आतां सुटल्यासारखच होतं. त्या जखमी झालेल्या मादीच्या शरीरांतून बराचसा रक्ताचा निचरा अगोदरच होऊन गेलेला होता अन् नतर त्या जखमातून माती बसून रक्तस्राव व्हावयाचा तात्पुरता थांबला होता अर्थात् तिथून पुढं माग खंडित झाला हें उघडच होतं

   

आतां त्या पटेलाला मी त्याची कुत्रीं पुन्हां मोकळी सोडावयास सांगितलीं. त्यानं तीं सोडतांक्षणीच त्या शेताच्या कोपऱ्यापासून वर गेलेला तो बाध धरून ती निघाली आम्हीहि हळू हळूं त्याच्यामाग सावधगिरीनं निघालों सरासरी वीस पंचवीस कदम झपझपा गेल्यावर ती कुत्री एकदम रोखल्या-सारखी झाली. आम्ही जवळ येतांच बाध सोडून ती पिकांत शिरली. तोंडान एकसारखी गुरगुर करीत ती एका विवक्षित टापूंतच वेढे घालीत फिरत बांधापर्यंत येत आणि पुन्हां आंत शिरत. त्या मुक्या प्राण्यांच्या या विशिष्ट कृतीत निःसंशय कांहींतरी अर्थ होता. मी आपल्या बंदुकीचं तोंड वर आकाशा-कडं करून आणखी दोन आवाज काढले. त्याबरोबर तीं कुत्रीं सपाट्यानं त्या पिकांतून बाहेर पडलीं अन् जोराजोरानं भुंकूं लागली. झपाझप पावलं टाकीत प्रद्योतबाबू अन् मी बेधडक त्या तागाच्या पिकांत शिरलों. थोडेसे आंत शिरतों तोंच श्वापद दरपल्याची उग्र घाण आम्हांला येऊं लागली. तीं कुत्रींहि

आमच्या पाठोपाठ पुन्हा पिकांत घुसली. आम्हापासून दहा बारा हातांवरच एका ठिकाणी तें तागाचं पीक जमिनीवर लोळल्यासारखं दिसत होतं म्हणून जिज्ञासेनं आम्ही तिकड वळलों, तो ती कुत्री आमच्या अगोदर जाऊन त्या ठिकाणीं हजर! तिथं जमिनीवर पसरलेल्या डहाण्या वाघिणीच्या त्या अचेतन शरीराकड बघून तावातावानं भुंकता भुकतां ती कुत्री पुढल्या दोही पंजांनीं एकसारखीं माती उकरीत पण आपल्या शेंपट्या मात्र मागल्या दोन पायामध्यें अधिकच खोचून धरीत!

## जादूगार !

## १६

**फार** भारीपैकीं ब्ल्यूसर्ज् सूट, ड्रेसपॅन्ट् अन् फ्रॉक्‌कोट–पेहेरला होता त्यानं, अन् त्या कोटाच्या रुंद कॉलरीवर दोहों बाजूंनीं विविध आकारांचीं दहा बारा सुबक सोनेरी मेड्‌ल्स् मोठ्या आकर्षक पद्धतीनं लटकावून दिलीं होतीं. त्याच्या डाव्या हाताच्या करांगुलीशेजारच्या बोटांत फिकट निळ्या खड्याची अंगठी चम्‌चम् करीत होती. पायात क्रोम लेदरचा चकचकीत काळा शू होता त्याच्या. त्याचा सूट काळा, अन् वर्ण तर नितांत काळा करजत ! रानडुकराच्या सुळ्यांप्रमाणं बाहेर आलेले त्याचे पुढले दोन पांढरे शुभ्र दांत त्याच्या त्या एकंदर रुबाबाला साजेसेच होते

आपल्या हातांतली पोर्ट्‌मॅन्टो हेलकावीत हेलकावीत सदरहू महाशय थेट मी बसलेल्या बाकापाशीं येऊन उभे राहिले. हमालाजवळची होल्डऑाल अन्

आपल्या हातांतली पोर्टमॅन्टो त्यानं बाकावर ठेवली, अन् अगदीं फारा दिवसाची पछान असल्याप्रमाणं, 'कुठ निघाला आपण ?' म्हणून हंसत हसत त्यानं मला प्रश्न केला ! त्या बिलकुल अपरिचित इसमाचा तो प्रश्न ऐकून मी तर पुरा पुरा चाट होऊन गेलों.

अद्यावत् पोषाख केलेल्या या इसमाकडे दृष्टिक्षेप करतांच, हा मनुष्य मोकळ्या मनाचा नमाना असा तत्काल पहाणाराचा ग्रह होई; इतकेंच नव्हे, पण तो कमालीचा आतल्या गाठीचा, मतलबी अन् कावेबाज असावा याबद्दलही शंका उरत नसे त्याचे ते चमूचमू करणारे खोल डोळे ! काहीतरी विलक्षण गूढ अशी छटा त्याच्या त्या नजरेत स्पष्टास्पष्ट दिसत असे.

एका शिकारीचे प्रसंगीं नादुरुस्त झालेली माझी रिव्हॉल्व्हबोअर गन् दुरुस्तीसाठीं मी दौंडच्या रेल्वे लोको वर्कशॉपमधल्या एका कसबी टर्नरकडे आज कितीतरी दिवस टाकलेली होती ती घेऊन पाटसाच्या गाडीची वाट पहात मी प्लॅटफॉर्मवरल्या एका बाकावर स्टॉलवरून घेतलेल एक दैनिक उलथं पालथ करीत बसला होतों त्याच्या प्रश्नाच उत्तर न देताच 'ओळख पटत नाही आपली' अस मी किंचित् दिलगिरी दर्शवून पण थोड्याशा तुसडेपणानच त्याला म्हणालो.

यावर, "किती सीध्या स्वभावाचे गृहस्थ आहांत हो तुम्ही !" अस म्हणून अन् किलकिले डोळे करून तो फारच चमत्कारिक तऱ्हेनं मजकडे बघून हंसला 'प्रो. टी अय्यंगार' असं नाव सांगितल त्यान आपलं, अन् आतल्या जाकिटाच्या आडव्या खिशातून आपल नावपत्ता छापलेली एक सुंदर परिचय-पत्रिका काढून त्यान माझ्या हातात दिली.

> *प्रो. टी. अय्यंगार*, बी. ए.
> हिप्नॉटिस्ट् ॲण्ड मॅजीशिअन्,
> भोपाळ गेट, लाल बावडी,
> **अलीगड सिटी.**

असं नावपत्ता असलेली ती पत्रिका वाचून मी ती त्याची त्यास परत देऊं लागलो तों, "असू द्या, असू द्या ती आपल्याजवळ आता आपलाही परिचय करून दिल्यास फार आनंद होणार आहे," तो म्हणाला

काय असेल तें असो, त्याच तें मिठास बोलण माझ्या कानांस मधुर न लागता सळसळल्याप्रमाणंच कानात शिरल्यासारखं मला वाटलं

हा मद्रासी इसम अलीगडसारख्या बकाल शहरात रहातो हें ऐकून प्रथम मला नवलच वाटल पण काय सांगावं ? हे जादूटोणा अन् रमलवाले त्या बाजूलाच फार असल्याचा लौकिक मी ऐकून होतों शिवाय ही धंद्याची बाब आहे, हातचलाखीचे, जादूचे अन् हिप्नॉटिझम्चे प्रयोग करतो म्हणूनच केवळ या इसमाबद्दल आपण वाईट ग्रह करून घेण्यात अर्थ नाहीं. खेरीज माणुसकीच्या दृष्टीनही आपल्याला त्याच्या प्रश्नाचं उत्तर द्यावयासच हव, असा पोक्त विचार करून मी त्याला म्हणालो— "शेतकरी आहे इथला एक मी हे शेजारीच पाटस नांवाचं खेड आहे, तिथ शेतीभाती करून मी असतो दुरुस्तीसाठीं माझी बंदूक इथल्या एका कारखान्यात टाकली होती ती नेऊ मी गांवाकडे जाण्यासाठीं गाडीची वाट बघत बसलों आहे."

"आपल्या हातांतल्या बदुकीमुळच विशेषतः माझ चित्त आपणांकड वेधल गेल. अन् त्याला तस कारणही आहे शेती आहे म्हणून आपल्याला शेतकरी म्हणायच, असंच ना ? हाडाचे शेतकरी दिसत नाहीं आपण शिकारी-बिकारीचा शोक आपणाला आहे काय ?"

"करमणूक म्हणून जातों अधूनमधून मी रानांत"

"बराब्बर उतरला माझा कयास. शिकारीचीं कोणकोणतीं श्वापदं मिळतात इकडल्या रानांत ?"

"विशेषसं जंगल नसल्यामुळ बडी श्वापदं इकडं मिळू शकत नाहीत.

हरणं, रानडुकरं अन् तुरळक तरस वगैरे लहान जातीचीं श्वापदं तेवढी इकडे मुबलक आहेत "

" तरस आहेत म्हणता इकडल्या बाजूला ? "

" खुद्द आमच्याच गावीं अलीकडे वर्ष दीड वर्ष एक तरसांची जोडी खूप धुमाकूळ घालून राहिली आहे तरसाच्या जातीला गाढव अन् कुत्री भारी प्रिय बारमहा इथं अन् या गावाभोवनालच्या वाड्यांमधून बेलदार लोकाची वसती असते, त्यामुळ गाढवंही पुष्कळ आहेत इथं त्याच्या वासावरच ते प्राणी येऊन इथ इतक्या दिवस ठरले आहेत. "

" असं असेल तर आपण मजकरिता इतक कराल काय ? मी मॅजीशिअन् आहे हें मी आपणाला मागितलच माझ्या धंद्यासाठी मला तरसाच्या हाडाच्या सबध सागाड्याची फार फार गरज आहे आपण काय वाटेल तें म्हणा, पण मला मनुष्याची अन् मनुष्यस्वभावाची जी थोडीफार पारख आहे त्यावरून आपण शिकारीचे बरेच नादी असावेत असं वाटत. आज किती तरी दिवस मी या वस्तूच्या तपासात आहे पण माझी इष्ट वस्तू पुष्कळ प्रयत्न करूनही आजवर मला लाभू शकली नाही. आपण जर मला ही चीज पैदा करून देऊ शकत असाल तर—राग येऊ देऊ नका—मी त्यासाठीं आपणास दोनशें रुपये अन् होईल तो खर्च खुषीनं द्यावयास तयार आहे. कराल का माझ एवढं काम ? "

त्याचं तें आर्जवी बोलणं ऐकून मी अधिकच विस्मयचकित झालों. शिकारीवर आजपर्यंत मी कमाई अशी केव्हाच केली नव्हती. उलट पाण्यासारखा पैसा ( अर्थात् माझ्या मगदूराप्रमाणं ) या शोकापायीं मी खर्च करीत आलों होतो. पण आज माझ्या मनानं काय घेतल कुणास ठाऊक ! या सर्वतोपरी अनोळखी अन् अपरिचित मनुष्यासाठीं आपण रिकाम्या खस्ता काय म्हणून खाव्या ! तो धंद्यासाठीं आपणापाशीं जी दुष्प्राप्य वस्तू मागत

आहे, तिचा त्यानंहून देऊं केलेला मोबदला घ्यावयास काय हरकत आहे ! शिकार साधल्यास बसल्या बसल्या अनायासानं दोनशें रुपये मिळून जातील अन् गावकऱ्यांच्या मागची उपाधी टळल्यामुळं त्यांचाही दुवा आपणांस मिळेल असा विचार करून मी प्रोफेसरमहाशयाना तत्काल हो भरली. प्रो. महाशयांची तबीयत एकदम खुषी होऊन गेली अन् मीही स्वतःच्या व्यवहारचातुर्याची स्वतःच मनमुक्त प्रशंसा करून घेतली.

" तर मग मी तुमच्याबरोबरच येतो तुमच्या गांवीं. आणखी असं पहा, माझं मंत्रतत्रादि नित्याचं कांहीं आन्हिक असतं, त्यासाठी आपण मला एकादी प्रायव्हसी ( एकांत ) असलेली कोठडी देऊं शकाल ना ? "

" अवश्य, अवश्य. " इतक्यात गाडी सुटल्याची घंटा झाली म्हणून मी आम्हा उभयतांचीही तिकिटं काढून आणून पुनरपि प्लॅटफॉर्मवरल्या बाकावर येऊन बसलों. थोडयाच वेळांत गाडी येऊन प्लॅटफॉर्मला लागली. आम्ही दोघेही जाऊन डब्यांत बसलों आमच्या गप्पांना जणू अगदी बहर आला होता प्रो. मजकुरांची कळी आतां चागलीच खुलली होती, अन् डब्यातले उतारू प्रो. साहेबांकडे कांहीशा कुतूहलानं अन् काहीशा अपूर्वाईनं टकमका बघत राहिले होते.

पाटस स्टेशनावर गाडी खडी होतांच आम्ही दोघंही डब्यांतून उतरून पडलों स्टेशनमास्तराशीं थोडीशी बातचीत करून अन् प्रो. महाशयांशीं त्यांचा परिचय करून देऊन सदू पोर्टरानं जुपून आणलेल्या गाडीत आम्ही आरूढ झालों अन् ताबडतोब मळ्याचा रस्ता सुधारला.

आमची गाडी सावकाशपणं मळ्याचा मार्ग आक्रमीत होती. प्रोफेसर मजकूर वाऱ्यानं उडालेला आपल्या कपडयांवरील फुपाटा वरचेवर झटकून टाकीत, तोंडावर हातरुमाल धरून दिलगीर चित्तानं गाडीत चुळबुळ करीत बसले होते. त्यांच्या भपकेदार पोशाखाची वाऱ्यानं करून टाकलेली खराबी

बघून त्याच्याबद्दल मला कमालीची अनुकंपा वाटत होती. गाडीवाला काण्या नजरेनं माझ्या फॅशनेबल् पाहुण्यांकडं राहून राहून कटाक्ष फेंकीत होता, अन् रस्त्यानं जाणारेयेणारे खेडवळ वाटसरू गाडींतल्या त्या कृष्णवस्त्रावगुंठित काळ्याकुट्ट साहेबाला चालता चालतांच थबकल्यासारखं करून मोठ्या अदबीनं अभिवादन करीत होते

   

पाहुण्यांची सोय जिकडल्यातिकडे लावून दिल्यावर आम्हीं भोजन उरकलं, अन् थोडया वेळानं मी जाऊन माझ्या बिछान्यावर अंग टाकलं बराच वेळ मी झोपेची आराधना करीत पडलो होतों, पण ती प्रसन्न होण्याचं लवमात्र चिन्ह दिसेना. माझ्या डोक्यात त्या नव्या पाहुण्यासबंधींच कसले तरी विचार थय्मान घालून राहिले होते काय असेल तें असो, या नव्या पाहुण्याबद्दल मनाला खुलासपणा कसा तो वाटेचना. जेवताना त्यानं खाद्य-पदार्थांची केलेली वाखाणणी मला वाजवीपेक्षा थोडीशी अधिकच वाटली. त्यानं स्वत करिता आवर्जून केलेली एकान्त असलेल्या खोलीची मागणीही मला जराशी चमत्कारिकच भासली कुणीं पैपाहुणा आल्याचा मला सदोदित आनंदच असे. माणूसघाण्या स्वभाव असा माझा नव्हताच, पण या मद्रासी पाहुण्याचं पाऊल उंबऱ्यात पडल्यापासून माझ्या अंतर्यामीं उगाचच कसली-तरी हुरहुर लागून राहिल्यासारखी झाली होती 'आपणांला कुणींतरी बनवीत तर नाहीना?' असही एकवार माझ्या मनांत येऊन गेलं; अन् त्यामुळं मन बेचैन होऊन गेलं. अशा स्थितींत मध्यरात्र उलटून गेली, तरीही डोक्यांतलं विचारचक्र थांबेना. शेवटीं, 'आपल्या तर्कटी मनाला आपण आकळलंच पाहिजे, एकाद्याबद्दल निष्कारण वाईट ग्रह करून घेण्यांत अर्थ नाहीं,' असा निर्धार करून मनातले ते सारे उपरे विचार मी झडझडून

झाडून काढले, अन् उदईक नाईक मंडळीना बोलावून घेऊन शिकारीचं काय तें मुक्रर करून टाकावं अस मनाशी ठरवून टाकलं.

   

माझ्या घरांत लावून ठेविलेले वन्य श्वापदाचे मुखवटे पहाण्यांत प्रो मजकूर रमून गेले होते. नानवीजच्या वायरलेस् बीम् स्टेशनचा जर्मन् इंजीनिअर आपल्या दोघातिघा शिकारी दोस्तासह मला डुकराच्या शिकारीसाठीं बोलाविण्यास आलेला होता, त्यास लिंबाच सरबत पाजीत मी घरापुढल्या बगीचात बसलों होतो विठोबा लोहार घोड्याची नालबदी उरकून माझा निरोप घेण्यासाठी बागेच्या कपाउंडाच्या जवळपास येऊन घुटमळत होता; इतक्यांत गांवाकडून नाईकमडळीच टोळकही येऊन तिथ थडकल

'माझ्यामाग आज दुसऱ्या काही महत्त्वाच्या उद्योगाची निकड असल्यामुळं मला आपणांबरोबर आज येतां येणार नाही,' अस सागून मी आलेल्या त्या गौरकाय पाहुण्याना वाटेला लावल, अन् मग नाईकमडळीशीं वाटाघाट करीत बसलो.

"अशा अशा कारणासाठी मुद्दाम आलेल्या माझ्या या पाहुण्यांना तरसाच्या सांगाड्याची फार जरूरत आहे गावकऱ्यानाही या प्राण्यानीं खूपच सतावलं आहे. तेव्हां पाहू या तर एकवार प्रयत्न करून शिकार झाल्यास मी तुम्हास चांगली बक्षिसी देईन" मी त्याना म्हणालो

"कायबी नग आमाला तुमाकडनं बक्षिशी ! ही बेलदारं आख्या रामुसवाडयाला बकऱ्याच्या सागुतीच जेवण घालाया आक्षी योका पायावर तयार हैती या जित्राबाचा काटा काढल्यावर."

"मग केव्हांचा बेत करता ? आपल्याला एकदां त्याचा ठावठिकाणा तर माहीत पडावयास हवा. त्यासाठी मला वाटत, ..."

"छा ! इकत नगच आदबायाला. इवागरात आमा रामुशाचा येव हाय् नाय् का ! त्याच्या वरलाकलूडया घळीलाच दाट काटवणांत आक्षी बिनघ्वार पडून असत्यात ती जित्राबं कुत्र्यांच्या मुंडक्यांचा आन् टगड्याचा निसपत खच पडल्यावानी झालाया तथ. दोन रोजच झाल असत्याल, आमच्या रामुशाच्या वाया गेलत्या मोळ्या आनाया रानामधी तव्हां त्याच्या चाहुलीनं तीं दोनीबी जनावर त्या घळीलाच योका येलतुराच्या जाळीमंधी सायतानशी उठलीं जनावर आक्षी धट झाल्यानी लाडग्यावानी वाडगी उडउडू मेंढर लाबवू लागल्यात अड्याल अड्याल !"

"मग तुम्ही असं करा, आजच लावा तिकडे रानात कुणाला तरी. जितकं लवकर हे काम होईल तितकं बर पाहुण्याना उगाच लोबकळत किती दिवस ठेवायच ?"

"जानत गडीच लावाया हवत त्याचा मागमुग्रा काडाया आमी सवता जातीनंच दुपारा जाऊनशान् पघतो समदं रान धुडूनशान् आन् बराबर पत्त्या लागलाच तर रातचंच येनो तुमासनी वर्दी द्याया."

"काढाच त्याचा तपास कसही करून मी तुमची अगदी वाट पहात बसतों. अन् त्याचा नक्की छडा लागला तर देऊ उद्याच बार उडवूनन् काय !"

   

तंतोतंत माझ्या अपेक्षेप्रमाण सगळं काही घडून आलं. त्या विवक्षित घळीलाच ती श्वापद हमखास उठतील अशी बातमी नाईकमंडळीकडून त्याच रात्री मला मिळाली. लक्षा कुंभाराच चुकलेलं गाढव त्या प्राण्यानींच लुंगवलं अस त्यांच्याच मुखानं मला कळलं रानांत निघण्यास अशी सर्वतोपरी

अनुकूल परिस्थिति असल्यामुळ नाइक मडळींना उद्ईक तयार रहाण्यास सांगून मीही पुढल्या तजविजीस लागलों

मोठ्या पहांटेच उठून प्रातर्विधि उरकून मी स्नान करून घेतलं. चहापाणी उरकून कपडे चढवितों न चढवितो तोंच राघूनं गाडी आणून दारांत खडी केली. रामोशांच्या देवाच्या अलीकडल्या अगाला असलेल्या जुन्या खिल्लार-वाड्यापर्यंत साधारण गाडीवाट होती म्हणून, अन् शिकार लाभल्यास प्रो. मजकुराच्या प्रत्यक्ष नजरेखालीं तें श्वापद घालावं अशा इराद्यानं मीं आज गाडी घ्यायच ठरविल होतं. काडतुसाचा पट्टा, बंदूक, पाणेरं अन् पोटपूजेचं थोडस साहित्य मीं गाडींत टाकलं, अन् आता गाडींत चढून बसणार तोंच, प्रो. मजकुरांनीं "मी येऊं का तुमच्याबरोबर शिकारीची मौज बघावयास जंगलांत ?" असा सवाल मला टाकला.

मला जें नको होतं तेंच नेमकं माझ्या कर्माला आल.

"स्पष्ट बोलल्याचा राग येऊ देऊं नये आपण आपणांला जगलातली तकलीफ सोसणार नाहीं, आपण आरामांत घरीं बसावं तेंच चागल." मी—

माझ्या सडेतोड बोलण्यामुळं त्यांचा विरस झालेला पाहून मला थोडसं वाईटच वाटलं. पण त्याला माझा उपाय नव्हता दिवसातून तीन वेळां बुटाला पॉलिश करणाऱ्या, अन् क्षणाक्षणाला केंसांमधून कगवा फिरविणाऱ्या त्या छानछोकीदार पोषाखी गृहस्थाला बरोबर वागविणं म्हणजे गळ्यांत तें एक लोढणंच अडकवून घेण्याप्रमाणं होतं इटली युद्धांत पडल्यामुळ जर्मनील। ज्याप्रमाणं नसती अडचण झाली, त्याप्रमाणं या पाहुण्याला बरोबर घेतल्यामुळं आम्हाला नसती उपाधी होऊन खेळाचा सत्यानाश होण्याचाच सभव अधिक होता रानांत गेल्यावर आम्हीं आपला उद्योग बघावा कीं या इसमाचे इतवार– तालेवार सांभाळावे ? मद्राशांचा लाबरट स्वभाव मला पुरता ठाऊक असल्यामुळं यावेळीं मला थोडसं निर्भीड बनावं लागलं.

प्रे. मजकुरानीं तोंड फिरविताक्षणीच मी झटकन् गाडीत चढून बसलों, अन् राघूच्या हातांतला आसूडाचा खुळखुळा खळाळल्याबरोबर गाडीचे बैलही सपाट्यानं निघाले

सरासरी दीड एक घंट्यान आम्ही डोंगरांतल्या जुन्या खिल्लारवाडयापाशीं येऊन पोहोंचलो. राघूनं गाडी तिथल्या मोगली एरंडाच्या ओसाड वाडग्यापाशीं असलेल्या एका बाभळीच्या सावलीला सोडली, अन् मी माझ्या सहकाऱ्यांसह आमच्या खेळाच्या नियोजित ठिकाणाकडं कूच केलं.

खेळाच्या जागी दाखल होताच प्रथम त्या लांबलचक अन् खोल घळीच्या दोन्हीं कडा मी काळजीपूर्वक टेहळून ठेविल्या. त्या काटवणाभोंवतीं एक चक्कर टाकून आलों अन् तत्काल रानकाढे कांटवणात घातले.

काटवणाच्या तीनही बाजू दाबून गडी रान उठवीत निघाले, अन् सावज घळ धरूनच बाहेर पडेल अशी पुरेपूर खात्री असल्यामुळ मी त्या घळीच्या तोंडाशीच असलेल्या एका तरवडाच्या झुपक्यात तयारीन राहिलों.

सावज बाहेर पडावयास वेळ लागणार नाहीं हें मला पुरतं ठाऊक होतं. तरसाच्या जातीच श्वापद खुनशी अन् क्रूर पण तितकंच भित्र असतं रगेल अन् लढाऊ वृत्तीच्या रानडुकराप्रमाणं, माणसांचा वारा पडल्यावर अडचणीत तें फार वेळ दम काढू शकत नाहीं, अन् डुक्कर बेदरकारपणानं बाहेर भडाडल्यावर शिकाऱ्याला आगाऊच त्याची चाहूल लागते, त्याप्रमाण या लपत छपत य पलाय करणाऱ्या चोरट्या प्राण्याची चाहूल लागूं शकत नाहीं, अस असल्यामुळं मी बंदुकीचा हॅमर उचलून त्यांच्या वाटेकडं तक्षकाप्रमाणं नजर लावून बसलों. डोळ्यापुढ येणाऱ्या झुडपाच्या एकदोन डहाळ्या खुडून टाकल्या, एवढ्यांत रानकाढ्याच्या श्वापदं उठल्याच्या इशाऱ्याच्या आरोळ्या कानावर पडल्यामुळं मी उजव्या हातच्या चढणीच्या तरफेला मान वळवून पहातों तों, एकामाग एक ते दाट भुऱ्या केंसांचे दोन्हींही तरस मुरत कुलपत

संथपणें त्या घळीच्या कडेच्या झडोऱ्याची अडचण धरून वाट काढीत आहेत! तत्काल एक एल जी. शॉट् टाकून त्यांपैकीं एकाला मी जागच्या-जागी लोळविला. पण तेवढ्यात तो दुसरा तरस झुकांडी देऊन दृष्टीआड झाला तो पुनश्च म्हणून माझ्या दृष्टीला पडला नाही.

❦ ❦ ❦ ❦

गड्याची जमाजम झाल्यावर मारलेला तो तरस गाडीच्या शिडींत चढवून अन् दोघे तिघे गडी बरोबर घेऊन मी मळ्याकडं परतलों. बाकीची नाईक मंडळीही गांवाकड निघून गेली.

आमच्या गाडीची चाहूल लागताच प्रो महाशय आतून धावतच बाहेर आले. शिकार आपल्या नजरेनं पाहिल्यावर त्याची विषादग्रस्त मुद्रा एकदम प्रफुल्लित दिसूं लागली, अन् त्यानीं आम्हा सर्वांचच मिठ्ठास वाणीनं पुनः पुन्हा रेलचेल अभिनदन केल.

❦ ❦ ❦ ❦

त्या श्वापदाचा सागाडा काढून घेण्यासाठीं दुसऱ्या दिवशी सकाळीं मी माझा एक माणूस महारवाड्यात शिरप्या ढोराकड पाठविला होता त्यान येऊन, "देतो आक्षी तुमच्या मनाजोगतं नीट करून...पर...पर...लईच बकतो त्यो!" अस त्याचं म्हणण स्वत.च्या अभिप्रायासह मला सुनावलं

"काय म्हणतो तरी काय तो?"

"धा रुपये मांगतो त्यो!"

"कर कबूल. त्याच्यावाचून दुसर कोण करून देणार हें काम?"

❦ ❦ ❦ ❦

शिरप्यानं त्या श्वापदाचा सांगाडा शाबूत काढून चांगला स्वच्छ करून दिला, अन् प्रो. साहेबानींही खुषी होऊन दहा रुपयांची एक कोरी करकरीत नोट तत्काळ त्याच्या हातावर ठेविली. शिरप्यानं जमिनीपर्यंत लवून

प्रोफेसर साहेबाना मुजरा केला, अन् मग हर्षभरानं तो महारवाड्याकडं चालता झाला.

   

प्रो महाशयाचा कार्यभाग मनाजोगा उरकल्यामुळ आतां परत फिरण्याच्या तजविजीला ते लागले तो सांगाडा एका मजबूत खोक्यांत पॅक करून मी पुढ स्टेशनवर रवाना करून दिला. भोजनोत्तर प्रोफेसरांनीं ठरल्याप्रमाण शंभराच्या दोन नोटा माझ्या हवालीं केल्या, अन् शंभरांची आणखी एक नोट माझ्या हातीं देऊन तिची मोड त्यानी मजपाशीं मागितली. झालेला खर्च देण्यासही ते उत्सुक होते, पण " दोनशें रुपयांत सर्व काहीं भागलं, " असं म्हणून मी त्याची ती ऑफर स्वीकारली नाही. त्याना हवी असलेली मोड इकडून तिकडून भरती करून दिली अन् "सायंकाळीं सव्वाआठच्या गाडीला पाहुण्याना स्टेशनवर पोहोंचवावयाच आहे, गाडी तयार असू दे," असं गड्याला बजावून मी जरासा आडवा झालों.

   

गाडीची वेळ होत आल्यामुळं चहापाणी उरकून आम्ही स्टेशनवर जाण्यास निघालों. थोड्याच वेळात आम्ही स्टेशनवर येऊन पोहोंचलों. गाडी सुटेपावेतों स्टेशनमास्तराशीं इकडल्या तिकडल्या गप्पा छाटीत बसलों होतों आम्ही मास्तरानी मुंबईचं दुसऱ्या वर्गाचं तिकीट माझ्या पाहुण्यांच्या हातीं दिल्यावर प्लॅटफॉर्मवर जाऊन येरझारा घालीत आम्ही गाडीची वाट पहात होतों. गाडीच्या आगमनाची वर्दी उतारूना देण्यासाठी झालेला घंटानाद वातावरणांत विलीन होतो न होतो तोंच, सर्च लाइट्‌प्रमाणें लायनीवर प्रकाशझोत फेकीत मंदगतीन गाडीचं एंजीन यार्डात शिरल माझे

आभार मानून अन् मला अभिवादन करून पाहुणे आपल्या डब्यात चढून गेले.

गाडी सुटता सुटता पाहुण्यानी माझ्याशी पुन्हां एकवार शेकहॅन्ड केला, अन् माझ्याकड विलक्षण चमत्कारिक तऱ्हेनं बघतां बघतां त्यांनी निखालस चिरड येण्याजोगं त्रिकट हास्य करून अन् डब्याच्या खिडकीतून वामहस्तान हॅट बाहेर काढून आपल्या उजव्या हातांतला लाल जाम्बदी रंगाचा हातरुमाल खालींवर जोरानं झटकारला

   

रविवार–दौंडच्या बाजाराचा दिवस–होता आजचा. शिरप्या आपल्या एका जिगर दोस्ताला बरोबर घेऊन फर्दुनजीच्या गुत्त्यांत जिवाची उमाप चैन करीत मजेत बसला होता लोटपोट होईतो बेवडा झोंकल्यावर चणे चघळता चघळतां त्यानं आपल्या कुडत्याच्या खिशांतली दहा रुपयांची नोट काढून फर्दुनजीच्या हातात दिली अन् अगदी घाईला आल्याप्रमाणं तो बाकीचे पैसे वापस मागूं लागला शिरप्यानं दिलेली ती नोट (!) फर्दुनजीनं कितीतरी वेळां उलटीसुलटी करून पाहिली शिरप्यासारख्या हलक्या माणसानं आपल्यासारख्याची अशा रीतीनं मस्करी करावी ही गोष्ट त्याला सहन झाली नाही तो संतापानं अगदी लाल पडून गेला, अन् कांहींएक विचार न करतां त्यानं फाडकन् शिरप्याच्या एक श्रीमुखांत ठेवून दिली !

   

दुसऱ्या दिवशीं दिवस उगवतो न उगवतो तोंच शिरप्या माझ्या मळ्यात येऊन हजर !

त्यानं काल दौंडास घडलेला इत्थंभूत प्रकार डोळ्यात पाणी आणून मला

निवेदन केला. माझ्या पाहुण्यानं त्याला दिलेल्या नोटीचा पांढरा स्वच्छ कागद बनल्याचं वृत्त ऐकून मी तर हतबुद्ध झाल्यासारखा झालों. तत्काल घरात जाऊन मी प्रो. मजकुरांनी दिलेल्या, कपाटांतल्या डायरीत ठेविलेल्या शंभरांच्या तिन्ही नोटा धुडूं लागलों. त्या नोटाच्या ऐवजी, नोटाच्या आकाराचे तीन कोरे करकरीत चिवट चिकण्या कागदाचे तुकडे माझ्या हातीं लागले. कितीतरी वेळां ते तिन्हीं तुकडे मीं उलटे सुलटे करून पाहिले. मी जागा आहे की स्वप्नात आहे याची माझी मलाच भ्रांत पडली. पुन्हा मी ते कागदाचे तुकडे उजेडात धरून पाहूं लागलों. तों त्या प्रत्येक तुकडयाच्या पोटी एकामागं एक वॉटरमार्कमधलीं सुस्पष्ट अक्षरं उमटूं लागलीं:—

*जा – दू – गा – र !*

## शिकारीचा एक वेगळा पर्याय—
## शिकारी चित्ते

## १७

कोल्हापूरकर कै. शाहू छत्रपतिमहाराज यांस या खेळाचा मनस्वी शोक होता व त्यानी फार खर्च करून या खेळासाठी खास स्वतःचे देखरेखी-खालीं उत्कृष्ट चित्ते शिकवून तयार करविले होते हें पुष्कळांस अवगत असेलच.

शिकार हा एक रिकामटेकड्या खुशालचेंडू लोकांचा नादानपणाचा खेळ आहे, असा शेरा मारून कित्येक अनभिज्ञ सामान्य लोक असल्या खेळास नाक मुरडतात; पण ' द्राक्षें आंबट ' इतकाच त्याचा अर्थ !

शिकारीचे अनेकविध प्रकार आहेत. त्यांतील एक अत्यंत हृदयगम

आणि प्रेक्षणीय असा सदर खेळाचा हा एक प्रकार आहे. जातीनें पराक्रम गाजविण्याची या खेळांत विशेष संधि व वाव दोन्हीहि नसली तरी पराक्रमाची आवड असणाऱ्या व्यक्तीशिवाय इतरांस हे खेळ सुचावयाचेच नाहीत, हें विसरून चालणार नाही

क्रूर जगली श्वापदांशी आणि हत्यारापात्याराशी थोडाफार संबंध याहि खेळात येतोच, आणि मोठ्या दक्षतेनें शिकवून तयार केलेली व माणसाळविलेली ही जंगली श्वापदे केव्हा आपल्या जातीवर जातील याचा भरंवसा काय धरावा ? शिकारीच्या प्रसंगी सावज खनम करून शेर बनलेलीं हीं श्वापदे ऐन वेळी बिथरल्याचे कित्येक दाखले पडलेले आहेत. अशा प्रसंगीं प्रसंगावधान राखून धैर्यानें आणि चतुराईनें त्या प्रसंगांतून निभावून जाणें हें 'येरे गबाळ्याचे' काम खामच नाही, आणि अशाच्या मताना कुणीहि दर्दी शिकारी किंवा जाणता मर्मज्ञ वाचक महत्त्व देईल असे वाटत नाहीं.

   

भाद्र्व्याचा महिना नुकताच निघाला होता. कुत्र्यांसाठी ढाशीवरून मारून आणलेले दोन्ही ससे गड्याच्या स्वाधीन करून, पडवीत मी पाऊल टाकतों एवढ्यात टपालवाल्यानं एक पत्र आणून माझ्या हातीं दिलं मी बंदूक खुंट्यावर ठेवली अन् लिफाफा फोडून पत्र वाचूं लागलों. आज फार दिवसानो गोविंदगडाहून कहानसिंगांकडून* पत्र आलेलं होतं तें. "गोविंदगडच्या चीफनी नव्यानच रोहिलखंडाहून दोन जवान शिकारी चित्ते आणविले असून, त्याच्या खेळाचा कार्यक्रम लवकरच व्हावयाचा घाटन आहे. मी फार खटपटीनं वशिला बाधून शिकार पाहण्यास परवानगी मिळविली आहे, तेव्हा तू पत्रदेखत निघून ये" असा मजकूर होता त्या पत्रात "जमल्यास

* 'सातपुड्याच्या एका पुड्यात' ही शिकारकथा पहा

आपणहि दोन दिवस कुठंतरी खेळू" अशी आशाहि लावून ठेवण्यास त्यान कमी केलं नव्हत!

ज्वारीच्या पेरणीचा हंगाम होता तो. योग्य वेळी पाऊस पडून वापसाहि चांगला झालेला होता. शिवारांतल्या दरोबस्त पाभारी हललया होत्या. अशा वेळी अन् नुसती शिकार पहाण्याकरितां एवढा खर्च करून जाण्याचं माझ्या जिवावर आलं; म्हणून मी त्याला नकारार्थी उत्तर लिहिलं; पण लगेच उलट टपाली, 'वरचेवर कांही असल्या शिकारी बघावयास मिळत नसतात. इतका कद्रूपणा तूं केव्हांपासून करू लागलास ?' वगैरे वगैरे लांबलचक प्रवचन त्यानं या दुसऱ्या पत्रांत झोडलं होतं, अन् ताजाकलम घालून मला निघून येण्याबद्दल कमालीचा आग्रह केलेला होता!

जुगारी अन् शिकारी याच्यासारखे आशावादी अन् हव्यासखोर प्राणी मला वाटतं, जगांत दुसरे कोणीहि नसतील! त्याच तें अतःकरणाच्या जिव्हाळ्यानं लिहिलेलं पत्र वाचून मलाहि मोह पडला, अन् गोविंदगडास जाण्यासाठीं अखेर मीं प्रस्थान ठेवलं.

   

चार दोन दिवस गोविंदगडास स्वस्थपणानं घालवावेत अशा विचारान पाटसहून मी निघालों होतों. पण सेंट्रल इं. रेल्वे ( मीटरगेज ) ची थोडीशी लाईन पावसामुळं नादुरुस्त झाल्यानं प्रवासांत माझी निष्कारण खोटी झाली. त्यामुळ मी अगदी ऐन वेळीं गोविंदगडास येऊन पोहोंचलों. कहानसिंग माझ्या वाटेकडे अगदी डोळे लावून बसले होते.

   

खेळाच्या आदल्या दिवशीच आम्ही, महाराजांच्या शिकार पार्टीची सोबत पाहून गोविंदगडाहून निघालों. खाशा स्वाऱ्या आणि त्यांचा परिवार उदईक यावयाचा होता.

या खेळासाठी चीफ साहेबानीं आणविलेली चित्त्यांची जोडी खरोखरीच प्रेक्षणीय होती. चित्ते लांबलचक, अगदी शेलाटे, पण त्यांची अंगकांति नुसती चमूचम् करीत होती. 'मेताब' अन् 'कोशीद' नावांचे त्याचे 'शेरिआ' जातीचे ट्रेनर उजाडल्यापासूनच त्याची सरबराई करण्यांत मग्न होऊन राहिले होते

'किमोर' पर्वताच्या पूर्व पश्चिम गेलेल्या एका फाट्याच्या पायथ्याशीं असलेल्या विस्तीर्ण सपाटीवरलें–दोन छोट्या नद्यांच्या दुआबांतलें–मैदान खेळण्यासाठी मुकर करण्यांत आलें होतें. गोविंदगडापासून नजीकच असले-ल्या या पठारापर्यंत महाराजाच्या हुकुमानें नुकताच एक सुंदर रस्ता तयार करण्यांत आला होता. पारध हमखास कोठें मिळेल याची वर्दी देण्याकरितां ठिकठिकाणी टेहळे ठेवण्यांत आले होते, आणि त्याच्याकडून वरच्यावर शिकारखाना अमलदारांकडे सूचना येत होत्या.

यथाकाल, खाशा स्वाऱ्या येऊन दाखल झाल्या. थोडयाच वेळात खेळाची सज्जड तयारी झाली, आणि शिकारी चित्त्याचे पिंजरे व त्यांचे पाठोपाठ महाराजांसह सर्व शिकारी प्रेक्षक खेळाच्या मैदानाकडे निघाले.

महाराजांनीं आणि त्यांच्या शिकारी सहकाऱ्यानीं दुर्बिणी डोळ्यांवर धरल्या आणि सरासरीं एक फर्लांगभर गेल्यावर सावज नजरेस पडल्यावरून सावजांवर बिचवे सोडण्याचा हुकूम खुद्द महाराजानीं दिला.

* * * *

चित्त्यांना पट्टे लावून खुले न्यावयाला वास्तविक काहीं हरकत नव्हती. पण या नवथर श्वापदांचा तितका भरंवसा न वाटल्यामुळं त्याना पिंजऱ्यां-तूनच खेळाच्या जागीं नेण्यात आल होतं

हुकूम होतांक्षणीच त्याना पिंजऱ्याबाहेर काढण्यांत आलं. त्यांच्या 'शेरिआ' ट्रेनरनी त्याना किंचित् गरम करण्याकरितां, त्यांच्या माथ्यावर प्रथम एकेक चपराक लावली, अन् 'वो देखो, वो देखो' असं म्हणून तत्काल त्यांच्या डोळ्यांवरली चामडयाची ढापणं सोडली

ढापण सोडताक्षणीच त्या दोघांहि श्वापदानी जबडा वासून एकेक प्रदीर्घ जांभई दिली एकवार आपली तीव्र नजर इकडून तिकडे अर्धवर्तुळाकार फिरविली अन् एकाद्या मुरब्बी तिरदाजाच्या हातून तीर सुटावा, त्याप्रमाण प्रथम मुरत मुरत, अन् सावज आवांक्यात आलीशी वाटल्याबरोबर लांब लांब झेपा टाकीत ते दोघेहि शेराचे बच्चे, परस्परांत समांतर राखून, झपाट्यानं सावजावर निघाले.

   

दिवस नुकताच कलू लागला होता आकाश अभ्राच्छादित होतं, वारंहि प्रतिकूल वाहत नव्हतं, अन् खेळाला सर्वतोपरी अनुकूल असच वातावरण होतं. आमची दृष्टि त्या उडया घेत निघालेल्या श्वापदांवर खिळून राहिली होती. महाराज आणि शिकारखाना-अमलदार रघुवीरसिंग आदिकरून मंडळी घोडयावरून त्या श्वापदांच्या पाठोपाठ झटकली, अन् आम्ही आणि आमच्यासारखे आणखी इतर बघेहि दबकत-दबकत खेळाच्या त्या निर्णायक स्थलाकडे निघालो

पुढें सरसावून निघालेल्या त्या एका चित्त्यान वाटेत आडवं आलेलं एक चितळ पंजाच्या एका फटकाऱ्यासरस लोळवल, अन् नंतर निमिषार्धातच त्या दोघांहि वखवखलेल्या श्वापदांनी दोन भले मोठे काळवीट गांठून त्यांस आपल्या जबडयात पकडले बघता बघता त्यानीं त्यांस जमिनीवर लोळविलें

आणि तोडांतल्या तोडात गुरगुर करीत, स्वारी भरल्याप्रमाण ते त्यांच्यावर सपशेल पसरले '

महाराज आदिकरून मंडळानी घोडयावरून भराभर उडया घेतल्या हर्षभरानं, पोराप्रमाणे नाचावयाचेच काय तें बाकी राहिलें होतें !

खरोखर तसच अद्भुतरम्य दृश्य होतं तें

'मेताब' अन् 'कोगीद' दोघेंहि आपापल्या चेल्यांकडे धावले मेताबनं आपल्या लाडक्या चेल्याच्या गळ्यात साखळीसह पट्टा अडकविला अन् अजारूनगोजारून त्याला हलकेच बाजूला काढून घेतला त्याच्या डोळ्यांवर त्यानं पुनः ढापण चढविली अन् त्याला तो पिंजऱ्यात घालण्यासाठीं तळाकडे घेऊन गेला

इकडे कोशीदहि आपल्या चेल्याकडे जाऊन, त्याच्या गळयात तो साखळी लावलेला पट्टा अडकवून त्याच बक्कल जाम करणार, तोंच तें नवथर श्वापद एकाएकी बिथरल्यासारख झाल, अन् आपल्या दोस्तावर त्वेषान फिस्कारून गुरगुरावयाला लागल त्यानं आपली करडी नजर त्याच्यावर रोखली, अन् नाखुषीदर्शक अशी शेंपटीची वळवळ करीत तो त्या मृत काळवीटाच्या शरिराचे वाभाडे काढू लागला !

'बच्चा, बच्चा ऐसा क्या करते हो !' अस म्हणत तो त्याच्या अंगावर हात फिरवून त्याला शात करावयास पाहतो तों त्या बेभान् बनलेल्या चित्त्यान कडकडा त्या काळयाचं नरडं फोडलं ! चालतां चालतां जहरी कृष्णसर्पावर अवचुकून पाय पडावा, त्याप्रमाण तो विपरीत प्रकार पाहताच 'कोगीद' एकदम चार हात माग सरला !

महाराज नजीकच होते त्यानी तत्काळ त्या बिथरलेल्या श्वापदाला गोळी घालण्याचा हुकूम दिला. पण कोशीदनं थोडी सबूर करण्याबद्दल

महाराजांस विनति केल्यावरून हुकुमाची अंमलबजावणी किंचित्काल तहकूब झाली.

क्षणभर सर्व मंडळी तटस्थपणान डोळ्यांसमोर घडत असलेला प्रकार बघत उभी होती. त्या बिथरलेल्या प्राण्याला थोडा वेळ त्या काळविटाला स्वैरपणानं चाबलू दिल्यावर मग तो जरासा थंड आला. लगेच त्याच्या डोळ्यांवर ढापणं चढविण्यांत आली. पट्टा गळयांत जाम केला, अन् चुचकारून चुचकारून कसाबसा पिंजऱ्यापर्यंत नेऊन कोशीदनं त्याला आंत घालून धाडकन् पिंजऱ्याची झडप पाडली !

कोशीदनं महाराजांस जमिनीपर्यंत लवून त्रिवार मुजरा केला, अन् महाराजांनीहि कोशीदचं मनःपूर्वक अभिनदन करून त्याला चांगली बक्षिसी दिली



## हिंदुस्थानांत पैदा होणारीं वन्य श्वापदं

सिंहः—गिरनार पर्वत, गीरच्या जगलांत, आणि काठेवाडच्या कांहीं भागांत. अगदी तुरळक. आफ्रिकेंतील सिंहांप्रमाणें हिंदी सिंहांना तितकी भरदार आयाळ नसते आणि आकारमानानेंही ते लहान असतात.

पटाईत-डहाणे-वाघ —सह्याद्रि, विंध्याद्रि, सातपुडा, मध्यहिंदुस्थान, बुंदेलखंड, बंगाल, कर्नाटक-गोंवा, हिमालयाचे उतरणीवरील तराईभाग, ओर्च्छा वगैरे हिंदुस्थानच्या बहुतेक भागांत.

बिबटे वाघ —बुंदेलखंड, राजपुताना, सह्याद्रि, मध्यप्रांत, दक्षिण हिंदुस्थान.

चित्तेः—हिंदुस्थानांत सर्वत्र.

हत्तीः—कारवार, नेपाळ, हिमालय (तराई.)

**गेंडे**:—आसाम, आराकान, ब्रह्मदेश-सरहद्दप्रांत ( एक शिंगाचे. आफ्रिकेंतल्याप्रमाणे दोन शिंगाचे गेंडे इकडे नाहींत. )

**रानडुक्कर**:—हिंदुस्थानांत सर्वत्र आणि विपुल

**गवे**:—हिमालयाचा पूर्वभाग, आराकान, ओरिसा, नेपाळ, ब्रह्मपुत्रा नदीचें खोरें, पूर्वसरहद्द प्रांत

**हरणें**·—मोठी- सर्वत्र.

**चितळ-भेकरें-ठिपक्या ठिपक्याची लहान हरणे-माळ ठिसकीं** — सर्वत्र विपुल.

**अस्वलें**:—मध्यप्रांत, विंध्याद्रि, सातपुडा, मध्यहिंदुस्थानचा डोंगराळ भाग आणि हिमालयाचा काही टापू

**नीलगाय**.—विंध्याद्रीच्या आसमंतात आणि आसाम आराकानच्या कांहीं टापूंत

**लांडगे**.—हिंदुस्थानांत सर्वत्र आहेत लांडग्याच्या मादीस लास म्हणतात. नरापेक्षां मादी अधिक हिंस्र, खोडसाळ आणि हिडीस असते. ही श्वापदे माणसाळत नाहीत

**तरस**:—सर्वत्र आहेत. कमालीची हलकट जात. गाढवे आणि कुत्री मारून खाण्याकडे विशेष कल. कधींही माणसाळत नाहींत

**ससे**:—नहर-महाबळेश्वर या भागांत शुभ्र पांढरे आणि इतरत्र पिंगट-पांढरे

**सायाळ**.—सर्वत्र आणि विपुल

**वनगाय**.—नेपाळ, हिमालय, सिकीम आणि ब्रह्मपुत्रा नदीच्या खोऱ्यांत

**मगर**.—सर्वत्र.

**अजगरः**—मोठमोठया जगलांतून सर्वत्र. विशेषतः हिमालय, नीलगिरी, अबू, सह्याद्रि, विंध्याद्रि आणि सरहद्दप्रांत

**रानघोडेः**—हिमालयाच्या टापूत–तुरळक

**रोहीः**—कोंकणात, कर्नाटकाच्या कांही भागांत आणि बगाल्यांत अत्यंत चपळ–निरुपद्रवी

**सांबर.**—विध्याद्रि, गडवाल, पूर्वोत्तर काश्मीर तुरळक.

**रानरेडे**—आराकान विभागात–तुरळक.

**कस्तुरी मृग.**—नेपाळात आणि हिमालयाच्या काहीं भागात–फारच तुरळक.

**किरकोळ.**—कोल्हीं, रानमाजरें, जवादी माजरें, अनेक जातीचे सर्प, रानकुत्री, रानबोकड, कलिंदरें, माकडे, वानरे वगैरे वगैरे—सर्वत्र.

## होतकरू शिकाऱ्यांस कांहीं सूचना

१ शिकाऱ्याचा पेहेराव पांढरा किंवा कोणत्याही भडक रंगाचा नसावा. भोंवतालच्या–जंगलच्या–परिस्थितीशीं मिळता असावा. ( खाकीच असलेला बरा. ) पादत्राण वाजणारे–आवाज करणारें– नसावे.

२ बंदूक–रायफल–नेहमी साफ करून आणि तेलपाणी देऊन तयार ठेवावी.

३. **निशाण मारणेची प्रॅक्टिस**–अ–एका उंच झाडावर तिरपी कांबीट बांधून तिला एकाद दुसरा नारळ टांगून ठेवावा, व प्रथम छऱ्यांच्या काडतुसांनीं हे वाऱ्यानें हलणारे नारळ फोडावेत चांगला सराव झाल्यावर, उडत्या पांखरांवरहि नेम मारण्याची प्रॅक्टिस करावी.

ब–T च्या आकाराचें, दोन देवद्वारी फळ्याचे, अडीच ते तीन फूट उंचीचें एक निशाण तयार करावें. या T चा वरचा आडवा दांडा सहा इंच रुंदीचा ठेवावा व साठ–पाऊणशें कदमांवरून त्यावर बक् शॉट्सचा नेम मारावा.

क–जमिनीपासून चार फूट उंच असलेल्या एका खांबावर, एक पांच इंची

खिळा उभा ठोकावा व त्यावर अडीच-तीन इंच व्यासाची पत्र्याची नळी ठेवावी. शभर फुटांवरून गोळीनें नेम धरून त्या नळीस भोकें पाडावीत.

वरील टार्जेट् प्रॅक्टिस पूर्ण झाल्यावर शिकारीस जंगलांत निघावें

आवाज टाकते वेळी बंदुकीचा दस्ता खवाट्यास नीटपणे दाबून धरावा बदूक ढिली राहिल्यास धक्का बसण्याचा संभव असतो.

केव्हाहि आलेली सधि जाऊ देऊ नये नेम हुकला म्हणून निराश होऊ नये निशाणबाजीचा सतत व्यासंग ठेवल्याशिवाय आपली चूक लक्षांत येऊन शिकारीच्या खेळात सुधारणा होणार नाहीं

आवाज टाकते वेळी, मान्याचा-गोळीचा अथवा छर्‍यांचा-वेग आणि गति, पृथ्वीचे आकर्षण, हवेचा विरोध, सावजाची हालचाल या बाबीहि अवश्य ध्यानांत घेतल्या पाहिजेत

४. कोणतेंहि फाजील उत्तेजक अथवा मादक पेय शिकारीचे वेळी घेऊ नये.

५ बदूक भरलेली असो अथवा खाली असो, बंदुकीच्या नळीचें तोंड-मझल -नेहमी आकाशाकडे अथवा खाली जमिनीकडे राहील अशी खबरदारी घ्यावी.

६. शिकारीचे प्रसगी वाऱ्याची दिशा कशी आहे तें पहावे आपल्या अगावरून वारा लक्ष्यावर वहाता नसावा. शिकाऱ्याचा-बदुकीचा-वास लागल्यामुळें, सावज सावध होऊन निघून जाईल.

७. शिकारी मत्सरी स्वभावाचा, अनुदार आणि कजुष वृत्तीचा नसावा ॲम्युनिशन्-काडतुसें खर्ची घालताना 'हिशेबी' दृष्टि कामाची नाहीं. खेळाच्या वेळीं ज्याच्या मनात 'हिशेब' घोळत असतो तो उत्कृष्ट शिकारी होऊं शकणार नाहीं.

८. शिकार हेरणें, सावजाचा माग सोडविणें, नीर घालणें वगैरे हरएक बाबींची शिकाऱ्यास सपूर्ण माहिती पाहिजे. तसें नसेल तर, हाके, रानकाढे

वगैरे शिकारी लोक पुष्कळ वेळा शिकाऱ्याची दिशाभूल करून त्याला फस-विण्यास कमी करीत नाहीत

९. होतां होईतों, शिकार पूर्ण आवाक्यात—नेटान किंवा बदुकीच्या टप्यात आल्याशिवाय आवाज टाकू नये. लांब पल्ल्यावर असलेल्या सावजा-वर आवाज टाकणे म्हणजे खेळाचा चुथडा करणें होय

१०. बरोबरच्या शिकारी लोकास, हाक्यास आणि मदतनिसांस राजी ठेवावेत, पण त्यांचा आगाऊपणा अथवा चढेलपणा बिलकुल चालू देऊ नये. त्यांस शिस्तीत वागवावेत. शिकार मनाजोगी झाल्यावर शिकारी लोकास त्याच्या मेहनताऱ्याशिवाय चांगली बक्षिसी द्यावी.

११. जेथे मनुष्यास शिरतां येत नाही, किंवा फराहि धरतां येत नाहीं, अशा जगलाच्या दाट अडचणीच्या भागातून आणि जाळ्यां-खोपांतून श्वापदास उठविण्याकरिता, भूक टाकण्यास शिकविलेली लहान लहान तल्लख कुत्रीं शिकाऱ्यानें अवश्य पाळावीत.

**घोड्यावरची डुकरांची शिकारः—**

१२. ही शिकार फार खर्चाची आणि जिवावरची जाहे या शिकारी-करितां घोडे उत्कृष्ट ट्रेन केलेले, सरावलेले आणि बिनबुजार असावे लागतात. स्टिकाचे दोन तीन जादा सेट जवळ पाहिजेत हाके, बावटेवाले (फ्लॅग्जमेन) वगैरे शिकारी लोक आपापल्या कामात तरबेज असावे लागतात एक दोघे हुशार वॉचमेन सावधगिरीनें आणि सशस्त्र असे—विशेष प्रसंगाकरितां, टेहेळणीसाठीं गाजावाजा होऊ न देतां, खेळावयाच्या मैदानासभोवार फिरते ठेवावेत प्रथमोपचाराचें साहित्य, अवश्य ती औषधें, बॅन्डेज् वगैरे सज्जड तयारी पाहिजे जमिनीस भळी असल्यामुळे आणि शिकारी, सावज उठल्या-वर बेभानपणें सावजामागें कुदत असल्यामुळें, घोड्याचा पाय भळींत शिरून अपघात होण्याचा फार संभव असतो.

१३. सिंह, हत्ती, गेंडे वगैरे श्वापदांच्या बडया शिकारींचे प्रसंग, मध्यम स्थितींतल्या सामान्य शिकाऱ्यांस बहुतकरून दुष्प्राप्य ! मुरलेले, पूर्ण तरबेज आणि सधन अशा शिकाऱ्यासच या शिकारी खेळणें शक्य असतें, म्हणून त्यासबंधी माहिती येथे दिली नाहीं.

**किरकोळः**—जखमी झालेलें सावज जिवावर उदार होऊन शिकाऱ्यावर बेजरबपणानें तुटून पडतें. जखमी वाघ कोठें तरी अडचणीत दबा धरून बसतो, आणि शिकारी गहाळ असल्यास फार लाबून किरण घेऊन शिकाऱ्या-वर झेप घालतो

हरणे, डुकरे, लांडगे, वाघ, सिह, गवे वगैरे श्वापदांचे मुखवटे तयार करून घ्यावयाचे असल्यास, त्या त्या श्वापदाची शिरें तावडतोब कापून चागल्या टॅक्सि-डर्मिस्ट्कडे द्यावीत पुण्यास कॅन्टोन्मेंटमध्यें मेन स्ट्रीटवर व मुंबईस फोर्टमध्यें उत्कृष्ट टॅक्सि-डर्मिस्ट्स आहेत.

हरण—रु. १५, डुक्कर—रु. ३५, लाडगा—रु. १५; वाघ—रु ३०; सिंह—रु. ४०, गवा—रु ५० ते ८० याप्रमाणें मुखवटे तयार करून घेण्याचे अनुक्रमें दर आहेत.

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनें

**दत्त रघुनाथ कवठेकर**

१ अपुरा डाव — ३
२ रेशमाच्या गाठी — ३
३ आभाळाची सावली — ८

**ना. म. पटवर्धन**

१ हितपत्रें — ३
२ वा. म जोशीचरित्र — ४।

**अनंत काणेकर**

१ धुक्यातून लाल तान्याकडे (आ दुसरी) — ३
२ पिकली पानें (आ दुसरी) — १॥
३ उघड्या खिडक्या — १॥

**काकासाहेब कालेलकर**

१ ब्रम्हदेशचा प्रवास — १॥
२ भक्ति–कुसुम. — ३

**य. दि पेण्ढरकर**

१ प्रापंचिक पत्रें — ३
२ घायाळ — २

**ना. ह. आपटे**

१ फसगत — २॥
२ साजणी — ५

**पु. य. देशपांडे**

१ नवें जग ? — २॥

**भाई बेंके**

१ रॉयचरित्र — ॥।

**परिचय लेखक वि. स. खांडेकर**

१ काव्यज्योति — १

**आनंदीबाई जयवंत**

१ पारव्या — २

**रा. वि. फडतरे**

१ मृगया — ४

**लक्ष्मणराव सरदेसाई**

१ ढासळलेले बुरुज — २

**प्रो. वि. ह. कुळकर्णी**

१ व्यक्तिचित्रें — २॥

**शकुंतला परांजपे**

१ भिल्लिणीची बोरें — ३

**कृष्णाबाई मोटे**

१ मीनाक्षीचें जीवन — २।

**र. गो. सरदेसाई**

१ चलती नाणीं — २

**संपादक आचार्य भागवत**

१ वर्धा शिक्षण योजना — ४।

**रा. श्री. जोग**

१ सौंदर्यशोध आणि आनंदबोध — ८

**वि. वि. बोकील**

१ बेबीची बहीण — ३

**सत्यग्राही**

१ ग्रह आणि तारे — ४॥

**वि. म. भुस्कुटे**

१ स्टॅलिन — ३॥
२ आई (मॅक्झिम गॉर्की) — ७

**कमळाबाई टिळक**

१ आकाशगंगा — २॥

**रामतनय**

१ साखरगोटी — ५

**ह. रा. महाजनी**

१ आपलें आर्थिक नियोजन — ५

**पं क्षमा राव**

१ देणगी — २॥

**गोपिनाथ तळवलकर**

१ मंगल धाम — ३



# देशमुख आणि कंपनीची आगामी प्रकाशनें

## वि. स. खांडेकर

१ अश्रु
२ बुद्ध आणि हिटलर
३ चल ये राणी
४ विसावें शतक
५ तिसरी भूक.
६ वर्षाकाल
७ छाया भाग १-२
८ वालुका
९ माझ्या कादंबऱ्या
१० चार भिंती
११ दोन मनें ( ति आ. )
१२ बडी मा
१३ चक्रवर्ती
१४ कल्पलता
१५ उद्याचीं स्वप्नें
१६ वटपत्रें
१७ साहित्य साधना
१८ उल्का ( आ ति )

## ग. त्र्यं. माडखोलकर

१ तीन दिवस
२ ऋणभार
३ माझे आवडते कवि
४ चक्रवर्ती उदयन
५ उर्वशी
६ उमरखय्याम
७ विलापिका
८ दोन तपें
९ हें युद्ध

## दत्त रघुनाथ कवठेकर

१ आपुलकीची झळ
२ ढगाआड
३ आग आणि पाणी
४ नितळलेल्या भावना

## शकुंतला परांजपे

१ चांदणं

## ना. धों. ताम्हनकर

१ गुजाताई
२ झोजारी
३ संतु

## प्र. के. अत्रे

१ 'मी' कसा झालों ?
२ ? ( लघुकथा )

## कृष्णाबाई मोटे

१ अनामिकेची पूजा
२ कलाक्षेत्रात
३ मवाली
४ गुणाची पोर

## काकासाहेब कालेलकर

१ स्मरणयात्रा

## अनंत काणेकर

१ काळे आणि पांढरे

## चि. वि. जोशी

१ गुंड्याभाऊ
२ दरबारकथा
३ लंकावैभव
४ वायफळाचा मळा

## दत्तु बांदेकर

१ हिरवी माडी
२ कबुली जबाब
३ गडी फू

## कुसुमावतीबाई देशपांडे

१ मोळी

## साने गुरुजी

संध्या
निळापक्षी

## श्री. किनरे

प्रकृति दर्शन

## सौ. मालतीबाई दांडेकर

वज्रलेख

## प्रो. लास्की

राज्यशास्त्र प्रवेश